# “ कांहीं पाउलें ”

[ ना. श्री. दादासाहेब मावळंकर यांची रोजनिशी ]

प्रस्तावना :

श्री. काकासाहेब कालेलकर

संकलन व संपादन :

श्री. भाऊ धर्माधिकारी

## खंड पहिला

१९४८

महाराष्ट्र ग्रंथभांडार, कोल्हापूर.

# चाहूल



साहित्याचें स्वाभाविक आणि प्रयत्नमूलक असे जर दोन भाग केले तर वासरी * ही स्वाभाविक साहित्यांत मोडते. आपण इष्टमित्रांना पत्रें लिहितों तें देखील अत्यंत स्वाभाविक साहित्य आहे. वासरीचें साहित्य स्वाभाविक तर आहेच पण त्याहून विशेष म्हणजे तें विश्रब्ध साहित्य असतें. मनुष्य वासरी लिहितांना स्वतःशींच बोलत असतो. स्नेह्यासोबत्यांशीं बोलतांना देखील जी मर्यादा संभाळावी लागते ती येथें नसते. आपल्या स्वभावाला अनुरूप जें कांहीं सुचेल आणि टिपून ठेवावेंसें वाटेल तें सर्व आपण वासरीमध्यें मोकळेपणाने लिहून ठेवतों. विचार शब्दबद्ध करण्याचा स्वतंत्र आनंद तर असतोच. लिहून ताबडतोब फाडून टाकावयाचे असले तरी लिहिण्यात–विचारांना शब्दाचें रूप देण्यांत–असाधारण आनंद असतो. आणि वासरींत तर आपण केवळ पक्के विचार लिहीत नसतों. कच्चे विचार, आलेल्या शंका, घडलेले अनुभव, अनुभवलेली फजीती, झालेला पश्चात्ताप, त्यांतून उद्‌भवणारे

---

* 'डायरी'ला 'दैनंदिनी' हा शब्द वापरला जातो. पृथ्वीच्या दैनंदिन गतीविषयीं लिहितांना हा शब्द तयार झाला असावा. इंग्रजींतील day-to-day साठीं 'दैनंदिन' हा शब्द–प्रयोग गोड आहे. पण 'डायरी'साठीं तो मला आवडेना. 'day' पासून 'डायरी' शब्द तयार झाला तसाच कांहीं तरी शब्द तयार करावा म्हणून थोडेंसें डोकें चालविलें. आपल्याकडे 'दिवसा'ला 'वासर' हा शब्द आहे, त्यावरून 'वासरी' हा एक सुटसुटीत शब्द मिळाला. गुजराथमधील एका लेखकाला तो आवडला पण त्यानें 'वासरी'चें 'वासरिका' केलें. तरलिका, मधुरिका वगैरे सखींच्या नांवांबरोबर 'वासरिका' हें नांव जीवनसखीला शोभण्याजोगें आहे खरें!

निश्चय, इतरांसंबंधींचे अभिप्राय, विनोदवृत्तीला सुचणारी टवाळी आणि कुचेष्टा सर्व कांहीं वासरीचे विषय होऊं शकतात. लिहितांना लिहून गेलों पण पुढे ' लिहिलें तें बरें झालें नाहीं ' असा पश्चात्ताप पत्रसाहित्यांत येऊं शकतो. वासरीमध्यें आपल्याला त्याचें कांहींच वाटत नाहीं. मनुष्य शरीरानें आणि मनानें स्वतःपुढें बऱ्याच अंशीं नग्नच असतो. आणि स्वतःचे करणे स्वतःला न आवडलें तरी क्षमावृत्ति ही जिजीविषेबरोबर अखड असल्यामुळे आपण आपल्या जुन्या चुका देखील कांहींशा वात्सल्य-बुद्धीनें पहात असतों आणि सभाळून घेतों.

पण अनुभवी मनुष्य संस्कारी असेल तर वासरी लिहिताना देखील आपल्याला पुढे पश्चात्ताप होईल असे काहीं न लिहिण्याची खबरदारी घेतो. किंवा निदान लिहितां लिहितां माझे हे विचार चुकीचे असतील, एकांगी असतील, आपण दुसऱ्याला अन्याय करीत असू, अशा जागरूक वृत्तीला देखील नमूद करून ठेवतो. यामुळे वासरीमध्ये मनुष्याचे हृदय, त्याच्या विचाराची ठेवण, त्याचे जीवनसिद्ध संस्कार हे सर्वच उत्कृष्टपणें प्रतिबिंबित झालेले असतात.

ज्या मनुष्यानें साहित्यसेवा यथेच्छ केलेली असते त्याच्या वासरींत देखील थोडा कृत्रिमपणा येऊं शकतो. आणि कित्येक लोक तर आपल्या सर्व लिखाणांत आपली वासरीच अत्यंत खुलून निघणार आहे अशा जाणिवेने प्रयत्नपूर्वक खुबीदार शब्दांत आणि कांहींशी बेजबाबदार वृत्ति धारण करून वासरी लिहीत असतात. असे प्रकार पश्चिमेकडील साहित्यांत पहावयास मिळतात.

आपल्याकडे वासरी साहित्य जवळ जवळ नाहींच म्हटलें तरी चालेल. नाना फडणविसासारख्या एखाद्या मुत्सद्याला देखील आत्मपरीक्षणात्मक वासरीवजा एखादी नोंद लिहून ठेवण्याची वृत्ति होते ही गोष्ट निराळी. त्यावरून एवढेंच सिद्ध होतें कीं स्वतःविषयीं अगदीं मोकळेपणानें स्वतः-च्याच माहितीसाठीं लिहिण्याची वृत्ति मनुष्यमात्राला साहजिक आहे.

इतिहासाविषयींची आपली कल्पना जसजशी बदलूं लागली आणि ' इतिहास म्हणजे राजपुरुषांच्या कारवाया ' ही कल्पना मागें पडून

'मनुष्यसमाजाचा जीवनक्रम' असा इतिहासाचा अर्थ होऊं लागला तेव्हांपासून जगांत सांपडणारा सर्वच मसाला इतिहासाच्या कामाला वापरला जाऊं लागला. साहित्यांतील कोणताहि प्रकार इतिहासाच्या उपयोगी नाहीं असें म्हणण्याची सोय उरली नाहीं. गुहेंत बसून जनावरांच्या आकृती कोरणाऱ्या अज्ञात आणि रिकामटेकड्या चित्रकारापासून ते नवीनच शिकलेलीं अक्षरें विसरून जाऊं नयेत म्हणून दगडाच्या भिंतींत तीं कोरून काढणाऱ्या नवशिक्यापर्यंत सगळेच लोक इतिहास लिहिण्याच्या कामीं भर घालणारे मनुष्यहितचिंतक म्हणून मानले जाऊं लागले आहेत.

आतां हे सिद्ध करण्याची आवश्यकता नाहीं कीं हिंदुस्थानच्या आणि जगाच्या इतिहासांत गांधीयुगाला असाधारण महत्त्व येणार आहे आणि म्हणून या काळांत जें जें म्हणून प्रामाणिक साहित्य लिहिलें जाईल त्याचा भविष्यकाळांत अत्यंत महत्त्वाचा उपयोग होणार आहे. गांधीयुगांतील साहित्याचें इतर वैशिष्ट्य तर आहेच, पण स्वतःकडे आणि समाजाकडे अंतर्मुख होऊन पहाण्याची वृत्ति देखील विशिष्ट प्रकारें या काळांत प्रकट झालेली आहे. गांधींचा स्वभाव सहानुभूतीने थबथबलेला असल्यामुळें आणि मनुष्यस्वभावांतील जवळ जवळ सगळेच प्रकार त्यांच्या निदर्शनास आले असल्यामुळें त्यांनीं जितक्या प्रकारच्या लोकांना जवळ केले तितक्या प्रकारच्या लोकाना आपलेसे करणारे महापुरुष मनुष्यजातीच्या समृद्ध इतिहासात देखील सांपडणें कठीण.

इतक्या तऱ्हेच्या लोकांनीं गांधींना कसें पाहिले आणि गांधींच्या सहवासांत येऊन स्वतःचे जीवन कसे समृद्ध केलें हें शोधणाऱ्या भविष्यकाळच्या इतिहासकाराला मुबलक मसाला मिळावा अशी जणूं काय इतिहासविधात्याची योजनाच आहे. गेल्या २५–३० वर्षांमध्यें आपल्या देशांत जितक्या विविध प्रकाराचे साहित्य तयार झालें आहे तितका विविध प्रकार मागच्या कोणत्याहि पिढींत दिसून येत नाहीं.

म. गांधींची स्वतःची वासरी कोणत्या दिवशीं काय घडलें, त्या त्या दिवशीं त्यांना कोण कोण भेटून गेलें आणि कोणाचीं पत्रें आलीं गेलीं यांचें फक्त टांचणच आहे. कालक्रम ठरविणाऱ्या इतिहासकारांना

त्यांचा उपयोग होईल. इतिहासांतील कांहीं चुका दुरुस्त करण्यासाठीं या टांचणांचा फारच उपयोग होईल. पण याहून अधिक त्यांत फारच थोडें सांपडणार. एखादे दिवशीं एखादे चांगलेंसें वाक्य त्यांच्या नजरेस पडलें आणि त्यांनीं कौतुकानें तें लिहून काढलें असे क्वचित् प्रसंग त्या टांचणांत सांपडतील खरे.

पण महात्माजींचे अनन्य अन्तेवासी महादेवभाई यांनीं स्वतःची सर्व अभिरुचि गांधींच्या चरणीं वाहून जे लेखन वाचन केले आहे त्याचा आस्वाद आणि गांधींच्या ( व त्यांच्या आसपासच्या लोकांच्या ) जीवनांतील अनेक महत्त्वाचे प्रसग त्यांच्या अनेक वासरींमधून आपल्याला मिळूं लागले आहेत. आतापर्यंत महादेवभाईच्या वासरीचा एकच भाग प्रसिद्ध झाला आहे आणि तोहि गुजरातींत, पण तेवढ्यावरूनच वाचकवर्ग अगदीं गुंगून गेला आहे. म० गांधींनीं स्वतःची आत्मकथा जेथवर आणून सोडली तेथूनच 'नवजीवन', 'Young India' आणि 'हरिजन'मधील महादेवभाईचे लेख सुरू होतात. या काळांतील वाचकाचा रस केवळ गांधीजीपुरताच मर्यादित न राहाता गांधीजींच्या आसपास रचल्या जाणाऱ्या गांधीयुगापर्यंत फैलावतो व गांधीयुगांत ज्यांनीं ज्यानीं म्हणून कोटल्या ना कोटल्या क्षेत्रांत कर्तबगारी केली आहे त्या सगळ्यांचा अंतर्भाव आपल्या कुतूहलांत होतो.

अशा मंडळींत गुजरातच्या व आतां सर्व हिंदुस्तानच्या सार्वजनिक जीवनांत प्रमुखपणें भाग घेणाऱ्या श्री. दादासाहेब मावळकरांचें स्थान महत्त्वाचे आहे. स्वतःच्या आयुष्याचा दैनिक हिशोब लिहून ठेवण्याच्या संकल्पानें त्यांनीं जी नित्यनोंद लिहिली आहे तिचें अनेक रीतींनीं महत्त्व आहे. समकालीन इतिहास म्हणून तिचें जितकें महत्त्व आहे तितकेंच दादासाहेबांच्या विशिष्ट स्वभावाच्या आणि त्यांच्या कर्तबगारीच्या दृष्टीनेंहि तिला महत्त्व आहे.

श्री. दादासाहेबांचा आणि माझा परिचय पाव शतकाहून अधिक काळाचा आहे. मी जेव्हां प्रथम अमदाबादला गेलों तेव्हां दरवर्षी श्रावणी करण्याइतका सनातनी होतों. आमचे मामा फडके म्हणाले कीं "भद्र-

मध्यें मावळंकर राहातात त्यांच्या घरीं श्रावणीसाठीं महाराष्ट्रीय मंडळी गोळा होते, आपण तेथें जाऊं." मी तयार झालों. श्रावणीला आमंत्रणाची जरूर नसते. श्रावणी आटोपतांच दादासाहेबांनीं जेवणाला राहाण्याचा आग्रह केला. आम्हांला तो स्वीकारावा लागला. मला कबूल केलें पाहिजे कीं त्यांची गोरी, प्रमाणबद्ध शरीरयष्टि आणि हंसतमुख चेहेरा मला प्रथमदर्शनींच आकर्षक वाटला. घरची राहाणी आणि टापटीपदेखील संतोषकारक वाटली. अशा रीतीनें आलेला संबंध स्वाभाविकपणें वाढण्यास वेळ लागला नाहीं. पण दादासाहेबांच्या कर्तबगारीचा खरा परिचय झाला सन १९२१ च्या अमदाबादच्या कॉंग्रेसच्या वेळीं. दादासाहेब कॉंग्रेसचे प्रधान स्वागतमंत्री होते. मी प्रदर्शनाच्या कलाविभागाकडे विशेष लक्ष्य देत होतों. दादासाहेब अगदीं तरतरीतपणें सर्वत्र फिरून बारीकसारीक सर्व तपशीलाकडे लक्ष्य देत होते. कॉंग्रेससाठीं जागा ताब्यांत घ्यावयाची होती. लोक म्हणाले, '२०–२५ एकर जागा घ्या म्हणजे पुष्कळ झाली.' दादासाहेबांनीं स्वतःच्या जबाबदारीवर ९५ एकर जागा घेतली. शेवटीं अनुभव आला कीं ही जागा चारएक एकरांनीं कमीच पडली !

सामान्यपणे कॉंग्रेसचे हिशोब कॉंग्रेसनंतर चार सहा महिन्यांनीं प्रसिद्ध झाले तरी स्वागत समितीची वाखाणणी होते. दादासाहेबांनीं कॉंग्रेसच्या शेवटच्या दिवशींच हिशोब तयार करून अजमासें साडेतेवीस हजार शिलकेच्या चेकसहित श्री. जमनालालजींच्या हातीं देऊन त्यांना चकित करून सोडलें. कॉंग्रेसच्या सदस्यांपैकीं ज्याचेकडून फीची बाकी थकली होती त्यांची यादीहि खजिनदार श्री. जमनालाल यांच्याकडे द्यावयास ते विसरले नाहींत. हिशोबाच्या बाबतींतील महाराष्ट्रीय आणि गुजराती संस्कारांचा हा सुंदर मिलाफ पाहून जमनालालजींच्या मारवाडी आत्म्याला किती तरी संतोष झाला असेल !

यापूर्वींच आम्ही मंडळी गुजरात विद्यापीठाची स्थापना करून चुकलों होतों. तेथें दादासाहेब कायद्यावर व्याख्यानें देण्यासाठीं येत असत. रोज प्रारंभीं प्रार्थनेनंतर माझें प्रवचन होत असे, त्यालाहि ते नियमितपणें हजर राहात आणि स्वाभाविकपणें त्या त्या विषयांवर आमची चर्चाहि

होई. तो काळ मोठया धामधुमीचा होता. आम्ही मंडळींनीं कितीतरी प्रवृत्ती आणि चळवळी सुरूं केल्या होत्या. अनेक प्रसंगीं दादासाहेबांशीं सहकार करण्याची संधी येई. आमच्या प्रिन्सिपाल गिदवाणींनीं एखादी प्रवृत्ति सुरूं करावी आणि ती झेपेनाशी झाली म्हणजे दादासाहेबांचेकडे सोंपवून द्यावी असें अनेक वेळां होत असे. राष्ट्रीय शिक्षणाचे सिद्धान्त मी लिहून काढले आणि दादासाहेबांनीं विद्यापीठाच्या घटनेला कायदेशीर रूप दिले.

पुढे लवकरच सरकारने गांधीजींना पकडले. गयेच्या कॉंग्रेसमध्यें असहकार चालूं ठेवावा कीं मागें घ्यावा याची बरीच भवती न भवती झाली. लवकरच आम्ही कॉंग्रेसची खडी फौज तयार करण्याची योजना करूं लागलों. परदेशी मालावर कडक बहिष्कार घातला गेला. 'नवजीवन' बंद करण्याच्या उद्देशानें सरकारने संपादक, प्रकाशक, मुद्रक सर्वांनाच जेलमध्यें पाठविले, तेव्हां 'नवजीवन' चालविण्याची जबाबदारी माझ्या-वर येऊन पडली. यथाकाळीं मी देखील एक वर्षासाटीं जेलमध्यें जाऊन आलों.

त्याच सुमाराची गोष्ट आहे. दादासाहेब जेलमध्यें जाण्यास तयार झाले होते. पण त्यांच्या मातु:श्री त्यांना परवानगी देईनात. कायदेपांडित मावळंकर सरकारचे कायदे मोडण्यास तयार होते. पण सत्पुत्र दादा-साहेबांना मातु:श्रीची आज्ञा मोडवेना. त्यांना एकदां भेटावयास गेलों असतांना त्यांनीं आपलें हें धर्मसंकट मला सांगितलें. मी म्हणालों "जननी आणि जन्मभूमि दोन्ही आपणांस पूज्य. दोहोंची सेवा आपणास करावयाची आहे. पण जननीनें जन्म दिला म्हणून तर आपल्याला जन्मभूमि लाभली, तेव्हां शक्य तोंवर जननीला संतोष देणें हें आपलें प्रथम कर्तव्य आहे. लोकांनीं गैरसमज करून घेतला तर दुर्दैव त्यांचें. मातु:श्रींच्या मनाला आघात होईल असें न केलेलेंच बरें."

दादासाहेबांची उत्कट मातृभक्ति पाहून मला त्यांचेविषयीं विशेष आदर वाटूं लागला. मीहि लहानपणापासून मातृभक्तीचा आदर्श स्वत:-पुढें ठेवला असल्यानें मला त्यांचेसंबंधीं विशेष आत्मीयता वाटूं लागली.

हा प्रसंग विस्तारानें सांगण्याचें कारण असें कीं यांतच दादासाहेबांच्या स्वभावाची ठेवण आपल्याला सांपडते. जुन्या काळापासून घरंदाजपणाचा आदर्श आपल्या समाजानें उत्कटतेने कमावलेला आहे. धर्माभिमान, जात्यभिमान, राष्ट्राभिमान या नंतरच्या गोष्टी आहेत. चारित्र्याचा खरा पाया मातृपितृभक्ति, बंधुप्रेम, पतिपत्नीनिष्ठा वगैरे कौटुंबिक सद्गुणांवरच आधारलेला असतो. प्रभु रामचंद्रानें जन्मभर हालअपेष्टा सोसल्या, ही सहनशक्ति त्यांना मिळाली ती 'रघुकुलरीती'च्या आदरामुळेंच.

दादासाहेबांचे चुलते एकदां रागाच्या भरांत स्वतःच्या मातुःश्रींचा अपमान करण्याच्या बेतांत होते. त्या प्रसंगीं दादासाहेबांनीं चुलत्याची कडकपणे कानउघाडणी करण्यास मागेपुढें पाहिलें नाहीं; आणि चुलत्यांनीं शांत झाल्यावर पुतण्याचे उपकारच मानले.

ही उत्कट कुटुंबनिष्ठा वाढीस लागून त्यांतूनच समाजनिष्ठा आणि राष्ट्रनिष्ठा उत्पन्न झाल्या आहेत; आणि म्हणूनच त्या खंबीर झाल्या आहेत. उत्कट कुटुंबनिष्ठेमुळें एकांगिता येण्याचा मात्र संभव असतो.

व्यक्तीच्या विकासाकडे किंवा स्वातंत्र्याकडे कांहींसें दुर्लक्ष करून कुटुंबाच्या परंपरेकडे अधिक लक्ष देणें ही गोष्ट अशा मनोवृत्तींत स्वाभाविकपणे असते. सत्याग्रह करण्याचें व्यक्तिगत कर्तव्य उपस्थित झालें असतांना समाजनिष्ठेचे महत्त्व अधिक वाटून सत्याग्रह मागें पडणें अशा स्थितींत अशक्य नसतें. श्रीरामचंद्रांची पितृभक्ति राजधर्माच्या आड येऊं शकते आणि त्यांचा राजधर्म त्यांच्या हातून पत्नीवर अन्याय करवूं शकतो. धर्मसंकटांचा प्रश्न कायमचा कोणीच सोडविला नाहीं. आपणाला जो आदर्श सर्वश्रेष्ठ वाटेल त्याला चिकटून राहाणें एवढेंच काय तें मनुष्याच्या हातीं आहे.

धद्यांत असो किंवा राष्ट्रकार्यांत असो, दादासाहेबांची न्यायनिष्ठा इतकी कसलेली आहे कीं अमदाबादच्या आणि गुजरातच्या सर्वच संस्थांना दादासाहेबांचें मार्गदर्शन आणि सल्ला अत्यावश्यक वाटतात.

माझ्यासंबंधानें बोलतांना लोक म्हणतात कीं महाराष्ट्रीय असूनहि हे गूजरातशीं एकरूप झाले आहेत. गूजरातमध्यें दादासाहेबांना कोणी

महाराष्ट्रीय समजतच नाहीं. अनेक संस्थांचे आणि पेढ्यांचे संचालक दादासाहेबांच्या सल्लयावांचून काम करीत नाहींत. यांत आश्चर्य नाहीं. पण कित्येक थोर थोर कुटुंबें घरगुती कामांत देखील त्यांच्या सल्लयाप्रमाणें चालण्यांतच श्रेय आहे असें समजतात. त्याचें मुख्य कारण असें आहे कीं दादासाहेबांनीं निष्ठा आणि व्यवहार यांचा उत्तम संगम साधला आहे. व्यवहारकुशल लोकांना खात्री वाटते कीं दादासाहेबांची धर्मबुद्धि आणि दीर्घदर्शी व्यवहार–तत्परता यांत फरक नसतो. गांधीजींनीं म्हटलेंच आहे कीं खरा धर्म खऱ्या अर्थाचा ( व्यवहाराचा ) विरोधी नसतो !

सरदार वल्लभभाईनीं अमदाबाद म्युनिसिपालिटीचें अध्यक्षपद स्वीकारून नगरसेवेचा उत्कृष्ट आदर्श जनतेपुढें मांडला. त्यांची ती परंपरा तितक्याच दक्षतेनें पुढें चालवून दादासाहेबांनीं स्थानिक स्वराज्याला महत्त्वाचें रूप दिलें. बारीक सारीक गोष्टींत सुधारणा करून पैशाची मोठी बचत करणें, पक्षपाताला कोठेंहि अवकाश न देणें, सार्वजनिक हिताच्या संस्थांना उपयोगी पडणें, चारित्र्यनिष्ठ लोकांना हातभार लावणें वगैरे आदर्श त्यांनीं उत्तम प्रकारे पाळून दाखविले आहेत. अमदाबादमधील मोठे मोठे ॲस्फॉल्टचे वज्रलेप रस्ते त्यांच्या नगरसेवेचें स्मारक आहेत. पक्षनिष्ठा न्यायनिष्ठेच्या आड न येऊं देणें, स्वकीयासंबंधीं स्नेहबुद्धि कायम ठेवून त्यांचे दोष उघडपणें बोलून दाखविणें आणि प्रतिपक्षीयांच्या देखील स्वातंत्र्याला जपणें इत्यादि त्यांचे गुण जनतेच्या नजरेला आल्यामुळेंच कॉंग्रेसपक्षानें त्यांना मुंबईच्या कायदेमंडळाचे ( असेंब्लीचे ) अध्यक्ष नेमलें. निर्णय देण्याची पाळी आली असतां तटस्थपणे न्यायपूत निर्णय चटकन् देणे यांत त्यांचा हातखंडा आहे. लोकसभेचा अध्यक्ष पक्षातीत असावा. अधिकारारूढ पक्षाच्या हातून जनतेच्या जन्मसिद्ध हक्कांची पायमल्ली होऊं नये आणि लोकसभेमध्यें प्रजासेवक राज्यकर्त्यांचेंहि पैशुन्यप्रेरित टीकेपासून रक्षण व्हावें या सर्व बाबतींत ते फारच जपत असतात. आणि म्हणूनच स्वराज्यस्थापना होतांच राष्ट्रानें त्यांना केंद्रीय लोकसभेचें अध्यक्षस्थान अर्पण केलें. ज्या दिल्लींत औरंगजेबाच्या दरबारांत शिवाजीचा गौरव होऊं शकला नाहीं आणि ज्या दिल्लींत पेशव्यांना चौथाई–सरदेशमुखीच्या हक्काची याचना करावी लागली

त्याच दिल्लींत स्वराज्य होतांच, लोकसभेच्या प्रमुखस्थानीं प्रजेच्या जन्मसिद्ध हक्कांचें संरक्षण करण्यासाठीं दादासाहेबांना बसलेले पाहून आणि निष्ठेची शपथ वाहाणाऱ्या मंत्र्यांना देखील त्यांची प्रदक्षिणा करतांना पाहून मला विशेष संतोष झाला.

वकिली सल्ला देऊन ज्या गिरणीमालकांचें त्यांनीं परोपरीनें हित साधलें त्यांचेकडून स्वतःचा स्वार्थ साधण्याची अपेक्षा न करतां त्यांचे हातून राष्ट्रकार्याला परोपरीने मदत देवविण्यांतच दादासाहेबांना नेहमीं संतोष वाटला आहे. गूजरातसाठीं एक स्वतंत्र युनिवर्सिटी स्थापन करण्याचें स्वतःचें स्वप्न सिद्ध करण्यासाठीं गूजरातमधून १ कोटी रुपये गोळा करण्याचा त्यांनीं संकल्प केला आहे व तो पारहि पडणार अशी सुचिन्हें आतांच दिसूं लागलीं आहेत.

दादासाहेबांनीं स्वतःची वासरी गूजरातींत न लिहितां मराठींत लिहिली हें एक आश्चर्यच होय. वासरी छापण्याचा मुळांत विचार नसावा. स्वसंतोषासाठीं दैनंदिन जीननक्रमाचे टांचण ठेवावें एवढाच मूळ उद्देश असेल आणि म्हणूनच कोठेंहि साहित्यिक छटा मुद्दाम आणण्याचा प्रयत्न दिसत नाहीं. विचार आणि अनुभव मांडण्यांत जें सौष्ठव दिसतें तें स्वाभाविक संस्कारितेमुळेंच आलें आहे.

एका काळीं आपले नेमस्त लोक स्वकीयांचे दोषच पहात आणि इंग्र-जांचें सर्वच चांगलें असें म्हणून त्यांच्या भजनीं लागत. या सर्व प्रका-राला कंटाळून ज्या काळीं राष्ट्रानें स्वाभिमान, आत्मविश्वास आणि सारासारविवेक यांची जोपासना केली त्या काळीं ही वासरी लिहिली असल्यामुळें हिच्यांतील परकी लोकांच्या गुणांचा स्वीकार आपल्याला कोठेंच खुपत नाहीं. स्वकीयांचे दोष पहातांना दादासाहेब कसलीच भीड बाळगत नाहींत. पण त्याबरोबर आपल्या राष्ट्रानें स्वदेशांत आणि पर-देशांत स्वत्वाला जागलें पाहिजे हाहि त्यांचा कटाक्ष या वासरींत एक-सारखा दृष्टोत्पत्तीस येतो.

अगदीं अभावितपणें स्वतःचे जीवनसिद्धान्त त्यांनीं येथें नमूद केले असल्यानें त्यांचा परिचय होण्यास ही वासरी चांगलीच उपयोगी पडते.

आपले लोक इतरांच्या सुखसोयींकडे न पाहण्याइतके असामाजिक रीतीनें वागतात, वेळेचा दुरुपयोग करतात इत्यादि गोष्टींची चीड त्यांनीं इतक्या वेळीं व्यक्त केली आहे कीं एका सभेंत कोणीतरी त्यांच्या या वृत्तीची टवाळीं केल्याचें त्यांनींच नमूद करून ठेवलें आहे. तें वाचतांना आपली सहानुभूति दोन्ही बाजूंकडे वाहूं लागते.

दिवसभराचें काम आटोपून थकल्यावेळीं रात्रीं वासरी लिहावयाची म्हणजे त्यांत कामापुरत्याच गोष्टी यावयाच्या. तरीहि दादासाहेबांनीं सृष्टि-निरीक्षणाचे आणि प्राकृतिक सौंदर्याचे प्रसंग वांया जाऊं दिले नाहींत. सूर्योदय आणि सूर्यास्त यांची शोभा त्यांना नेहमींच मोहित करूं शकते. आगपाट्यानें करावयाच्या प्रवासांत घड्याळाचे कांटे वारंवार बदलावयाचे असतात हेंहि नमूद करण्यास ते विसरले नाहींत. पाश्चात्यांचे कांहीं रीतरिवाज त्यांना मुळींच पसंत नसले आणि आपल्या समाजांत ते येऊं देणें त्यांना भयंकर वाटत असलें तरी पाश्चात्य लोकांविषयीं अनुदार कल्पना करण्यास ते तयार नाहींत. प्रत्येक समाजाची कसोटी त्या त्या समाजाच्या आदर्शाप्रमाणेंच झाली पाहिजे हा सिद्धान्त सर्व जगानें घोकून ठेवण्यासारखा आहे. युरोपांतील कलाकारांनीं काढलेल्या चित्रांत आणि कोरलेल्या पुतळ्यांत नग्नतेचें केलेलें प्रदर्शन अनीतिकारकच असलें पाहिजे असें पूर्वी मला वाटत होतें. पुढें पुढें तटस्थपणें सौंदर्यतत्त्वाचा अभ्यास केल्यानंतर आणि कलेच्या आदर्शाची मीमांसा पटल्यानंतर माझे विचार बदलले. नग्नतेंत निसर्गतःच असलेलें पावित्र्य ज्यांना उमगतें त्यांची दृष्टि निवळते. आणि अमर्याद विलासितेच्या वातावरणांत जे मुरलेले असतात त्यांनाहि पुढें पुढें दृष्टि बधिर झाल्यामुळें नग्नतेचें कांहींच वाटेनासें होतें.

या वासरींत एक वर्षाचाहि मजकूर आलेला नाहीं. बराच भाग युरोपच्या प्रवासाच्या वर्णनांत गेलेला आहे. वासरीच्या मानानें युरोपचें वर्णन मुबलक आहे असें म्हणतां येईल. पण वाचकांच्या कुतूहलवृत्तीच्या मानानें पहातां हें वर्णन बरेंच त्रोटक आहे. यावरून एक विचार सुचला कीं वासरी हें साहित्यच स्वान्तःसुखाय लिहिलें असल्यानें आत्मनेपदी असणार. पण तें प्रकाशित करावयाचें म्हणजे लेखकानें त्याला परस्मैपदी

केलें पाहिजे. वाचकांना चुकल्याचुकल्यासारखें होऊं नये, रसधारा आटूं नये आणि घटनाक्रमाची शृंखला तुटूं नये म्हणून, कंसामध्यें घालून कां होईना, मधून मधून इतर माहिती दिलीच पाहिजे. आपण आशा करूं या कीं यापुढील भागांत दादासाहेब वेळांत वेळ काढून वाचकांची ही स्वाभाविक जिज्ञासा तृप्त करतील.

बखरी, खासगी पत्रें किंवा वासरी यांसारख्या साहित्यांत स्वाभाविक रस पुष्कळ असतो. पण तो जीवनरस असतो. साहित्यरसाच्या दृष्टीनें याकडे न पाहातां जीवनरसाच्या दृष्टीनेंच याकडे पाहिलें पाहिजे. संस्कारी लोकांच्या लिखाणांत साहित्यरस हा मिळणारच पण वाचकांनीं बुद्धिपुरस्सर तो गौण करून जीवनरसच वाढविला पाहिजे. जुन्या बखरी आतां मागें पडल्या. पण पत्रसाहित्य आणि वासरीसाहित्य यांचें चालन आतां बरेंच वाढणार आहे. तेव्हां वाचकांची अभिरुचि त्या दिशेला वळलीच पाहिजे; किंबहुना अशा प्रकारच्या साहित्याची भूक समाजांत जागृत झाल्यामुळेंच तें साहित्य प्रकाशांत येणार आहे.

प्रस्तुत खंड हा प्राथमिक स्वरूपाचाच आहे. लेखकाचें जीवन जसजसें व्यापक होत गेलें तसतसे पुढील भाग विविध आणि विशेष आकर्षणाचे होणार आणि सार्वजनिक महत्त्वाच्या गोष्टींवर त्यामधून मौलिक प्रकाश पडणार आहे.

मुंबई, ता. १७–९–४८
अनंत चतुर्दशी.

—काका कालेलकर.

# प्रारंभिक परिचय



भारताचें मोठें भाग्य कीं स्वातंत्र्याचा पराकाष्ठेचा प्रयत्न होत असतांना त्याला लाभलेले नेते आणि स्वातंत्र्य-संपादनानंतर मोठ्या आणीबाणीच्या काळांत त्याला सांवरून धरण्याचा शिकस्तीचा प्रयत्न करणारे राज्यसूत्रधार हे दृष्टीचे विशाल, मनाचे थोर, कर्तबगारीचे श्रेष्ठ आणि चारित्र्याचे उज्ज्वल असे लाभलेले आहेत. सत्तेशीं संबंध असणारें राजकारण निर्मळ व निर्मम राखणारे महाभाग जगाच्या पाठीवर विरळा. "सत्ता बिघडविते आणि अमर्याद सत्ता अमर्यादपणें बिघडविते" या सर्वमान्य अनुभवाच्या बाबतींत स्वतःला अपवाद बनविण्याची शक्ति आज पं. जवाहरलालसारख्या ज्या कांहीं राष्ट्रधुरीणांच्या अंगीं आहे ती त्यांच्या प्रखर चारित्र्यबळामुळेंच होय. त्यांच्याचमुळें भारताचें मुख जगांतील राष्ट्रांत आज उज्ज्वल राहिलें आहे आणि जगाला आज आवश्यक असणारें मार्गदर्शन करण्याची आशा हिंददेशापासून अजून बाळगतां येण्यासारखी आहे. अशा उत्तम पुरुषांमुळेंच कॉंग्रेससारख्या सर्वजनसंग्रहकारी संस्थेची प्रतिष्ठा देशांत कायम राहिली आहे. आज देशाचें सर्वोच्च राज्यपद भूषविणारे श्री. राजाजी, राज्यसूत्रें हलविणारे पं. जवाहरलाल आणि पहिल्या हिंदी लोकसभेचे पहिले अध्यक्ष म्हणून सर्वांच्या विश्वासास व आदरास पात्र झालेले श्री. दादासाहेब मावळंकर हे उत्तम चारित्र्याचे आदर्श पुरुष म्हणण्यांत थोडीसुद्धां अतिशयोक्ति नाहीं.

अशा थोर व्यक्तीचें अंतरंग थोड्याफार स्वरूपांत या दिनवृत्तांच्या रूपानें जगापुढें येत आहे. येशू ख्रिस्ताप्रमाणें गांधीजींनीं सद्‌गुणाला जास्तींत जास्त क्रियाशील बनविलें आणि म्हणूनच "गांधीयुग" अवतीर्ण होऊं शकलें. सद्‌गुणांचा विकास सत्क्रियाप्रवृत्त झाल्यामुळें होत असतो. लोहचुंबकाकडे लोहकण खेंचले जावे तसे सद्‌गुणी लोक गांधीजींकडे खेंचले गेले आणि गांधीजींनीं त्यांना प्रवृत्तिमय बनवून समाजाचें रूप अधिक

मंगल, अधिक सुंदर करण्याकडे त्यांचा विनियोग केला. सद्‌गुणाचा हा धर्मच आहे कीं तो कधीं संकुचित राहूं शकत नाहीं. व्यक्तिस्वरूपांतून समाजस्वरूपांत अशी त्याच्या विकासाची गति आहे.

ही गति श्री. दादासाहेबांच्या चरित्रावलोकनावरून चांगली प्रत्ययास येते. अर्थात् त्यांचें चरित्र वा आत्मचरित्र अजून जनतेपुढें आलेलें नाहीं. पण त्यांच्या या दिनवृत्तांतून जेवढें पहावयास मिळतें तेवढ्यावरून वरील सिद्धान्ताची सत्यता पटण्यास हरकत नाहीं. मात्र गांधीजींच्या प्रभावानें ज्यांच्या स्वभावाला अथवा जीवनाला कलाटणी मिळाली अशा मंडळींत दादासाहेबांची गणना करतां येणार नाहीं. ते स्वभावतःच सत्यनिष्ठ-सत्याग्रही, अभिजात रुचीचे, बोलावें तसें करावें या वृत्तीचे, परदुःखानें द्रवणाऱ्या हृदयाचे आणि स्वतःच्या मनःशांतीकरितां परदुःखनिवारणास तत्पर होणारे असे आहेत. इंग्रजींत ज्याला 'लिबरल मॉइंडेड्नेस्' म्हणतात तशा उदार वृत्तीचे ते आहेत. स्वमताविषयींची निष्ठा राखूनहि इतरांचीं मतें समजून घेण्याची व त्यांना वाव देण्याची त्यांची वृत्ति आहे. त्यामुळें नित्याच्या व्यवहारांत त्यांचा स्वभाव चोखपणामुळें प्रथम जरी कडक भासला तरी त्याचबरोबर ते तितकेच भिडस्त व निराग्रही आहेत असें अनुभवान्तीं आढळून येतें. हा त्यांच्यांतील उदार वृत्तीचा परिणाम असावा. पुढें त्यांच्या दिनवृत्तांत अशीं अनेक प्रकरणें आलेलीं आहेत कीं ज्या बाबतींत कडक राहावें अशी त्यांना आंतून इच्छा असूनहि त्यांच्यांतील औदार्यजन्य भिडस्तपणामुळें ते कडक होऊं शकलेले नाहींत. उदा० आप्तेष्टांना उसनवार म्हणून दिलेल्या पैशाचें प्रकरण.

गांधीजींमध्यें हा सत्याचा आग्रह व इतरांविषयींची उदारवृत्ति अधिक शुद्ध स्वरूपांत वसत होती. यालाच त्यांनीं आपल्या परिभाषेंत 'सत्य' आणि 'अहिंसा' अशीं नांवें दिलीं आहेत. यांतील सत्यनिष्ठेचा वारसा दादासाहेबांना त्यांच्या पुण्यश्लोक वाडवडिलांकडून मिळाला आहे असें दिसतें. त्यांचें दिनवृत्त वाचतांना मला स्वतःला एकंदरींत त्यांच्या प्रकृतीच्या घडणीविषयीं बरेंच कुतूहल उत्पन्न झालें व दादासाहेबांकडे स्पष्टीकरणार्थ म्हणून दिलेल्या प्रश्नावलींत त्यांच्या घराण्याविषयींची माहितीहि मी त्यांना विचारली. दादासाहेबांनीं मला प्रत्यक्ष कांहीं उद्बोधक परिचय

दिलाच पण सविस्तर व अधिक शास्त्रीय स्वरूपाचा परिचय करून घेण्या-करितां त्यांनीं 'मावळंकर सरदेसाई घराण्याचा इतिहास' हा ग्रंथ पहाण्यास सांगितलें. या ग्रंथांतील 'अमदाबादकर मावळंकर' हें प्रकरण खरोखरच अत्यंत वाचनीय असें मला वाटलें व त्यांतून दादासाहेबांच्या शीलाच्या व स्वभावाच्या घडणीचें रहस्य समजल्यासारखें मला झालें. परिस्थितीनें जरी मनुष्य घडत असला तरी त्याच्या स्वभावाचा मेरुदंड परंपरागत चालत आलेले कांहीं विशिष्ट गुण हाच असतो. खंडशः प्रसिद्ध होणाऱ्या या दिनवृत्तांतून ज्या एका सर्वसामान्य तरी असामान्य व्यक्ति-विशेषाचा परिचय होत आहे. त्याच्या चरित्राची पार्श्वभूमि अभ्यासू वाचकाला थोडक्यांत समजून देणें अवश्य आहे असें मला वाटतें.

मावळंकर हे मूळचे राहाणारे रत्नागिरी जिल्ह्याच्या संगमेश्वर तालुक्यां-तील मावळंगें या गांवचे. तेथें त्यांचें पूर्वी देसाईपणाचें वतन होतें. मावळंकर सरदेसाई घराण्याचे मूळ पुरुष 'श्री नृसिंह भटजी सत्यवादी' हे होत. 'सत्यवादी' हें अभिधान त्यांच्या नांवांतच सामिल केलें आहे यावरून त्यांच्या सत्यवादित्वाच्या प्रतिष्ठेची कल्पना येण्यासारखी आहे. कोंकणांतून पहिल्या प्रथम दादासाहेबांचे पूर्वज 'बाजी नायक' हे १८ व्या शतकाच्या शेवटीं चरितार्थाच्या निमित्तानें गुजरातेंतील बोरसद किल्ल्यावरील गायकवाडी ठाण्यांत कायमपणें नोकरीस येऊन लागले होते. तेथेंच त्यांनीं आपल्या 'सरदेसाई' या उपनांवाचा त्याग करून फक्त 'मावळंगकर' हें उपनांव लावण्यास सुरुवात केली. या बाजी नायकांचे नातू नरसो लक्ष्मण यांचा जन्म सन १८०० त झाला आणि याच सुमारास हें कुटुंब अमदाबादेस स्थायी झालें. श्री. नरसो लक्ष्मण हे दादासाहेबांचे पणजे. त्यांचा उल्लेख येथें करण्याचें कारण अमदाबादकर मावळंकर घराण्याला ऊर्जितावस्था आली ती यांच्याच कर्तबगारीमुळें. आरंभीं ईस्ट इंडिया कंपनीच्या अमदानींत मासिक फक्त ७ रु. पगारावर एका गांवचे तलाठी म्हणून ते लागले. आणि पुढें "कंपनीच्या राज्यांत एतद्देशीयांस मिळ-णाऱ्या मोठयांत मोठया जागेपर्यंत म्हणजे रेव्हेन्यू कमिशनरच्या दप्तर-दारीच्या मासिक ७०० रु. वेतनाच्या हुद्द्यापर्यंत केवळ स्वपराक्रमानें व उत्कृष्ट चारित्र्यामुळेंच ते चढले." त्या वेळचे (म्हणजे सन १८३३ चे)

रेव्हेन्यू कमिशनर मि. विल्यम्सन यांनीं नरसो लक्ष्मण यांच्यासंबंधीं जें शिफारसपत्र कंपनी सरकारकडे आपण होऊन पाठविलें होतें त्यांत त्यांनीं नरसोबांच्या बुद्धिमत्तेची, चातुर्याची, उद्यमशीलतेची, बारकाव्यानें माहिती मिळवून अचूक निर्णय बांधण्याच्या शक्तीची जशी तारीफ केली आहे त्याचबरोबर त्यांच्या सच्चारित्र्याची, प्रामाणिकपणाची आणि कर्तव्यनिष्ठेची ग्वाही दिली आहे. या त्यांच्या गुणांमुळें व सेवेमुळेंच त्या वेळच्या सरकारनें त्यांना त्यांच्या तीन पिढ्यांपर्यंत (म्हणजे दादासाहेबांच्या वडिलांपर्यंत) तीन गांव इनाम दिले होते.

या नरसोबांचे थोरले चिरंजीव श्री. केशवराव हे राष्ट्रपितामह दादाभाई नौरोजींचे मुंबईच्या एकाच शाळेंतील सहाध्यायी. या शाळेंत इंग्रजी शिक्षण उत्तम प्रकारें घेतल्यानंतर त्यांनीं आपल्या वडिलांप्रमाणें सरकारची नोकरी न स्वीकारतां खासगी शिक्षणसंस्थेंत शिक्षकाची नोकरी पत्करली. इंग्रजाची नोकरी म्हणजे हरामीचें काम असें ते समजत असल्यामुळेंच त्यांनीं वडिलांचा आग्रह असतांहि सरकारी नोकरी पत्करली नाहीं. हा पेशा करीत असतांना संयोगवशात् ते कोल्हापूरचे तिसरे शिवाजीमहाराज व त्यांचे बंधु चिमासाहेब याना इंग्रजी शिकविणारे ट्यूटर झाले होते. या काळांतच १८५७ च्या बंडाचा वणवा चहूंकडल्याप्रमाणें कोल्हापुरांतहि भडकला आणि संशयावरून श्री. केशवराव यांचेवर चिमासाहेबांना कंपनी सरकारविरुद्ध चिथावणी देण्याचा आरोप घालून त्यांची चौकशी करून त्यांना फांशीची शिक्षा सुनावली गेली होती. पण पुढें त्या वेळच्या व्हाइसरॉयनें माफी दिलेल्या लोकांत यांचें नांव येऊन ते सुटले होते. इतिहासकार केशवरावांसंबंधीं सांगतांना लिहितात :

"अमदाबादच्या मावळंकरांत साधी राहाणी, चोख व्यवहार, प्रामाणिकपणा, स्वतंत्र बाणा, करारीपणा, टापटीप, निर्मळ वर्तन, आप्तेष्टांविषयीं प्रेम, गरीबांविषयीं दयालुत्व, भरपूर ऐपत असतांहि स्वसुखाविषयीं एक प्रकारचा कंजूषपणा पण परदुःख निवारण्यांत हाताचा सढळपणा, इत्यादि अनेक सद्गुण कमजास्त प्रमाणांत आढळून येतात; पण केशवरावांच्या बाबतींत त्या सर्वांचा परमोत्कर्ष झालेला होता."

अशा सच्छील पुरुषाचे तिसरे चिरंजीव वासुदेवराव हे दादासाहेबांचे वडील. दादासाहेबांचे थोरले चुलते वामनराव हे सच्चरित्र पण अत्यंत छांदिष्ट गृहस्थ होते. लेखनाच्या व सतारवादनाच्या आणि तदनुषंगानें संस्कृत, बंगाली, इंग्रजी ह्या भाषांत प्राविण्य संपादण्याच्या छंदांत कॉलेजच्या अभ्यासाकडे व स्वतःच्या प्रकृतीकडे त्यांचें पूर्ण दुर्लक्ष झालें व ते अकालींच क्षयरोगाला बळी पडले. त्यांच्यासंबंधीं लिहितांना त्यांचे समकालीन विद्यालयबंधु दि. ब. गोविंद रामचंद्र खांडेकर, अजमीर हे लिहितात : " ...रावसाहेब (वामनराव) जर मनावर योग्य ताबा ठेवून आणि बुद्धीचा व शरीराचा जोम कायम राखून राहिले असते तर मावळंकर कुटुंबांत दुसरे तेलंग निर्माण होण्याचा मोठा संभव होता. अत्यंत सज्जन व मनमिळाऊ स्वभावाचे आणि नित्य दुसऱ्यांना मदत करण्यास तत्पर असे ते होते."

दादासाहेबांचे दुसरे चुलते श्री. दामोदरपंत हे मॅडम ब्लॅव्हॅटस्की व कर्नल ऑल्कॉट या थिऑसफी पंथाच्या आद्य प्रवर्तकांचे अल्पवयांतच कट्टे अनुयायी बनले होते. त्यांची बुद्धि अत्यंत प्रखर होती, तसें मन विलक्षण करारी व निश्चयी होतें. ईश्वरशोधामागें वेडे होऊन थिऑसॉफिस्टांच्या पंथांत एकदां पाऊल टाकल्यानंतर त्यांनीं आपलें तन–मन–सर्वस्व त्यापायीं वाहून टाकलें. लग्न झालें असतांनासुद्धां संसाराचा त्याग केला. त्यांना घराची–बायकोची पर्वा राहिली नाहीं, जेवणखाण, बसणें उठणें सर्व ब्लॅव्हॅटस्कीबाईच्याकडे होऊं लागलें. वडील व चुलते यांनीं दामोदराला त्यापासून परावृत्त करण्याचे आटोकाट प्रयत्न केले, पण ते सर्व व्यर्थ जाऊन त्यांना शेवटीं दामोदराला मुकावें लागलें. दामोदरपंत नित्यनियमानें आपलें दिनवृत्त लिहीत असत. तें थिऑसॉफिकल सोसायटीनें प्रसिद्ध केलें आहे, त्यांत दामोदरपंत हे तिबेटांत 'महात्मा कुतुहमी 'चें शिष्यत्व पत्करण्यासाठीं तिकडे पोचले, एवढी ता. २३ एप्रिल १८८२ पर्यंतची माहिती मिळते. पुढें त्यांचें काय झालें हें एक ईश्वरालाच माहीत. "दामोदरपंत अद्याप जीवंत असून हिमालयांतील गुरुदेवासंनिध आपल्या भावी कार्याची तयारी मोठ्या तत्परतेनें करीत आहेत आणि लवकरच ते परत येतील" अशीं आश्वासनें मोठमोठे थिऑसॉफिस्ट आज ४०–५० वर्षें देत आले

आहेत; पण त्या आश्वासनांत आतां दम राहिलेला नाहीं. थिऑसॉफिस्टांच्या ग्रंथांत दामोदर मावळंकर हा 'युरेनस' ग्रहाचा पृथ्वीवरील अवतार असें प्रतिपादलें आहे. दामोदरपंतांचा उल्लेख ते Olympia ( ऑलिंपिया ) या नांवानें करतात.

दादासाहेबांचे वडील श्री. वासुदेवराव हे सन १८८४ मध्यें बी. ए. व १८८९ मध्यें एल्एल्. बी. झाले. शिक्षण घेत असतां त्यांना मराठी पुस्तकें वाचण्याचा मनस्वी नाद असे. मोरोपंत काव्याचें त्यांचें पाठांतर जबर होतें. त्यांचा मराठीचा व्यासंग व अभिमान मोठा होता. गुजरातेंत राहिलेल्या महाराष्ट्रीय मंडळीच्या भाषणांत गुजराती शब्द आल्यास तोहि त्यांना खपत नसे. एल्एल्. बी. झाल्यानंतर वकिली करण्यासाठीं म्हणून ते अमदाबादेस आले. पण तो धंदा त्यांना मनापासून आवडला नाहीं. म्हणून त्यांनीं डिस्ट्रिक्ट जजाच्या शिरस्तेदाराची नौकरी पत्करली. पुढें ३ वर्षांनीं गोध्रा येथें ॲक्टिंग मुन्सफ म्हणून त्यांची नेमणूक झाली, पण ६ महिन्यांतच त्यांची कुलाबा जिल्ह्यांत महाड येथें बदली होऊन ते तेथें कायम मुन्सफ झाले. पुढें सन॰ १८९६ च्या मे महिन्यांत रत्नागिरी जिल्ह्यांत देवरुख गांवीं व तेथून १९०० सालीं राजापुरास त्यांच्या बदल्या झाल्या. अतिशय काम केल्यामुळें राजापुरीं असतांनाच ते उदराच्या विकारानें आजारी पडले आणि आपल्या कामाचा चार्ज दुसऱ्याकडे देऊन अमदाबादेस घरीं जाण्याकरितां निघाले असतां वाटेंत मुंबई मुक्कामींच दुखणें विकोपास जाऊन वयाच्या अवघ्या ३९ व्या वर्षी तारीख ११।२।१९०४ रोजीं ते वारले. वासुदेवरावसुद्धां आपलें काम निःस्पृहतेनें व लोकांस खरा न्याय देण्याच्या कळकळीनें करीत असत. त्यांनीं केलेले निकाल अपीलांत शेवटपर्यंत कायम राहिले आहेत. हायकोर्टांतहि त्यांच्या कामाची वाहवा होत गेली.

खासगी आयुष्यांत ते अत्यंत नीतिमान् व अन्यायाची चीड बाळगणारे होते. गर्भश्रीमंत व अधिकारपदावर असतांनासुद्धां त्यांची राहणी अगदीं साधी असे. मनानें व हातानेंहि ते फार उदार होते. संवत् १९५६ च्या गुजरातेंतील दुष्काळांत त्यांनीं आपल्या इनाम गांवांकडून

येणाऱ्या २५००–३००० रुपये वसुलाची तर गांवांना सूट दिलीच, पण वर पदरचे १०००० रुपये खर्चून आपल्या गांवांच्या लोकांस दुष्काळाची झळ थोडीदेखील लागूं दिली नाहीं. ते आपला खर्चवेंच इनामदारीच्या उत्पन्नांतून न करतां आपल्या दरमहाच्या २०० रु. पगारांतून करीत. वडिलार्जित संपत्ति ही आपल्याजवळ ठेव आहे, साधल्यास तिच्यांत आपण भर टाकावी, पण आपल्या चैनीकरितां तिची उधळपट्टी करण्याचा आपल्याला अधिकार नाहीं. असें ते स्वतः मानीत व मुलांच्याहि मनावर बिंबविण्याचा प्रयत्न करीत.

दादासाहेब अल्पवयाचे असतांनाच त्यांचे वडील वारले. तथापि दादासाहेबांना आपल्या वाडवडिलांविषयीं जो विलक्षण पूज्यभाव व अभिमान वाटतो तो अवास्तव नाहीं हें वरील धांवत्या इतिहासावरून सहज दिसून देईल. आपला पिंड ज्यांच्या तपश्चर्येमुळें सच्छील व सत्यनिष्ठायुक्त बनला त्या पूर्वजांविषयीं अपार श्रद्धा ज्याच्या अंतःकरणांत वसत नाहीं तो सत्पुत्र कसला? ती श्रद्धा दादासाहेबांच्या ठिकाणीं उत्कटत्वानें वसत असल्यामुळेंच त्यांना आपल्या घराण्याचा इतिहास जाणून घेण्याची, तो इतिहास घडविणाऱ्या पुण्यश्लोक आत्म्यांचीं चरित्रें अभ्यासण्याची तळमळ लागून त्यांनीं कोंकणांतील एका कोपऱ्यांत असणारें आपलें मूळ स्थान मुद्दाम जाऊन पाहिलें, तेथील नामशेष झालेल्या घरांच्या चौथऱ्यांचें व पडक्या अवशेषांचें दर्शन घेतलें, कुळांतील इतस्ततः पसरलेल्या सर्व विद्यमान बांधवांना एकत्र आणण्याचा प्रयत्न केला, त्यांच्याकडील जुने कागदपत्र व हकीकती मिळविण्याचे प्रयत्न केले आणि कुळस्वामीच्या देवळाच्या जीर्णोद्धाराच्या निमित्तानें कुळधर्माच्या स्मृतीला उजळा देण्याचा उपक्रम केला. ‘मावळंकर सरदेसाई घराण्याचा इतिहास’ हा ग्रंथ दादासाहेब आणि त्यांचे अनुभव–ज्ञान–वृद्ध सहकारी यांच्या संयुक्त प्रयत्नाचेंच दृश्य फळ आहे.

पण केवळ वडिलांच्या कीर्तीवर दादासाहेब थोर झालेले नाहींत. त्यांचें स्वतःचें चारित्र्य तसेंच श्रेष्ठ आहे व तें तसें ठेवण्याचा त्यांचा जागरूकपणें अव्याहत प्रयत्न आहे. त्यांचें आत्मचरित्र जेव्हां केव्हां

प्रसिद्ध होण्याचा योग येईल तेव्हां व्यक्तिगत व सामाजिक दोन्ही व्यवहारांत त्यांनीं आत्मशुचित्व राखण्याकरितां केलेल्या प्रयत्नांचें दर्शन आपणांस होईल. पुनर्जन्माचा सिद्धांत मानणाऱ्या गीतेनें योगभ्रष्ट हा ‘ शुचि–साधनवंतांच्या घरीं जन्मास येतसे ’ व तेथें तो आपल्या ‘ पूर्वजन्मींचा बुद्धिसंस्कार जोडूनी मोक्षार्थ करितो यत्न पूर्वींहूनि पुढें पुनः ’ असें म्हटलें आहे. ही भाषा जरी सोडून दिली तरी दादासाहेबांचें चरित्र हें सामान्य क्षेत्रांतील सत्यनिष्ठेच्या प्रयोगाचें एक ठळक उदाहरण सहज म्हणतां येईल, यांत शंका नाहीं.

दादासाहेबांचा जन्म ता. २६ नोव्हेंबर १८८८ रोजीं झाला. त्यांचें मराठी ५ व इंग्रजी ५ यत्ता शिक्षण महाड, देवरुख व राजापूर या ठिकाणीं झालें. पुढचें सर्व शिक्षण अमदाबादेस त्यांच्या मातामहांच्या देखरेखीखालीं झालें. १९०४ सालीं ते मॅट्रिक; १९०८ सालीं बी. ए. व १९११ सालीं एल्एल्. बी. च्या पहिल्या वर्गात तिसरा नंबर येऊन ते उत्तीर्ण झाले. कॉलेजांत शिकत असतांना १९०७ सालच्या सुरतेच्या राष्ट्रीय सभेच्या बैठकीस एक प्रेक्षक म्हणून ते गेले होते. तेथें बाबू अरविंद घोष व कै. गोपाळ कृष्ण गोखले यांच्या भाषणांनीं त्यांच्या तरुण व भावनाप्रवण मनावर परिणाम केला व स्वदेशसेवाव्रताची आवड त्यांच्या मनावर पक्की बिंबली. डॉक्टर व्हावें असें त्यांच्या मनाला जरी वाटत होतें तरी घरचीं माणसें मुलाला एकट्याला घर सोडून मुंबईस ठेवण्यास तयार नसल्यामुळें त्यांनीं कायद्याची परीक्षा दिली खरी, परंतु डिग्री मिळविल्यानंतर वकीलीस आरंभ न करतां देशसेवेस आरंभ कसा करावा याचाच ते विचार करूं लागले होते. लो॰ टिळकांविषयीं त्यांना पूज्यभाव खरा, पण श्री. गोखले यांच्याविषयीं त्यांना भक्ति वाटत असे. डेक्कन एज्युकेशन सोसायटी अथवा सर्वंट्स् ऑफ इंडिया सोसायटी यांपैकीं कोणत्या तरी संस्थेस जाऊन मिळावें याकडे त्यांच्या मनाचा ओढा होता. परंतु घरच्या माणसांच्या व इतर स्नेही मंडळींच्या आग्रहामुळें घर न सोडतां अमदाबादेस वकिली चालू करावी व ती चालवून जितकी देशसेवा करतां येईल तितकी करावी आणि देशसेवेच्या आड वकिली धंदा येऊं लागला तर धंदा सोडावा असें ठरवून ते १९१३

पासून वकिली करूं लागले. लोकसेवेच्या कार्याचा श्रीगणेशाहि त्यांनीं याच सालापासून सुरूं केला. अमदाबादेस 'गुजरात एज्युकेशन सोसायटी' दि. ब. अंबालाल साकरलाल नांवाच्या एका थोर सेवानिवृत्त गृहस्थांनीं शिक्षणप्रचाराच्या हेतूनें स्थापन करण्याचें ठरविलें. त्या कामीं त्यांनीं तरुण व सेवाभावी दादासाहेबांचें साह्य मागितलें व दादासाहेब आनंदानें त्या संस्थेचे सेक्रेटरी झाले. या सेवाकार्याच्या प्रारंभकालांतच दादासाहेबांच्या सुदैवानें त्यांना दिवाण बहादुरासारख्यांच्या थोर सहकार्याचा लाभ मिळाला. 'त्याचाहि आपल्या जीवनावर परिणाम झालेला आहे' असें दादासाहेब कृतज्ञतापूर्वक सांगतात. दिवाण बहादुरांच्या चारित्र्याविषयीं व अनेक गुणांविषयीं सांगतांना दादासाहेबांनीं पुढील एक छोटीशी गोष्ट सांगितली :

"एकदां संस्थेच्या कचेरींत संस्थेची बैठक बोलावली होती. वेळ ५ ची ठरली असावी. मी ५ मिनिटें अगोदर गेलों होतों. दि. ब. आले नव्हते. पांचाचे ठोके पडूं लागले आणि शेवटच्या ठोक्याला दि. ब. चीं पावलें पायऱ्यांवर पडूं लागलीं. आंत येतांच प्रथम त्यांनीं मंडळींची 'उशीरा'बद्दल दिलगिरी व्यक्त करून माफी मागितली. मी त्यांना म्हटलें, 'आत्तांच तर पांचाचे ठोके पडले, आपल्याला उशीर झाला असें म्हणतां यायचें नाहीं.' लगेच दि. ब. उत्तरले, 'ठोके संपल्यानंतर मी आंत हजर झालों. ट्रेन असती तर ती थांबली असती का?' यावरून क्षणाक्षणाला ते किती जपत असत तें वैशिष्ट्यानें दिसून येतें." दादासाहेबांवर या त्यांच्या वैशिष्ट्याची छाप पडलेली दिसून येते.

१९२१–२२ सालच्या असहकाराच्या काळीं राष्ट्रीय सभेच्या आदेशाला मान देऊन दादासाहेबांनीं वकिली सोडून दिली होती. १९२३ सालीं त्यांनीं ती फिरून सुरूं केली. कुटुंबासंबंधींचें आपलें कांहीं कर्तव्य आहे आणि तें कर्तव्य पार पाडण्याकरितां वकिली सुरूं करणें अवश्य आहे असा विचार करूनच त्यांनीं ती सुरूं केली. यासंबंधींच्या विचारांची भवती न भवती पुढेंहि दादासाहेबांच्या मनांत नित्य चाललेली दिनवृत्तांतील मजकुरावरून दिसून येते. असो.

पुढें दिनवृत्तांत एके ठिकाणीं दादासाहेबांनीं म्हटलें आहे कीं ' स्वे स्वे कर्मण्यभिरतः ' ( आपुल्या आपुल्या कर्मी दक्ष ) तो, मोक्ष' मिळवूं शकतो. मी माझ्या स्वीकारलेल्या कामांतच रमून राहिलों तरी ती एक पूजाच आहे. आपल्या व्यवसायाला देवाची पूजा समजणारा तो व्यवसाय किती शुद्धान्तःकरणानें करीत असेल हें सहज समजण्याजोगें आहे. दादासाहेबांनीं. वकिली चालविली ती सत्यनिष्ठेला धरून. ' वकिलाचें काम म्हणजे सत्य प्रकट करण्यास न्यायाधीशास मदत करणें हें होय ' असें गांधीजींनीं एके ठिकाणीं म्हटलें आहे. दादासाहेबांचा वकिलीचा सारा व्यवसाय या तत्त्वाला धरूनच झाला म्हणावयास हरकत नाहीं. थोडकासा खोटेपणा अथवा खुशामत केली असतां किंवा वशीला लावला असतां काम फत्ते होण्याजोगें असलें तरी ' व्यवहारा 'च्या नांवाखालीं त्यांनीं असल्या प्रकाराचा आपल्या धंद्यांतील नीतीलासुद्धां बट्टा लागूं दिला नाहीं. " खोटेपणाशिवाय वकीली चालत नाहीं हें म्हणणें साफ चुकीचें आहे, वकीलानें सत्याचाच पुरस्कार करावयाचें ठरविलें तर पक्षकारसुद्धां सत्याचा पुरस्कार करण्याला राजी होतात असा माझा अनुभव आहे " असें दादासाहेबांनीं मला सांगितलें. आणि तरीहि त्यांना धंद्यांत कधीं खोट आलेली नाहीं, उलट त्यांची साख त्यांच्या चोख नीतिमत्तेमुळें वाढत गेल्यामुळें उत्तरोत्तर त्यांचा व्यवसाय भरभराटतच गेला. जुने ( सीनियर ) वकील त्यांच्या या आदर्शवादाची कुचेष्टा करीत, पण त्यामुळें दादासाहेब कधीं नाउमेद झाले नाहींत किंवा त्यांनीं आपल्या धोरणांत फरक केला नाहीं. खोटें करणें, लपविणें वा यत्किंचित्सुद्धां खुशामत करणें हें त्यांच्या स्वभावांतच बसत नाहीं.

प्रथम फौजदारी कामेंसुद्धां ते घेत असत. पण असल्या कामांत न्याय व कायदा बाजूला राहून पैसा आणि वशीला यांचीच सरशी होते आणि आपल्या सत्यनिष्ठेला मुरड घालावी लागते हा अनुभव आल्यामुळें त्यांनीं फौजदारी कामें घेण्याचें सोडूनच दिलें.

वकिलीचा धंदा करतांना लोकांचें भलें करण्याचें तें एक साधन हीसुद्धां दृष्टि त्यांनीं बाळगली होती. पतिपत्नींचें, पिता–पुत्रांचें, मालक–

मजुरांचें, स्नेह्यास्नेह्यांचें वांधें आलें आणि ती केस यांच्याकडे आली तर त्यांच्यांतील तडा जास्त न जातां तो सांधावा, समाजाची नीति सुधरावी असाच मार्ग ते काढण्याचा प्रयत्न करीत. शेवटीं कायदा हा माणुसकी टिकविण्यासाटीं साहाय्यक म्हणूनच निर्माण झाला ना, मग कायदेशीर निर्णयांतून माणुसकीला विघातक असे परिणाम न निपजतील असें पहाणें हें कायद्याशीं संबंध असणाऱ्या सर्वांचें कर्तव्य आहे, असें दादासाहेब मानतात आणि तसाच त्यांनीं व्यवहार केला आहे. अनेक कुटुंबांचें नैतिक वातावरण दादासाहेबांमुळें टिकून राहिलें आहे. आपल्याकडे आलेल्या केसकडे एक सामाजिक समस्या या दृष्टीनें ते पहात असल्या-मुळें या बाबतींत त्यांना नमूद करून ठेवण्याजोगे असंख्य अनुभव आले आहेत व मनुष्य स्वभावाच्या अनेक अंगांचा त्यांना अभ्यास करावयाला मिळाला आहे. या आपल्या अनुभवांचा समाजशास्त्राचा अभ्यास या दृष्टीनें फार मोठा उपयोग होण्याजोगा आहे असें ते नेहमीं म्हणतात.

जी गोष्ट वकीलीच्या धंद्याच्या बाबतींत तीच सार्वजनिक कार्याच्या बाबतींत. सार्वजनिक कार्याचीसुद्धां एक नशा येऊं शकते, आणि त्या नशेच्या भरांत जीवनाचा तोल मनुष्य गमावूं शकतो. तो तोल ज्याचा गमावला त्याला आयुष्यांत समाधान कोठलें? असंख्य कार्यकर्त्यांच्या जीवनाची हीच तऱ्हा झालेली नित्य दृष्टोत्पत्तीस येते. दादासाहेबांनीं जीवनाचा तोल संभाळण्याचा प्रयत्न केलेला आढळून येतो. आपला आदर्श कोणता, आपल्या शरीराची व मनाची शक्ति किती, आपली पुढें जाण्याची गति किती, आपल्यावरील जबाबदारी कोणती, आपलें कर्तव्य कोणतें, कोणत्या वेळीं काय केलें असतां तें कर्तव्याला धरून होईल, या सर्व गोष्टींचा सारासार विचार दादासाहेबांच्या मनांत नित्य होत असतो आणि तदनुरूप ते आपल्या आचरणाची दिशा आंखतात. १९३० सालची साऱ्या देशाला हलविणारी चळवळ दादासाहेबांच्या तरुण देशभक्त हृदयाला हलवून सोडल्यावांचून कशी राहील? यासंबंधींचें त्यांच्या मनाचें चित्र त्यांच्या दिनवृत्तांत आलें आहे. पण केवळ भावनेच्या आहारीं जाऊन व आपल्यावरील जबाबदारी विसरून त्यांनीं वकिलीचा त्याग केला नाहीं व तु[illegible] रस्ता धरला नाहीं. आपल्यावरच्या

जबाबदाऱ्या पार पाडीत असतांना जें करणें शक्य असेल तें करण्याकरितां ते आपली सारी शक्ति खर्ची घालतील. १९३० सालीं वकिली सोडून, कायदेभंग करून तुरुंगांत जाण्याची त्यांची तयारी नव्हती, तरी राणपूर गांवीं पोलिसांनीं जे अत्याचार केले ते ऐकून त्यांची चौकशी करण्यासाठीं गुजरात प्रांतिक समितीनें नेमलेल्या समितीचे अध्यक्ष म्हणून तेथें जाऊन पोलिसांचा हुकूम धाब्यावर बसवून त्यांनीं चौकशी आरंभली आणि त्यासाठीं आनंदानें कैद पत्करली.

पुढें कित्येक वर्षांनीं, कुटुंबाची जी सेवा करणें ती योग्य रीतीनें व योग्य काळपर्यंत आपण केली, आतां समाजसेवेकडे अधिकाधिक लक्ष पुरवूं असें ठरवून त्यांनीं वकीलीचा जवळ जवळ त्याग केला आणि अंगीकृत कार्यांत ते सर्वस्वीं तन्मय झाले—मग तें कार्य म्युनिसिपालिटीचें असो किंवा राष्ट्रीय सभेचें असो. आणि असें सार्वजनिक कार्य करतांनासुद्धां त्यांनीं नीति कधीं सोडली नाहीं. आपल्या पक्षाचा येनकेन प्रकारेण जय व्हावा असा अभिनिवेश धरून त्यांनीं वेडीं वांकडीं साधनें कधींहि उपयोगांत आणलीं नाहींत. उलट पक्षनेत्यांनीं तशीं साधनें वापरण्याचें योजलें तर त्यांची कानउघाडणी करण्यालाहि त्यांनीं मागें पुढें पाहिलें नाहीं. एका राजकीय पक्षाचे ते सभासद असतांनासुद्धां पुढाऱ्यांना नम्रतापूर्वक नैतिक विरोध करण्याचें धैर्य त्यांनीं दाखविलें आहे. पण त्यामुळें स्वपक्षांतहि त्यांची प्रतिष्ठाच वाढत गेली आहे आणि आज स्वतंत्र हिंदराष्ट्राच्या पहिल्या लोकसभेचा पहिला अध्यक्ष होण्याचा मान त्यामुळेंच त्यांच्या वांट्याला आला आहे ही गोष्ट निर्विवाद आहे. 'सत्य हें पक्षातीत आहे; असत्य, मग तें आपल्या म्हटलेल्या पक्षांत असलें तरी तें उघड करून काढून टाकलें पाहिजे, आणि सत्य विरुद्ध पक्षांत असलें तरी तें उचलून धरलें पाहिजे, या नीतीमुळें पक्षापक्षांतील अंतर कमी कमी होण्याला मदत होत असते' असें ते स्वानुभवानें सांगतात. अमदाबादच्या म्युनिसिपालिटींत वल्लभभाईंना विरोध करणारा एक मोठा धनिकांचा पक्ष होता. दादासाहेब हे वल्लभभाई–पक्षाचे होते, तरी या विरोधी पक्षांतील सर्वांचा दादासाहेबांवर पूर्ण विश्वास असे आणि तें आपलीं कामें चालविण्याकरितां दादासाहेबांनाच वकीलपत्र देत असत, इतकेंच नव्हे तर अत्यंत खासगी

बाबतींतसुद्धां विश्वस्त मित्र म्हणून ते दादासाहेबांचाच सल्ला मानीत. सत्य आणि अहिंसेची जागरूकपणें साधना केल्याचेंच हें फळ नव्हे तर काय?

गुजरातेंतील सार्वजनिक कार्यांशीं व संस्थांशीं दादासाहेबांचा प्रगाढ संबंध आहे. १९३५ सालीं गांधीजींचें गुजरातेंत वास्तव्य झालें तेव्हां-पासून गुजरातच्या नव्या युगाला सुरुवात झाली. अनेक जुन्या संस्थांत नवजीवन संचरलें, त्याचप्रमाणें अनेकानेक नव्या संस्था निर्माण झाल्या व लोकजीवन समृद्ध होत चाललें. गुजरातच्या इतिहासाच्या या मह-त्त्वाच्या घडामोडींत दादासाहेबांची कामगिरी महत्त्वाची व चिरस्मरणीय होऊन राहिलेली आहे. अशा कामांतून त्यांचा श्री. वल्लभभाईशीं आणि गांधीजींशीं संबंध आला आणि पुढें तर गुजरातच्या प्रत्येक कार्यांत ते वल्लभभाईंचे उजवे हात बनून गेले. गांधीजींनीं निर्माण केलेल्या कित्येक संस्थांचे गांधीजींच्या सांगण्यावरून ते विश्वस्त बनले व आजहि आहेत. सन १९२७ अखेरपर्यंत दादासाहेबांच्या सार्वजनिक जीवनाचा धांवता आढावा घ्यावयाचा झाला तर तो पुढीलप्रमाणें होईल:

(१) १९१३ पासून गुजरात एज्युकेशन सोसायटीचे सेक्रेटरी (२) गुज-रात सभेचे कार्यवाह (३) दुष्काळ व संकट निवारण समितीचे कार्यवाह (४) १९२१ सालीं अमदाबादच्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनप्रसंगी स्वागतकारिणीचे प्रमुख मंत्री (५) गुजरात प्रांतिक कॉँग्रेस कमिटीचे चिटणीस (६) अमदाबाद म्युनिसिपालिटीच्या कार्यकारिणीचे कांहीं काळ सभासद व कांहीं काळ सॅनिटरी कमिटीचे चेअरमन. याशिवाय कित्येक मिल्सचे व गिरण्यांचे ते डायरेक्टर होते; अमदाबादच्या महाराष्ट्र मंड-ळाचे ते सदस्य होते व मंडळाच्या कामांत संघटणा व शिस्त आणण्याचा त्यांनीं प्रयत्न केला; जुन्या जमान्यांत भारत मंत्री मॉँटेग्यूसाहेबांकडे मोर्ले-मिंटो सुधारणांसंबंधानें पाठवावयाच्या अर्जावर गुजरातभर हिंडून सह्या मिळविण्याचें प्रचारकार्य त्यांनीं केलें; १९१७–१८ सालीं खेडा जिल्ह्यां-तील पिकाच्या आणेवारीच्या चळवळींत प्रामुख्यानें भाग घेतला. १९१८ सालीं इन्फ्ल्युएंझाच्या सांथींत सेवाशुश्रूषेची मदत पोंचविण्याचें काम गुजरात सभेमार्फत केलें; १९१९ सालीं दुष्काळ निवारण्याच्या कामीं प्रामु-

ख्यानें भाग घेतला; १९२७ सालीं अतिवृष्टीमुळें साबरमतीस महापूर येऊन गांवेंच्या गांवें वाहून गेलीं त्यावेळीं आपली वकिली बंद ठेवून संकट निवारणाचेंच काम त्यांनीं कित्येक दिवस केलें.

दादासाहेबांची कौटुंबिक माहिती अशी:–त्यांचा पहिला विवाह १९०५ सालीं म्हणजे साधारणतः त्यांच्या वयाच्या १७ व्या वर्षी झाला. या विवाहसंबंधापासून त्यांना एक मुलगी झाली. पहिलें कुटुंब १९२० सालीं वारलें. त्यांचें दुसरें लग्न १९२१ सालीं झालें. या संबंधापासून त्यांना एकंदर ४ मुलगे झाले, पैकीं तिसरा मुलगा अगदीं अल्पवयांतच वारला.

दादासाहेबांचें दिनवृत्तलेखन २६ डिसेंबर १९२७ पासून सुरू होतें. तत्पूर्वीची त्यांच्या जीवनाची पार्श्वभूमि कळण्याकरितां इतका आढावा देणें आवश्यक होतें. पुढें प्रसिद्ध होणाऱ्या दिनवृत्तांच्या मजकुरांत याविषयींचे उल्लेख वरचेवर येतील म्हणून त्यासंबंधींची माहिती असणें इष्ट आहे.

महाराष्ट्र बाणा ठेवूनहि श्री. दादासाहेबांनीं गुजरातमातेची सेवा अपत्यभावानें केली आहे. महाराष्ट्र आणि गुजरात यांच्यामधील प्रेमाच्या नात्याचा ते एक अभेद्य दुवा आहेत. आणि कवतुक असें कीं गुजरात आणि महाराष्ट्र यांचा बेमालूम सांधा जमविणारे दुसरे प्रथितयश महाराष्ट्रीय श्री. काकासाहेब कालेलकर यांनीं या पुस्तकाला आपुलकीनें प्रस्तावना लिहिली आहे. हा संयोग खरोखरच अपूर्व असाच आहे, यांत शंका नाहीं.

या पहिल्या खंडाचा काळ जवळ जवळ ९ महिन्यांचा आहे. यांतील बराच भाग परदेश–प्रवास–वर्णनानें गुंतविला आहे. मुळांत हें प्रवासवर्णन याहून किती तरी विस्तृत, मनोरंजक आणि पुष्कळ माहिती देणारें आहे. पण त्यांतून अनुभवात्मक भाग तेवढाच घेणें मला योग्य वाटलें, याचें कारण आपल्याला परदेशवर्णनाशीं कांहीं कर्तव्य नसून दादासाहेबांच्या 'चरित्रां'(पाउलां)शीं आपला संबंध आहे, हें आहे.

पुढील खंडांतून दादासाहेबांच्या वैयक्तिक व सार्वजनिक जीवनांतील अनेकानेक घडामोडी दादासाहेबांच्या डोळ्यांनीं पहावयास व त्यांच्याच

मुखांतून ऐकावयास मिळणार आहेत. गांधीजी, वल्लभभाई, ठक्कर, बॅ. जयकर, आंबेडकर, फिन्ड्ले शिरास इत्यादिकांशीं त्यांचे आलेले संबंध; मजूरसंस्था, शिक्षणसंस्था, कॉंग्रेस, म्युनिसिपालिटी इत्यादिकां-विषयींची त्यांचीं झालेलीं मतें आणि अनुभव; आप्तेष्टांशीं केलेल्या पैशाच्या व्यवहाराचे परिणाम; घरच्या माणसांशीं व स्नेह्यासोबत्यांशीं वर्तन; निरनिराळ्या कला, व्यायाम इत्यादिविषयींचीं मतें, गुजराथ कॉलेज संप, १९३०–३२ सालचा कायदेभंग इत्यादि चळवळींतील त्यांचा भाग, अशी सर्व हकिकत क्रमाक्रमानें आली आहे. दादासाहेबांचें व्यक्तिगत जीवन त्यांतून उत्कटत्वानें व्यक्त होत आहे, अनेक प्रमुख व्यक्तींच्या स्वभावाची ओळख होत आहे.

दादासाहेबांनीं आपल्या 'हृद्गतां'त म्हटल्याप्रमाणें मराठी वाङ्मयांत दिनवृत्ताचा वाङ्मयप्रकार विरळा आहे. पाश्चात्य देशांतील वाङ्मयांत "Samuel Pepy's Diary", लॉर्ड मोर्ले यांची डायरी, रोमे रोलॉं यांनीं लिहिलेली डायरी, अशा अनेक डायऱ्यांच्या रूपानें हा वाङ्मयप्रकार बराच लोकप्रिय झालेला आढळून येतो. मराठी वाङ्मयांत दादासाहेबांच्या दिनवृत्तांनीं नवीनच भर पडत आहे. ती मोलाची आहे कीं कशी, मनोरंजकतेबरोबर उद्बोधकताहि त्यांत आहे कीं नाहीं वगैरे अभिप्राय मराठी वाचकवृंदानें द्यावयाचा आहे.

पं. जवाहरलालप्रमाणें स्वतःपासून वेगळें होऊन स्वतःकडे चिकित्सक दृष्टीनें पहाण्याची शक्ति दादासाहेबांमध्येंहि आढळून येते. जें त्यांनीं जसें पाहिलें–अनुभवलें, तें तसें त्यांनीं नमूद करून ठेवलें. तथापि एका व्यक्तीच्या चष्म्यांतूनच व्यक्तींचें व घटनांचें–आणि तेंहि त्या त्या वेळीं होणाऱ्या मतांच्या तात्कालिक प्रतिक्रियांसह–यांत दर्शन असल्यामुळें तें कित्येक वेळां एकांगी, एकतर्फी, अपूर्ण असण्याचाहि संभव, म्हणून वाचकांनीं त्यावरून त्या त्या व्यक्तीविषयीं वा घटनांविषयीं चटकन् आपला अभिप्राय ठरविणें अदूरदर्शीपणाचें व सत्यदर्शनास अवश्य अस-लेल्या शास्त्रीय दृष्टीच्या अभावाचें द्योतक होईल.

आमच्या आग्रहास मान देऊन व आमच्यावर विश्वास ठेवून दादा-साहेबांनीं हें आपलें हृद्गत वाङ्मय सामाजिक उपयोगासाठीं आमच्या

स्वाधीन केल्याबद्दल दादासाहेबांचें, प्रस्तावना लिहून देऊन पुस्तकाला अलंकृत केल्याबद्दल काकासाहेबांचें, परिचयाकरितां माहिती लिहितांना ज्या 'मावळंकर सरदेसाई घराण्याचा इतिहास' या ग्रंथाचा मला अतिशय उपयोग झाला त्या ग्रंथाचे लेखक श्री. गोविंदरावदादा सर-देसाई ( कोल्हापूर ) यांचे, संकलन व संपादन करतांना ज्यांच्या सल्ला मसलतीची व श्रमाची मदत झाली ते माझे मित्र श्री. मामा क्षीरसागर व प्रा. कु. मनुताई नातू यांचे मी मनापासून आभार मानतों. या ग्रंथाच्या वाचनानें चारित्र्यवान् सेवक बनण्याला तरुणांना मदत झाली तर वरील मंडळींच्या व आमच्या श्रमाचें सार्थक झाल्याचें समाधान आम्हांला मिळेल.

शुभं भवतु ।

कोल्हापूर<br>ता. २०-९-४८

सर्वांचा नम्र,<br>**भाऊ धर्माधिकारी**

# हृद्गत

॥ श्रीलक्ष्मीनृसिंहः प्रसन्नोऽस्तु ॥

सन १९२७ पासोन मी लिहीत असलेल्या दैनंदिनीं (रोजनिशीं) तील वेंचे "कांहीं पाउलें" या नांवानें प्रसिद्ध करण्याची योजना कोल्हापुरच्या महाराष्ट्र ग्रंथ भांडाराचे चालक श्री. गो. वा. कुलकर्णी यांनीं आंखली आहे, त्यांचा हा पहिला खंड आहे. या प्रकारचें प्रकाशन मराठी साहित्यांत बऱ्याच अंशीं नवीन तऱ्हेचें म्हणतां येईल. वाचक वर्गास हें कितपत उत्तेजनार्ह वाटतें तें या पहिल्या खंडाचें जें व जसें स्वागत होईल त्यावरून दिसून येईल.

मी दैनंदिनी लिहावयास सुरुवात कां केली याचा खुलासा प्रथम वाचकांस देणें अवश्य आहे; आणि त्यानंतर तींतून उतारे प्रकाशित करणें योग्य किंवा आवश्यक कां मानलें तेंहि सांगणें मला जरूरीचें वाटतें.

दैनंदिनी लिहिणारा कोण, त्याची जनसेवा किती, समाजामध्यें त्याचा दर्जा, प्रसिद्धि व लोकप्रियता किती या गोष्टी प्रकाशकाच्या किंवा वाचकाच्या दृष्टीनें महत्त्वाच्या वाटल्या तरी लिहिणाराच्या दृष्टीनें त्या गौणच आहेत. कारण आपल्या दैनंदिनीस कधीं काळीं प्रसिद्धि मिळेल किंवा पुढच्यास मार्गदर्शक म्हणून तिचा उपयोग होण्याचा संभव आहे या दृष्टीनें मी माझी दैनंदिनी लिहिलेली नाहीं. तेव्हां ती मीं कां व कोणत्या दृष्टीनें लिहिण्यास सुरुवात केली व आज तिच्या प्रकाशनास मीं रुकार कां दिला हे प्रश्न स्वाभाविकच उद्भवतात.

मला लहानपणापासून मराठी वाचनाची गोडी आहे. जेव्हां जेव्हां मी मुंबईस जाई तेव्हां तेव्हां अभिजात वाङ्मयांत मोडतील अशीं नवीं प्रकाशनें मी विकत घेऊन येत असे आणि इतर वेळ नसल्यामुळें बिछान्याच्या उशाशीं तीं सर्व ठेवीत असे. वकिलीचीं व इतर कामें आटोपून रात्रीं

१–१॥ वाजतां निजावयास जाई तेव्हां तीं पुस्तकें चाळीत असे व अशा प्रकारें मराठी वाचनाची तहान भागवीत असे.

याप्रमाणें क्रम चालू असतां सन १९२७ सालीं कै. रा. सा. विश्वनाथ नारायण मंडलिक यांचें चरित्र चाळण्यांत आलें. त्यांत पुढील अर्थाचा एक विचार आढळला: "आयुष्याच्या मोलाच्या मानानें ज्याची कांहींच किंमत नाहीं अशा पैपैशाचा हिशोब आपण ठेवतों, पण अमूल्य अशा आयुष्याचा आपण कांहींच हिशोब ठेवीत नाहीं." गोष्ट मनाला पटली व दुसरेच दिवसापासून रोजनिशी लिहिण्यास सुरुवात केली.

प्रारंभीं दैनंदिनीचा उद्देश "वेळाचा–आयुष्याचा–हिशोब" एवढाच होता व आजपावेतोंहि तोच मुख्य उद्देश आहे. दिवसाचे २४ तासांतून किती वेळ सार्वजनिक हिताचे कामीं, किती वेळ धंद्यांत व कौटुंबिक कामांत आणि विश्रांति वगैरेंत गेला, तसेंच किती वेळ व्यर्थ गेला किंवा घालविला याचा आढावा रोज रात्रीं किंवा दुसरे दिवशीं सकाळीं दैनंदिनी लिहितांना काढावा हा हेतु. या मुख्य धोरणाच्या अनुषंगानें केलेल्या कामाचा निर्देश आला म्हणजे स्वाभाविकच त्याशीं संलग्न व्यक्तींचा उल्लेख व ओघानेंच कामाविषयीं व व्यक्तीविषयीं अनुकूल अगर प्रतिकूल अभिप्राय टांचणेंहि आलेंच. अर्थात् सर्वच वेळीं सर्व गोष्टी लिहिल्या किंवा अभिप्राय टांचले असें नाहीं. वेळ मिळेल त्याप्रमाणें कमी अधिक तपशीलवार लिहिणें होई. कित्येक वेळां विशिष्ट परिस्थितीचे कारणानें–उदाहरणार्थ, तुरुंगांत असतांना किंवा एकादी गुप्त वा फारच नाजूक घटना असली तर–स्पष्ट अथवा मोघमहि कांहीं लिहिणें इष्ट नव्हतें, नव्हे अनर्थावहहि झालें असतें. १९३० ते १९३४ च्या राष्ट्रीय लढ्याचे काळांत गुजरातेंतील कॉंग्रेसचे निरनिराळ्या कामासाठीं जमविलेले फंड व त्यांतून गुप्त कार्यकरांमार्फत सविनयभंगाच्या प्रत्यक्ष चळवळीसाठीं व त्या चळवळीचे आनुषंगिक कामासाठीं लागणारे पैसे मंजूर करून ते योग्य इसमांस योग्य ठिकाणीं गुप्तपणें पोंचविण्याचें काम माझेकडेच होतें. पैसेहि माझेमार्फतच "कोठें तरी" ठेवलेले होते. पैसे माझेपाशीं आहेत व मी त्यांतून वेनियोग करीत आहें असा सर्व अधिकाऱ्यांस पक्का संशय होता.

पण त्यांचेपाशीं पुरावा नव्हता. या काळांतील बरींच प्रकरणें व घटना मनोरंजक आहेत, गुजराथेंतील स्वातंत्र्य लढयाचे इतिहासांत महत्त्वाच्या व उद्‌बोधक आहेत; पण रोजनिशींत त्यांचा उल्लेख करणें म्हणजे माझ्याच लिखाणानें मींच सरकारास पुरावा देऊन पैसे जप्त करविण्याचा मूर्खपणा पदरीं घेणें झालें असतें. याप्रकारें कांहीं बाबींचा उल्लेख रोजनिशींतून बुद्‌ध्या वगळलेला असला व जें लिहिलें आहे तें आयुष्यांतील प्रत्येक घटनेचें जरी संपूर्ण टांचण नसलें, तरी जें आहे तें पूर्ण सत्यच आहे, सत्यास सोडून विकृत स्वरूपांत दर्शन होईल असें कांहींहि लिहिलें नाहीं. कारण सत्यनिष्ठेकडे माझा जात्या ओढा, आणि रोजनिशी मी प्रकाशनासाठीं किंवा इतर कोणासाठीं लिहीत नव्हतों तर माझ्या स्वतःसाठीं, स्वतःच्या अन्तःपरीक्षणासाठीं, स्वतःचें चित्र स्वतःस कालांतरानेंहि दिसून आपल्या आयुष्याचा आढावा काढतां यावा यासाठीं लिहीत होतों. तेव्हां सत्यापलाप कां व कशासाठीं? त्यापासून फायदा किंवा उपयोग काय? आत्मवंचनेशिवाय त्यांतून काय निष्पन्न होणार? व आत्मवंचना करावयाची तर मग रोजनिशी लिहिण्याची यातायात तरी कशाला? या प्रकारचे विचारामुळें व मजकूर प्रसिद्ध होईल अशी कल्पनाहि नसल्यामुळें रोजनिशीची भाषा स्वाभाविक व स्वरूप उघडपणाचें आहे.

दैनंदिनी लिहिण्यास सुरुवात केल्यावर व बरींच वर्षे ती नियमित लिहीत गेल्यावर मला स्वतःला तो उपक्रम फारच उपकारक वाटला, व आज तर मी अशा मताचा झालों आहें कीं शक्य तर समाजांतील प्रत्येक व्यक्तीनें—लहान—थोर, स्त्री—पुरुष, प्रसिद्ध—अप्रसिद्ध, सार्वजनिक कार्यकर्ता, अधिकारी किंवा अगदीं सामान्य जीवन काढणारा, गरीब—श्रीमंत, कोणी कसाहि कां असेना प्रत्येकानें—दैनदिनी लिहावी. इंग्रजी ग्रंथकार रिचर्ड किंग यानीं आपल्या 'Some confessions of an Average Man' या ग्रंथांत म्हटल्याप्रमाणें "Every life is a Story, but most people die without that story all untold." प्रत्येक जीवन म्हणजे सत्यकथा आहे, समाजाच्या व मानसशास्त्राच्या अभ्यासाचें व इतिहासाचें साधन आहे, नवरसपरिपूर्ण असा रसाळ जीवन्त ग्रंथ आहे. मानवतेचें त्यांत दर्शन आहे.

पण व्यक्तिगत दैनंदिनीचें समाजासहि महत्त्व आहे या दृष्टीनेंहि मीं दैनंदिनी लिहिली नाहीं व तिचें प्रकाशन करण्यामध्येंहि तो मुद्दा मी स्वतः गौण मानतों. दैनंदिनी लिहिण्यामुळें लिहिणाऱ्या व्यक्तीच्या आत्मोन्नतीस मदत होते. मला त्यांत फायदे वाटतात ते पुढीलप्रमाणें:—

(१) आपल्या वेळेचा हिशोब राहातो. आयुष्याच्या क्षणाक्षणाचा उपयोग करण्याची वृत्ति आपोआप होते.

(२) या वृत्तींतूनच आयुष्याचें ध्येय काय याचा विचार होतो. आयुष्याचा उत्तम उपयोग म्हणजेच उत्तम जीवन असें वाटावयास लागून, केवळ स्वार्थ व ऐहिक लोभ यापेक्षां जनसेवा व पारमार्थिक लाभ यांकडे दृष्टि वळते. जीवनमूल्यांचे विचार येऊं लागतात. विचार व आचार–शुद्धि होऊं लागते व आपलें मुख जीवनध्येयाकडे वळतें; मन व दृष्टि आध्यात्मिक बाजूकडे वळतात.

(३) एक प्रकारचें आत्मपरीक्षण नित्य होत असतें. दिनप्रतिदिन निरनिराळ्या घटना व व्यक्ती याविषयींचे वेगवेगळ्या प्रसंगीं दर्शविलेले विचार किती बरोबर आहेत व किती चूक आहेत हें तुलनात्मक पहातां येतें–दिसतें. त्यामुळें मनाचा कल आत्यंतिक न राहातां समतोल ( Judicial ) राहातो. "मी नेहमींच बरोबर असतों. माझे हातून चूक होतच नाहीं" असा मिथ्याभिमान गळत जाऊन लिहिणारा विनम्र होतो, कारण त्याच्या चुका दुसरा कोणी दाखवीत नसून तोच स्वतः पहात असतो.

(४) आपल्या चुका दिसूं लागल्या कीं दुसऱ्यांच्या चुकांकडे पहाण्याचा दृष्टिकोण लगेच बदलतो. जास्त सहिष्णुता व उदारता येऊं लागते. गैरसमजास कमी थारा मिळतो. "माझ्याविषयीं दुसऱ्यांचा गैरसमज जर मला दिसतो व लोक गैरसमज कां करून घेतात याविषयीं मला उद्वेग व प्रसंगीं संतापहि येतो तर दुसऱ्यांविषयीं मी गैरसमज तर करून घेत नाहीं ना ?" असा विचार नेहेमीं जागृत राहातो. यामुळें दुसऱ्याविषयींची वृत्ति उदार व आदराची राहाते. शरीरास जसा व्यायाम तसाच कांहींसा प्रकार मनाच्या वृत्तीच्या बाबतींत दैनंदिनीचा आहे असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं.

वरीलप्रमाणें दैनंदिनी लिहीत होतों, तिचा जरी आत्मचरित्राचें साधन म्हणून उपयोग आहे, तरी पण तसें साधन म्हणूनहि कांहीं ती मीं लिहिलेली नाहीं किंवा लिहीत नाहीं. आत्मचरित्र लिहावें असा विचार सन १९३६–३७ चे सुमारास आला होता. पुढें कधीं आपल्या कुटुंबाचा पुढील इतिहास लिहिण्याची जर एकाद्या वंशजास इच्छा झाली तर निदान माझ्याविषयींची व मला ज्ञात असलेली माहिती त्याला संपूर्ण उपलब्ध व्हावी म्हणून ती सविस्तर टिपून ठेवण्याच्या केवळ कौटुंबिक हेतूनें प्रेरित होऊन मी प्रथम आत्मचरित्र लिहिणार होतों. पण १९४० सालीं श्री. वल्लभभाई व मी साबरमती तुरुंगांत एकच दिवस एकत्र असतांना, गुजरातेंतील "गांधीयुगा"चा एक सर्वांगीण इतिहास लिहिला गेला पाहिजे अशी वल्लभभाईनीं बोलतां बोलतां सूचना केली, ती मला पूर्णपणें पटली व या इतिहासाशीं ज्यांचें जीवन संलग्न झालेलें आहे अशा व्यक्तींच्या आत्मचरित्राने हा इतिहास अधिक सत्यप्रकाशक, मनोरंजक व उद्बोधक होईल असें मला वाटलें आणि त्या दृष्टीनें स्वतःचें चरित्र लिहिण्यांतील माझा पूर्वींचा संकुचित हेतु विशाल झाला. मीं त्याप्रमाणें आत्मचरित्र फुरसत मिळेल तसें लिहावयास घेतलें व तें १९२२ च्या काळापर्यंत कच्च्या स्वरूपांत पूर्ण करीत आणलें. पुढें अर्थात् वेळेच्या अभावीं तें काम तसेंच पडून राहिलें.

१९४७ मध्यें आत्मचरित्रासाठीं दैनंदिनी चाळल्यास त्यांतून कांहीं भाग उपयोगी होतील असें वाटल्यावरून त्या भागांच्या नकला करविण्यासाठीं दैनंदिनीवर मीं खुणा केल्या व कांहीं नकला करवूनहि घेतल्या. याचवेळीं, अमदाबादेस महाराष्ट्रीय मंडळींची 'महाराष्ट्र समाज' म्हणून एक सस्था आहे, तिचें मुखपत्र 'समाज पत्रिका' नांवाचें एक पाक्षिक आहे, त्यासाठीं मी कांहीं तरी लिहावें असा त्या पत्राच्या संपादकांनीं आग्रह केला. मीं नवें लिहिणार तरी काय? व मला वेळ तरी कोठें होता? "दैनंदिनींतील उतारे करविले आहेत, छापाल का? वाचकांस कसे वाटतील, कितपत आवडतील, कोण जाणे? पण एका 'धडपडणाऱ्या' व्यक्तीच्या जीवनांतील कांहीं प्रसंग व विचार पहावयास मिळतील," असें मीं त्यांस म्हटलें. त्यांनीं ते

उतारे घेऊन ‘ एका सेवकाच्या रोजनिशींतून ’ या मथळ्याखालीं छापण्यास सुरुवात केली. ज्यांनीं ते वाचले त्यांपैकीं मला ओळखणाऱ्या मंडळींनीं हा ‘ सेवक ’ कोण तें जाणलें व ज्या कांहीं वडील मंडळीस मुद्रितें पाठविलीं त्यांना ह्या प्रसिद्धीकरणाची कल्पना पसंत पडली व “ एका लहानशा पाक्षिकांत सर्व कसें छापून होणार ? किती काळ जाणार ? स्वतंत्र पुस्तक रूपानेंच प्रसिद्ध करावें; मनोरंजक व उद्‌बोधकहि होतील ” असें त्यांनीं सांगितलें. अर्थात् त्यांचें मत जरी प्रामाणिक आहे तरी त्यांना माझेविषयीं आपुलकी आहे म्हणून मी तें सर्वस्वीं ग्राह्य व बिनचूक म्हणत नाहीं. तरी पण उतारे प्रसिद्ध करण्यांत अहंता किंवा औचित्यभंग नाहीं एवढें मात्र त्यांचे अभिप्रायावरून खास वाटलें.

उतारे प्रसिद्ध करावे, असें मनानें ठरविल्यावरहि पुढील काम बरेंच व महत्त्वाचें होतें. भाषेच्या दृष्टीनें त्यांत फेरफार करावयाचे नाहींत असें नक्की होतें; तरी पण त्या दिशेनेंहि थोडेंबहुत पहाणें आवश्यक होतें. कोणता भाग ठेवणें, कोणता न भाग ठेवणें, उतारा समजण्यासाठीं रोजनिशीचा कोणता संदर्भ–भाग आणखी घालणें, छापखान्यासाठीं हस्तलिखित तयार करणें, मुद्रितें तपासणें वगैरे अनेक कामें होतीं; तीं करण्यास तर दूरच पण त्यावर देखरेख ठेवून वरचेवर सूचना देण्यासहि मला इतर व्यवसायांमुळें वेळ मिळणें कठीण–अशक्यच. तेव्हां हें काम सर्वस्वीं श्री. कुलकर्णी यांचेकडेच दिलें. या श्रमास मर्मज्ञ व आपुलकी असणाऱ्या संपादकाची आवश्यकता होती. श्री. भाऊ धर्माधिकारी यांनीं यासाठीं सवड काढण्याचें स्वीकारल्यानें ह्या प्रकाशनाच्या पहिल्या भागाचें संकलन व संपादन त्यांनींच केलें आहे व मी तें नजरेखालून घातलें आहे.

दैनंदिनींतील मजकुराची मांडणी कशी करावी हा एक विचार करण्यासारखा प्रश्न होता. विषयवार वर्गीकरण करून उतारे छापावे कीं ज्याप्रमाणें दिनानुक्रमें दैनंदिनी लिहिली गेली त्याप्रमाणें छापावी हा मुख्य प्रश्न होता. विषयवार छापण्यामध्यें एकाच विषयाविषयीं माहिती व विचार एकत्रित मिळाले असते हें खरें, पण माहिती किंवा माझी

मतें वा विचार देणें ह्याच कांहीं केवळ या प्रकाशनाचा मुख्य हेतु नाहीं. कांहीं नवीन किंवा अमूल्य असें त्या दृष्टीनें यांत कांहींच नाहीं. परंतु एका सामान्य माणसाच्या, सार्वजनिक कार्यकर्त्याच्या कामाचा, मनाचा व विचारांचा विकास कसकसा होत गेला, वेळोवेळीं त्याला काय अनुभव आले, समकालीन कार्यकर्त्यांशीं तो कितपत व कसा समरस झाला किंवा झाला नसेल तर त्याला कां समरस होतां आलें नाहीं, सार्वजनिक कार्य, कुटुंबीय संबंध, धंदा वगैरे निरनिराळ्या क्षेत्रांतील जीवन एकाच सूत्रानें कसें बद्ध असतें, वगैरे अनेक गोष्टी दैनंदिनीच्या क्रमवार लिखाणावरूनच सुसंबद्धपणें समजून येण्यासारख्या असल्यामुळें तशीच मांडणी ठेवावयाचें ठरलें. यांत ही दैनंदिनी प्रकाशित करण्याचा हेतुहि साध्य होतो.

शेवटीं ज्या ज्या वडील व आप्तेष्ट मंडळींनीं या कामीं प्रोत्साहन दिलें व मदत केली त्यांत रियासतकार सरदेसाई आणि कोल्हापुरचे श्री. दादासाहेब सरदेसाई यांचे व प्रकाशनाचे कामीं सर्व भार श्री. गो. वा. कुलकर्णी व श्री. भाऊ धर्माधिकारी यांनीं उचलला याबद्दल त्यांचे जितके आभार मानावे तेवढे थोडेच आहेत.

२०, अकबर रोड,<br>
नवी दिल्ली.<br>
ता. २५ माहे आगष्ट १९४८

गणेश वासुदेव मावळंकर

## शुद्ध करून घ्यावें.

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १२ | ११ | तर चोख | चोख तर |
| ४२ | ३,४ | बील | बुइल |
| ६६ | ८ | भेलों | गेलों |
| १०० | २२ | माळवंकर | मावळंकर |

# विषय सूचि



# " कांहीं पाउलें "

**ता. २६–१२–१९२७**

कै. रा. सा. विश्वनाथ नारायण मंडलिक यांचे चरित्रावरून रोजनिशी ठेवावी असें वाटलें. पैशाचा हिशेब ठेवावयाचा तर आयुष्याचा कां नाहीं ? यामागील हकिकत फुरसतीनें लिहावी असें मनांत ठरवून ही रोजनिशी चालू केली आहे. रोजनिशींत फक्त नोंदण्यासारखेच विषय आहेत. नेहमींच्या वहिवाटीच्या गोष्टींची अर्थात्‌च जरूर नाहीं असें वाटतें.

आज महत्त्वाची गोष्ट म्हणजे प्रो. आनंद शंकर ध्रुव यांच्या "वसत" मासिकाचा "रजतमहोत्सव" सायंकाळीं ४॥ वाजतां भोळानाथ साराभाई लेडीज् इन्स्टिट्यूटमध्यें झाला. प्रो. आनंद शंकर सारखे पाहुणे, दि. ब. केशवलाल ध्रुवसारखे अध्यक्ष, रा. नर्मदा शंकर सारखे वक्ते व विद्वज्जनसभा, तेथें मी काय बोलावयाचें ? परंतु रा. हिरालाल पारेख यांचा माझेविषयींचा आपलेपणा असा कांहीं आंधळा आहे कीं, मी म्हणजे कोणी तरी आहें, व मीं बोललेंच पाहिजे असा आग्रह; शेवटीं आग्रहास बळी पडलों. सकाळीं विचार करूं लागलों, काय बोलावें ? कांहींच सुचेना. शेवटीं जे चार शब्द बोलावयाचे ते लिहून काढले. मुख्य मुद्दे पुढीलप्रमाणें:–(१) जडवादी ( Materialistic ) युगांत धर्म-मूलक चळवळींची आवश्यकता प्रथम पाहाणारांपैकीं प्रो. मजकूर आहेत. (२) तत्त्वविवेचक ( Thinker ) या दृष्टीनें गुजराथला ते अमूल्य आहेत. (३) त्यांची सेवा काशी हिंदु विद्यापीठामार्फत सर्वांस मिळते; पण गुजरातला जर ती मिळूं लागली तर किती उत्तम ! (४) महाराष्ट्रीयांतर्फे प्रणामांजलि. एकंदर बोलणें पांचच मिनिटांत संपविलें. कसें झालें तें मी ठरविणें अशक्य; पण कोणीं नाकें मुरडलीं नाहींत; यावरून तें नापसंत तर पडलें नाहीं असें म्हणावयास हरकत नाहीं.

ता. २९-१२-२७

सायंकाळीं ४॥ चे सुमारास रा. मटुभाई कांटावाला घरीं आले. पहिलीच भेट. बडोदा बँकेचा मी डायरेक्टर व्हावें अशी सर लल्लुभाई सामळदास व इतर डायरेक्टर मंडळींची इच्छा असल्याचें त्यांनीं सांगितलें. आग्रह केल्यावरून रा. रांडेलसाहेबाचे बंगल्यावर गेलों. तेथें सर लल्लुभाई सामळदास, रा. भास्करराव ( भावनगरचे सर न्यायाधीश ), श्री. रांडेलसाहेब, रा. ब. गोविंदभाई हाथीभाई यांची भेट झाली. सर्वांची इच्छा मीं डायरेक्टर व्हावें अशी झाली. विचार करून सांगेन असें म्हणालों. बहुतेक रुकार दिलाच म्हणावयाचा. या बाबतींत काय करावे याचा निर्णय होणें कठीण! एक मन वाटतें कीं कबूल करावें. पैशाचे दृष्टीनें फायदा नाहीं, दगदग जास्त, वरचेवर धांवपळ अहमदाबादेहून मुंबई व बडोदें येथें करावयाची; शिवाय मला बॅंकिंगची काय माहिती? तज्ज्ञ या नात्यानें माझा काय अधिकार? अर्थात् कांहींच नाहीं. तरीपण शिकावयास तर मिळेल. पण त्याबरोबरच असें वाटतें कीं आपण-विशेषतः महाराष्ट्रीय लोकांनीं-व्यापारी बुद्धि मिळविली पाहिजे. दिवसेंदिवस सरकारी नोकऱ्या किंवा वकिली, डॉक्टरी यांजवर आधार ठेवणें ठीक नव्हे. तेव्हां त्या दिशेनें जर कांहीं पद ( पोझिशन ) मिळत असेल तर कां घालवावें? जागा मानाची किंवा कांहीं तरी दर्जाची आहे. निराळ्या तऱ्हेच्या वातावरणांत ओळखीचें क्षेत्र विस्तृत होईल. सार्वजनिक उपयोगिताहि वाढेल. या दृष्टीनें डायरेक्टर व्हावें असें वाटतें. रा. बापूसाहेब तळवलकरांसहि तसेंच वाटते. तरीपण शेट कस्तुरभाईस विचारून मग काय तें नक्की ठरवीन. आमंत्रण स्वीकारावें असें आज तरी वाटते.

ता. ३१-१२-२७

दुपारीं महात्माजींस भेटलों. त्यांची तब्येत चांगली नसल्यानें व ते आजच मद्रासेहून आले असलेमुळें तब्येतीचे समाचारासाठीं भेटणें हा

धर्म म्हणून गेलों. त्यांना मौन असल्यामुळें बोलणें झालें नाहीं व बोला-
वयाचेंहि कांहीं नव्हतें.

सायंकाळीं रा. बापूसाहेब तळवलकर यांचेकडे गेलों होतों. इतर गोष्टींतून बोलतां बोलतां " मला वेळ मिळत नाहीं " यामुळें लोक रागावतात असा एक मुद्दा निघाला. मला तर स्वतःला हें रागावणें समजत नाहीं व शिवाय त्याला उपायहि सुचत नाहीं. पुष्कळसा वेळ फुकट जातो, पण आपल्या लोकांच्या संवयीमुळे तो जातो. समाजांतील व्यक्ति या नात्यानें लोकांचे आचारविचार अगदीं बाजूला ठेवून वागूं लागलों तरीसुद्धां अडचणच! यद्यपि शुद्धं लोकविरुद्धम्! उलट हल्लींची टीकाकार मंडळी जास्तच नाखूष होतील. पण टीका ऐकून घेऊन, त्यांतील तथ्य पाहून जोंपावेतों त्या टीकेंतील दोषारोपांतून माझी मनोदेवता मला मुक्त करीत आहे तोंपर्यंत त्या टीकेपासून मी कोणतीहि गोष्ट मनाला कां लावून घ्यावी? टीकेचा उपयोग Introspection ( आत्मनिरीक्षण ) ते मी करीत आहेच. टीका कानीं आली म्हणजे पुन्हा त्याची उजळणी. कोणताहि नवीन मुद्दा आढळत नाहीं. जे माहित आहेत त्यावर प्रयत्न चालू आहेत व जे काल्पनिक दोष आहेत ते कालांतराने टीकाकारांच्या कल्पना दूर झाल्याशिवाय त्यांचे मतानें जाणें शक्य नाहीं. त्याला मी काय उपाय करणार?

ता. २-१-१९२८

संकट निवारण काम जसें चाललें पाहिजे तसें चालत नाहीं. चिटणीस या नात्याने जो वेळ मी दिला पाहिजे तितका दिला जात नाहीं, देऊं शकत नाहीं. एक मन वाटतें कीं चिटणीसाचे जागेचा राजिनामा देऊन काम चालू राखावें. पण त्यानें गैरसमज होईल. पुन्हा असें वाटतें, कांहीं तरी करून नियमित जातां येईल असें केलें पाहिजे. व एकंदर तसेंच करणें योग्य, पण कसें करावे हा प्रश्न. प्रत्येक वेळ जर ठरवून टाकतां आली तर अजूनहि भाराभर कामे करतां येतील. पण मंडळी तसें करूं

देतच नाहींत. वेळीं अवेळीं, पूर्वी ठरविल्याशिवाय भेटावयास येणें, ठरविले वेळीं न येणें वगैरे प्रकार ठरलेलेच.

आज संकट निवारण फंडाचे सभेंत मात्र एक फारच निराशाजनक गोष्ट ढळढळीत दिसली—नवी नाहीं, जुनीच आहे. पण पुनदर्शन झालेमुळें मन उदास झालें. सार्वजनिक काम करणारीं माणसें थोडीं पण परस्पर अतिशय अविश्वास, हेवा व प्रत्येकास "मी कोणीतरी आहे" असें वाटतें. हा प्रकार किती किळसवाणा व निराशाजनक आहे!

शेट ... ... आज बोलले कीं, वल्लभभाई सर्व कारभार परभारें करतात. मला तें रुचलें नाहीं. इतर कोणी कामांत लक्ष घालीत नाहीं. तेव्हां दोन मार्ग—एक तर सोडून देणें अथवा जसें होईल तसें करणें. प्रत्येकास विचारावयास जातां दिवसगत होते. कामें स्वतः तरी केलीं पाहिजेत किंवा लक्ष घालावयास वेळ नसला तर जो करीत आहे त्याचे सर्व दोष बाजूला ठेवून केलेलें काम गोड करून घेतलें पाहिजे. मला वाटतें काम करण्याइतकी त्यागबुद्धि नसून प्रत्येकास कामाचे यशाचा वाटा पाहिजे व तो जेथें मिळत नाहीं तेथेच अशी बेदिली उत्पन्न होते. पण एकंदर प्रकार सार्वजनिक कामाचे दृष्टीने किती वाईट! असो. श्री. वल्लभभाईनीं शेट ...... यांचे म्हणणे ऐकून घेतल्यावरहि फारसें न बोलतां सभेंचे काम पुढें चालू झालें त्यांत भाग घेतला. हा मात्र खरोखर त्यांचा मोठाच स्वार्थत्याग व कामाची कळकळ! मानहानि बाजूला ठेवणें हा स्वार्थत्याग सर्वांत मोठा नाहीं काय?

### ता. ५–१–२८

मुंबईहून परत येतांना आगगाडींत शेट अंबालालबरोबर निरनिराळ्या विषयांचें बोलणें झालें. त्यांत ते नियमित रोजनिशी लिहितात ही गोष्ट त्यांनीं सांगितली. कांहींहि झालें, कितीहि उशीर झाला तरी रोजनिशी लिहिल्याशिवाय निजावयाचेच नाहीं असा त्यांनीं नियम केला असून तो गेलीं चार वर्षें त्यांनीं पाळला आहे. रोजनिशींत बारीक सारीक गोष्टी लिहीत नाहींत, पण महत्त्वाच्या नोंदून फक्त जे विचार असतील ते

जरूर नोंदतात, अशी त्यांची पद्धति आहे. मला वाटतें तीच बरोबर आहे. व त्याच पद्धतीनें मीहि रोजनिशी ठेवीत आहें.

मुंबईत सॉलिसिटर खेर यांचे ऑफिसांत अंत्यज वर्गापैकीं व त्यांचे पुढारी डॉ. आंबेडकर भेटले होते. हिंदुस्थानांत जर अंत्यज वर्गास स्थान नसेल, साधारण मनुष्यत्वाचे हक्क त्यांना मिळूं शकत नाहींत, तर त्यांनीं हिंदू तरी कां राहावें? अस्पृश्यता व सार्वजनिक ठिकाणीं जेथें जेथें मुसलमान जाऊं शकतो तेथें अंत्यज हिंदू जर जाऊं शकत नाहीं तर त्या अंत्यजानें मुसलमान होणेंच काय वाईट? ही त्यांची विचारसरणी त्यांचे दृष्टीनें खरोखर निरुत्तर करणारी आहे. लोकशाहीचे युगामध्यें जेथे संख्येसहि प्राधान्य आहे तेथे अंत्यज लोक परधर्मीय होणें म्हणजे हिंदुधर्मावर केवढा आघात? अर्थात् हिंदु धर्मांत राहून तो धर्म सुधारणें हेच खऱ्या कळकळीच्या हिंदूचें कर्तव्य. धर्म सोडला तर मग तुमच्या लढाईचें कारण तुम्हीं रणांगणातून पाय काढून संपविलें असें होते, वगैरे विचारसरणी मी त्यांचेपुढे मांडण्याचा प्रयत्न केला; परंतु ती माझी मलाच पटली नाहीं. मी अंत्यज असतों आणि हिंदु समाजानें जर मला असे वागविलें असतें तर पाश्चात्य स्वतंत्रतेच्या, समान हक्काच्या वगैरे कल्पना मिळविल्यानंतर हिंदु समाजरूपी दगडी भिंतीवर डोकें आपटलें असतें कीं धर्मांतर करून व्यक्तिशः स्वतंत्रता मिळविली असती? मला वाटतें स्वतंत्रताच मिळविली असती.स्वाभाविक आहे. हल्लींचे आयुष्यक्रमांत धर्मास स्थान कोणतें व किती आहे? तो प्रधान नसून गौण आहे. व्यक्तिस्वातंत्र्य, राजकीय स्वातंत्र्य वगैरे प्रधान गोष्टी. त्या मिळविण्याच्या आड जर धर्म येत असेल तर तो धर्म बदलणें म्हणजे मरणप्राय दुःख वाटणें शक्य नाहीं. पण आमचा समाज याविषयीं केव्हां डोळे उघडणार?

ता. ८-१-२८

सायंकाळीं लॉ क्लासच्या गॅदरिंगला गेलों होतों. रा. व्यास यांनीं असें सांगितलें होतें कीं समाजाचे नैसर्गिक पुढारी वकील होत. या मुद्याविषयीं माझा मतभेद मी सांगितला. कायदा शिकणें हें सर्वस्वीं श्रेयस्कर.

तो आल्यास मनुष्य जास्त उपयोगी व बहुश्रुत होतो. त्या धंद्यामुळें मनुष्यस्वभाव समजतो. वगैरे खरें, पण वकिली धंदा करणारे कायदेपंडित हे समाजाचे नैसर्गिक पुढारी अशी मात्र गोष्ट नाहीं. समाजाचे स्थैर्याचे स्थितींत—स्वराज्यांत—कायदेपंडित हे सामाजिक आचार, नियम वगैरेसाठीं पुढारी खरे किंवा सल्लागार खरे; पण परतंत्र देशांत वकील हे नैसर्गिक पुढारी होऊं शकत नाहींत. वकिलीमुळें पुढारीपणाचे कांहीं गुण येतात. पण जेव्हां तो वकील म्हणून काम करण्याचें थांबवितो तेव्हांच तो पुढारी म्हणून काम करूं शकतो. कायद्याचे प्रॅक्टिसमुळें कांहीं वाईट गोष्टीहि जडतात. एक तर कायदा आणि नीति यांतील भेद करण्याची संवय जडते व त्यामुळें नीतीविषयीं मन बोथट होतें व दुसरें म्हणजे पुराण-प्रियता—वाटेल ती परिस्थिति बदलली, वाटेल ती जरूर वाटली तरी कायद्याचे पूर्वीचे आधारास चिकटून बसण्याची संवय—समाज जेव्हां घडामोडीचे स्थितींत असतो, समाजाचे रोगास एकाद्या अगदीं नवीन उपचाराची जरूर असते तेथें वकील निरुपयोगी, त्याची हिंमतच व्हावयाची नाहीं. शिवाय मनोरचना संशयी वृत्तीची, अनुदार वृत्तीची, व पुष्कळ अंशीं अंध भावाचीहि होत असते, असे दोष आहेत. माझा रोख अर्थातच हल्लींचे परिस्थितीवर होता.

ता. १४–१–२८

तिसरे प्रहरीं शेट अंबालाल साराभाई यांचे 'रिट्रीट' बंगल्यांत म. गांधी व इंटर–नॅशनल फेलोशिप फेडरेशनच्या कार्यकारी मंडळास भेटण्यासाठीं ॲटहोम होतें. तेथें गेलों होतों. महात्माजींजवळ कांहीं वेळ बसून इतरांबरोबरच्या त्यांच्या गोष्टी ऐकत होतों. आश्रमाचा (सत्याग्रहा-श्रमाचा) एक मुख्य उद्देश त्यांनीं सांगितला. सर्वत्र आश्रम स्थापणें शक्य नाहीं व इष्ट नाहीं. आश्रमातील राहाणी व विचार घरोघर अमलांत येऊं लागले म्हणजे झालें. म्हणून आश्रमाविषयीं व तेथील राहाणी व विचाराविषयीं ज्यांस प्रेम व आदरबुद्धि आहे त्यांनीं ती राहाणी व विचार आपलेच राहाण्यांत आणावे. आश्रमांत राहावयास येण्याची

बिलकूल जरूर नाहीं. असो—इतरहि पुष्कळ विनोद झाला—महात्माजी अलिकडे फारच गंभीर झाले आहेत असा स्वतःवर ( कांहीं ) लोकांनीं आरोप केला असल्याचें ते म्हणत होते.

रात्रौ स्वामी आनंद आले होते. त्यावेळीं प्रचलित शिक्षणाची गोष्ट निघाली. मला तर हल्लींचें हें **शिक्षण** आहे असे वाटत नाहीं. अक्षर-ओळख व भाषाज्ञान ( तेहि तुटपुंजे ) म्हणजे कांहीं शिक्षण नव्हे. सार्वत्रिक व सक्तीचें शिक्षण खरोखरच असावें काय? हेच—आहे अशाच प्रकारचें शिक्षण द्यावयाचें असेल—व दुसरे देणे शक्य तर दिसत नाहीं—तर त्याचा प्रसार जितका कमी करता येईल तितका करावा असें २।३ वर्षांपासून वाटूं लागले आहे. हल्लींच्या "शिक्षणा"ला "आदर्श" असा कांहींच नाहीं. लक्ष्यबिंदूवर लक्ष ठेवून गलबत हाकारले पाहिजे. असा मध्यबिंदु कोणता? मुलाचें शील, राष्ट्रीय भावना यास पोषक असें काय आहे? आपल्या तऱ्हेच्या व आपल्या आगच्या सामाजिक भावनेचें पोषक असें काय आहे?—अशा घोटाळ्यामुळे मला तर या शिक्षणाचा प्रसार नको असे ठाम वाटूं लागले आहे! पण याप्रमाणे बोलणारा मनुष्य किती प्रतिगामी! महात्माजी १९२१ सालीं म्हणत होते त्याचें अंधुक प्रत्यंतर आतां पटूं लागलें आहे.

## ता. १६–१–२८

'माझें रामायण' या तुळजापूरकरकृत पुस्तकाचा काहीं भाग आगगाडींत वाचला. पुस्तक वाईट नाहीं. पण एकंदर ते आकर्षक किंवा त्यांत कांहीं तरी विशेष आहे असें वाटलें नाहीं. अबू रोड स्टेशन-वर रा.... ...यांनीं 'बिल्डर्स ऑफ इंडिया' या मालेपैकीं 'रेव्हरंड नारायण वामन टिळक', 'न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे' व 'म. गांधी' यांचीं चरित्रें घेतलीं. टिळकांविषयींची हकिकत मला माहीत नव्हती व म्हणून ती नवीन वाटली. व एकंदर दुःखहि वाटलें. ख्रिस्ती झाल्याशिवाय त्यांस चैनच पडेना इतका का हिंदुधर्म अगदीं कोरडा ठणठणीत आहे? मला कांहींच माहिती नाहीं. पण सर्व

धर्मांचीं मूलतत्त्वे जवळ जवळ एकच असून सर्वांत हिंदुधर्म जुना आहे. त्यांत नाहीं असें दुसरे इतर धर्मांत असल्याचें अजून तर ऐकलें नाहीं. रूढ धर्मांविषयीं, चालीरीतीविषयीं मतभेद स्वाभाविक आहे. व त्यात सुधारणा जरूर करावी. पण येशू ख्रिस्ताच्या चरित्रानें समाधान वाटून तोच धर्म स्वीकारणें योग्य वाटलें, हें पटण्यास कठीण आहे. त्यांतून शेवटीं शेवटीं तर टिळकांचा हिंदुत्वाकडे ओढा होता असा आक्षेप त्यांचेवरच पाहिला म्हणजे त्यांचे ख्रिस्ती होण्यास कांहीं तरी दुसरीं विशिष्ट कारणें असावीं असें वाटतें. जास्त वाईट हें वाटतें कीं हिंदु धर्मांतून च्युत होऊनच ते थांबले नाहींत पण त्याविरुद्ध ख्रिस्ती धर्माच्या प्रचाराचें काम करीत राहिले—हिंदुधर्माचें दुर्दैव! यापलीकडे काय?

### ता. १७–१–२८

दुपारीं आग्रा फोर्ट पाहण्यास गेलों होतों. व सायंकाळीं तेथूनच ताजमहालचें दर्शन घेण्यास गेलों होतों. आग्रा फोर्ट प्रथमच पाहिला. मुसलमानी अंमल होता तरी पण एकंदर हिंदुस्थानाचें गौरव होतें. कालाय तस्मै नमः।

### ता. २१–१–२८

आज रोजीं सायंकाळीं सायमन कमिशनवर लोकांनीं बहिष्कार टाकावा असा ठराव करण्यासाठीं जाहीर सभा झाली. महमद अल्ली झीणा बॅरिस्टर हे मुंबईकर प्रख्यात वक्ते असलेमुळें सभेस बरीच गर्दी लोटली होती. इतकी कीं सभा प्रेमाभाई हॉलमधून नदीचे रेतींत—मैदानांत—न्यावी लागली. लोकसमुदाय दहा हजारावर भरला होता. मुख्य ठराव रुजू करण्याचें काम माझेवर सोपविलें होतें. राजश्री झीणा यांचे भाषणानंतर बोलणें, तेव्हां फारच कठीण! नुसता ठराव रुजू करून बाकी सर्व रा. झीणांनीं सांगितलेंच आहे असें म्हणून बसावें असें वाटलें.

पण रा. मगनभाई पटेल ठरावावर उपसूचना आणणार असे समजल्यामुळें चार शब्द बोलावे लागतील असें वाटलें. ते लिहून काढले. मोठ्या सभेंत व जबाबदारीचे विषयावर बोलण्यांत भाषण लिहिलेलेच बरें. सराव नसल्यामुळें वेळेवर शब्द अचूक येत नाहींत व आपले विचारहि आटोपशीर मांडण्याची संवय होण्यास भाषण लिहिलेलेंच उत्तम. स्वराज्य मागण्यानें मिळणार नाहीं व दिलें तरी तें घेतां येणार नाहीं. तेव्हां राष्ट्राची तयारी—एकी, राष्ट्रीयत्व दृष्टि, त्यागवृत्ति, वगैरेसाठीं प्रयत्न—अंतःसुधारणेसाठीं प्रयत्न पाहिजेत. जोंपावेतों इंग्रजांची अंतःकरणापासूनची भावना हिंदुस्थानास समर्थ करण्याची नाहीं, स्वतःची सत्ता जितके जास्त दिवस टिकवितां येईल तितकी टिकवावी या धोरणानें जेथे राज्यकारभार आहे, तेथें कौन्सिलद्वारां स्वराज्य कसे संभवतें ? इंग्रजांमध्यें हृदयपालट नाहीं तोंपावेतों कमिशनचा उपयोग काय ? वगैरे मुद्यावर लिहिले होतें. पुढें हा ठराव अंबालाल साराभाई यांनीं रुजू करण्याचें कबूल केलें. तेव्हां मला कांहीं बोलण्याची जरूरीच राहिली नाहीं. ठरावाचें नुसतें गुजराथी रूपांतर वाचून दुजोरा दिला.

ता. २३–१–२८

सायंकाळीं गुजराथ व्हर्नाक्युलर सोसायटीचे कार्यकारी मंडळाचे सभेस गेलों होतों. पुस्तक कमिटींत माझें नांव दाखल केलें आहे. आहेत हींच कामें पूर्ण होत नाहींत. तेव्हां जास्त नको असें मी म्हटलें. पण काम करणारीं माणसेंच नाहींत व सर्व काम तर पाहिजे. तेव्हां जसें होईल तसेंच करावें. उपाय काय ?

सायंकाळीं युवक सप्ताहाचे सभेस गेलों होतों. शेवटचा दिवस होता. लौकरच परत आलों. युवक मंडळी हल्लीचे परिस्थितींतहि इतकी चळवळ व ज्ञानप्रसार होऊनहि विलायती पोषाखांत आलेली पाहून मन उदास झालें.

ता. २४–१–२८

आज दुपारीं कोर्टांत एक अपील चालवीत असतां असि. जज्ज रा. सप्रे म्हणाले, " तुम्ही लहान केस असो, मोठी असो, तितक्याच बारकाईनें पाहातां म्हणून तुम्हांस त्रास होतो. तसें कां करतां ? " माझा प्रश्न असा आहे कीं तसें कां करूं नये ? पक्षकार त्याची केस संपूर्ण रीतीनें तपासण्याबद्दल मला फी देतो. लहान केसचे कमी पैसे व मोठ्या केसचे जास्त असा मोठा फरक नसतो, अर्थात् फरक असतो पण तो प्रमाणांत थोडा. मग एक केस व दुसरी केस यामध्यें भेदभाव करण्याचा मला कसा हक्क पोहोचतो हें समजत नाहीं. न्यायाधिशाला सर्व काहीं ठीक आहे. पण वकिलाला तसें कसें करतां येणार ? पक्षकाराची केस न्यायाधिशापुढें मांडणें हेंच त्याचे काम. मला वाटते रा. सप्रे यांनीं वकिली केलेली नसल्यामुळें पक्षकाराशीं वकिलाचें काय नाते व वकिलांचीं काय कर्तव्यें या बाबतींत आहेत याची जाणीव त्यांना नसल्यामुळे वरीलप्रमाणे विचारलें. मी जें करीत आहे तेंच कर्तव्य कर्म याच दृष्टीनें मला केलेंच पाहिजे असें माझी मनोदेवता मला सांगते.

सायंकाळीं रा. भिडे, आय्. सी. एस्., को–ऑपरेटिव्ह सोसायटीचे रजिस्ट्रार, यांजला चहासाठीं बोलावलें होतें. को–ऑपरेटिव्ह सोसायट्यांविषयीं सामान्य बोलणें चहा पितां पितां झालें. या चळवळींत भाग घेण्यास रा. भिडे यांनीं आग्रहानें सागितलें. चळवळ चागली आहे. पण एकच मनुष्य किती कामें करणार ? प्रथम वकिली, म्युनिसिपालिटी, संकट निवारण कमेटी, युवक संघ, व्हर्नाक्युलर सोसायटी वगैरे वगैरे दरेकामध्यें काम करणें अशक्य. चांगली गोष्ट, नाहीं म्हणता येत नाहीं व करावीशी वाटते या लोभानें " हो " म्हणावें. पण मला वाटतें सर्वच कामें अशानें बिघडतात. पण हेंहि खरें कीं अगदींच काम न होणें त्यापेक्षां जशीं होतील तशींच करणें हें बरें नाहीं काय ? मन अजून निश्चित होत नाहीं कीं अचूक कर्तव्य कोणतें ? हो म्हणणें कीं नाकारणें ?

ता. २५-१-२८

आज रात्रौ सर चिनूभाईकडे लहान मुलांचे नाट्यप्रयोग होते. त्यासाठीं त्यांचे 'शाहीबाग' बंगल्यावर गेलो होतों. बरोबर सौभाग्यवतीहि आली होती. संसारात नवराबायकोच्या विचारामध्ये व दृष्टिबिंदूमध्यें जें जमीन अस्मानाचे अंतर असते त्यामुळेच पुष्कळसे काल्पनिक दुःख होते. असे वाटूं लागल्यापासून सामाजिक क्षेत्रामध्ये बायकांनीहि पुरुषां-बरोबर शक्य तेथे वावरलें पाहिजे असे वाटूं लागले आहे. त्याशिवाय संसारसुधारणा व सामाजिक सुधारणाहि शक्य नाहीं. व याच दृष्टीनें सौभाग्यवतीने विलायतेसहि माझ्याबरोबर यावें असें वाटते. कितपत व कसें जमते हाच प्रश्न.

ता. ३०-१-२८

उद्यां कोर्टात रा. ...... वकील यांनीं मोतीलाल हिराभाई मिल्सचे कामांत दिलेल्या अदमासे एक हजार रुपयाच्या बिलाच्या खर्चाची आकारणी व्हावयाची होती. त्यासाठीं रात्रौ नियम पुन्हा पाहिले. असें बिल करण्याची मला तरी छाती झाली नसती. एकंदर प्रकार म्हणजे दिवसाढवळ्या कायदेशीर लूटच म्हणावयाची. विरोध करावा कीं नाहीं असा घोंटाळा होता. पण विरोध करणें हा नैतिक दृष्टीनें धर्मच आहे असे वाटून विरोध करण्याचे नक्की केले आहे. शिक्षित म्हणणारी मंडळी. यांची सद्सद्विवेकबुद्धि पैशापुढे पार कशी नाहींशी झाली ? अशा प्रकारानें न्यायकोर्टाविषयीं व वकील वर्गाविषयीं जनतेत आदर-बुद्धि कशी राहाणार ? असो.

ता. ३१-१-२८

आज तिसरे प्रहरीं म्युनिसिपल मीटिंग होती. एक प्रश्न सायमन कमिशन ता. ३ फेब्रुवारी रोजीं येणार त्या समयीं म्युनिसिपल ऑफिस, शाळा वगैरे बंद ठेवावयाच्या कीं काय हा होता. या बाबतींत मी मत

दिलें कीं कमिशनचा बहिष्कार केला पाहिजे याविषयीं मला शंका नाहीं. मी जास्त खोल पाण्यांत शिरण्याची जरूर पाहात नाहीं. जेथें देशांतील सर्व पक्षांचे व सर्व स्वभावाचे ( कडकांत कडक ते सौम्यांत सौम्य ) पुढारी एकमत आहेत तेथें मला जास्त विचार करून खोल पाण्यांत शिरण्याची काय जरूर ? सर्वांचा विचार मला ग्राह्यच आहे. त्या दृष्टीनें मी मत बरोबर दिलें. पण एकाच गोष्टीविषयीं मनांत अडचण वाटते. जर बहिष्कार हवा म्हणून म्युनिसिपल शाळा वगैरे बंद कराव्या, तर मी कोर्टात जाणें विसंगत नाहीं काय ?—जरूर विसंगत असें वाटतें—तर मग काय करावे ?—कांहीं तरी सबब सांगून गैरहजर राहातां येईल. पण तें माझ्या मते निंद्य व भ्याडपणाचे आहे. जर गैरहजर राहाणें तर चोख सायमन कमिशन आज येत असल्यामुळें मी आज हजर राहूं शकत नाहीं असेंच साफ कळविलें पाहिजे. व तसें करण्यांत हायकोर्ट कदाचित Discipinary Jurisdiction प्रमाणे नोटीस काढून सनदहि रद्द करील तर त्याची तयारी पाहिजे. ती नसल्यास आपण आपला कमकुवतपणा कबूल करणे हा प्रामाणिकपणाचा मार्ग.—मला वाटतें सनद रद्द करून घेण्याची माझी तयारी नाहीं. तो प्रसंगहि येणार नाहीं. पण येणार नाहीं म्हणून त्यात पडणें व आला म्हणजे माघार घेणें यापेक्षां 'अनारंभो हि कार्याणां प्रथमं बुद्धिलक्षणम्' या उक्तीप्रमाणें त्या दिवशीचें कोर्टात लागलेले केसपुरतेंच काम करणें उत्तम.

ता. ३-२-२८

सायमन कमिशन आज मुंबईत आलें. त्यासाठीं नापसंती दर्शविण्याच्या दृष्टीनें सर्व हिंदुस्थानभर लोक हरताळ पाळणार! वकिलांनीं कसें करावयाचें हा प्रश्न पुनः आलाच. मी तर पहिले आखलेल्या कार्यक्रमाप्रमाणेंच केलें. मला बहिष्कार टाकणें शक्य झालें नाहीं. कोर्टात गेलों होतों. काम आटोपल्याबरोबर घरीं परत आलों होतों. नदीचे मैदानांत सभा झाली होती. त्यासाठीं जाण्यास सौभाग्यवतीसह गेलों होतों. पण आम्हांस जाण्यास उशीर झाला. सभा आटोपून लोक परत जाण्यास

निघाले होते. तरी पण आम्ही कांहीं वेळ जाऊन रेतींत फिरून आलों. सौभाग्यवतीस सायमन कमिशनची थोडक्यांत हकीकत सांगितली. ती सांगण्यासाठीं पार्लमेंट म्हणजे काय, लढाई ( १९१४–१९ ) कशासाठीं झाली, कमिशनचा बहिष्कार कां? वगैरे सांगितलें. एकंदर त्यावेळचा उपयोग गृहशिक्षणाचे कामाकडे झाला. देशातील स्त्रियांना देशाच्या स्थितीची गंधवार्ता नाहीं; अशा स्थितींत आम्ही स्वराज्य मिळविणार तरी कसें व टिकविणार तरी कसें?

ता. ८–२–२८

आज रात्रौ शेट मंगळदासकडे लग्नानिमित्त गरबा–पार्टी होती. त्यासाठीं सौभाग्यवती व मुलें यांसह गेलों होतों. तेथें आपल्या सर्व समाजाविषयीं एक गोष्ट पाहून मात्र अत्यंत वाईट वाटलें. बहुतेक सर्व लोक–शेंकडा ९९–परदेशी कापडाच्या पोषाखात. चि. बाळूस मुद्दाम मी खादीचे पोषाखात नेला होता. कित्येकास मी किती कद्रू आहे असें वाटलें असेल. पण मला काय त्याचे? शुद्ध खादीविषयीं माझा आग्रह नाहीं. मीहि ती स्वतः कोठे वापरतों? पण निदान देशी माल घेणें व पेहेरवेश देशी कापडाचा असणे एवढें तरी अवश्य आहे कीं नाहीं?

सायंकाळीं म्युनिसिपल स्टॅण्डिंग कमिटीची सभा होती त्यासाठीं गेलों होतों. मी जरा उशीराच गेलों होतों. आजच्या सभेंत एका दृष्टीनें महत्त्वाचे काम झालें. म्युनिसिपल सभासदांनीं परभारे म्युनिसिपल नोकराशीं दळणवळण न टेवतां जें कांहीं करणे–विचारणे तें चीफ ऑफिसरमार्फत करावें. म्यु. कारभारांत ज्यानें त्याने ढवळाढवळ करण्यांत ऑफिसची शिस्त राहत नाहीं; व लटपटी करण्यास जागा मिळून वशिल्याचीं तट्टें मात्र शिरतात असें होतें. त्यामुळें हा टराव करणें भाग होतें. पहावें कसें काय चालतें तें.

ता. ९-२-२८

सायंकाळीं रा. भास्करराव देव यांचेकडे जेवावयास गेलों होतों. मला आमंत्रण देण्यास आले त्याच वेळीं सांगितलें कीं मला येण्याची नेहमीं इच्छा असते पण कार्यक्रम केव्हांहि वेळेवर होत नाहींत. त्यामुळें पुष्कळ कार्यें सांभाळणारास नाइलाजानें अशा कार्यक्रमास फाटा द्यावा लागतो. "बरोबर ६॥ वा. होईल. जरूर याच" असा आग्रह पडला व आश्वासन मिळाले. मीहि सांगितलें कीं त्यावेळपावेतों मी न आल्यास माझी वाट मंडळींनीं पाहूं नये व मी वेळेवर आल्यास मला थांबवूं नये. परंतु शेवटीं अपेक्षेप्रमाणेच झाले. मालकाकडून बिचाऱ्याकडून तयारी होती. आमंत्रित पाहुणे ७-७। नंतर येऊं लागले. वेळेवर हजर असे काय ते दोघेच. रा. नानासाहेब जोशी व मी. शेवटीं सर्व आटोपून घरीं येतां ९ वाजले. विशेष वाईट हें वाटते कीं शिकलेली म्हणणारी मंडळी वेळेची किंमत का विसरतात ? समाजांत या बाबतींत सुधारणा अत्यंत इष्ट आहे. तेव्हा मी तरी नेहमीं हा घोष कोणीहि बोलवावयास आलें तर करणार ! अजून या वक्तशीरपणाचें महत्त्वच लोकांस कसें पटत नाहीं कोण जाणे ? त्याशिवाय या युगांत समाज टिकणार कसा व स्वराज्यप्राप्ति तरी कशी ?

दुसरी गोष्ट म्हणजे जेवणांत आग्रह. ही तर चाल फारच वाईट. ज्या देशांत लाखो लोकाना पोटभर खाण्यास मिळत नाहीं तेथें कोणाहि मनुष्यास जास्त खाण्याचा हक्क कसा पोहोचतो ? बरें तो हक्क पोहोंचला तरी पानांत अन्न टाकण्याचा तर खचित पोहोचत नाहीं. या दृष्टीनें होतां होईल तो पानांत न टाकण्याचा मी नियम केला असून तो गेलीं दोन वर्षे तरी पाळीत आहें. अशा स्थितींत आग्रह झाल्यामुळें जें थोडें पानांत जास्त पडतें तें खावें लागतें. त्यामुळें त्रास होतो. तरी माझे शेजारचे मंडळींचे मानानें मला आग्रह केलाच नाही, असें म्हटलें पाहिजे. माझी साख या याबतींत त्यांच्यापेक्षां वरच्या दर्जाची दिसली. या आग्रहाचे प्रकारामुळें रात्री जे वाचनाचें महत्त्वाचें काम ठेविलें होतें, तें झाले नाहीं. तें सकाळवर ढकलले व सकाळचें जें काम करावयाचें तें

शक्य नसल्यामुळें त्या कामांत मुदत मागावयाची. हा प्रसंग कां? तर (१) वेळेवर जेवणाचा कार्यक्रम नाहीं. (२) झाला त्यांत आग्रह–अशा अडचणीमुळे न जावें असें झाल्यास त्या न गेल्याविषयीं योग्य कारणें समजून न घेतां विनाकारण किती आक्षेप? 'फार आढ्यतेंत असतात, गर्विष्ठ आहेत' वगैरे वगैरे. पण मीहि त्याची पर्वा कां ठेवावी? नुसतें ऐकतों. कालांतरानेंच हा गैरसमज दूर होणार.

आचार्यकुल संस्थेचा वर्गणीदार होण्याविषयीं प्रचारक रा......आले होते. संस्थेचा वर्गणीदार होण्याचा विचार करीन म्हणून सांगितलें. पण वे. शा. सं. बापटशास्त्री यांच्या सर्व ग्रंथांचा एक सेट ६३॥ रु. चा घेण्याचें कबूल केलें. शास्त्रीबोवांनीं विद्वत्तायुक्त परिश्रम करून जें काम केलें त्यास मदत करणें कर्तव्य या बुद्धीनेंच ग्रंथ घेतलेले आहेत. धार्मिक ग्रंथ आहेत. वाचण्याची वेळ व योग येईल तो सुदिन.

ता. ११–२–२८

राजश्री......यांजकडे हरिकीर्तन आज रात्रौ होतें. येणाऱ्याजाणाऱ्या मंडळींचें स्वागत करण्याचें काम मजवर सोपविलें होतें. कीर्तनास येणाऱ्या मंडळींसहि जोडे काढून ठेवा असें सांगण्याची पाळी येत होती! –किती शोचनीय गोष्ट. पूर्वपरंपरा इतक्यांत इतकी कशी गेली? शिवाय कीर्तन चालू असतां मंडळींनीं येणें जाणें व उठणें असा प्रकार चालू होता. पानसुपारीची बैठक म्हणावयाची! व ज्याप्रमाणें एकादा गवई त्याप्रमाणेंच कीर्तनकार. मला तर हा प्रकार बरा वाटला नाहीं.

ता. १२–२–२८

राजश्री जोशी यांनीं रा. गोस्वामी यांची गांठ घालून देऊन अहमदाबाद येथें हिंदुधर्म संघटनाविषयीं कांहीं तरी केलें पाहिजे याविषयीं बोलणें काढलें. सनातनी व अगदीं पुढें गेलेले या दोघांचाहि मेळ घालून सुवर्णमध्य ठेवावयाचा हा दृष्टिबिंदु. उद्यां सवड सांपडेल त्याप्रमाणें

राजश्री गोस्वामी यांचेकडे जाणार आहें व रात्रौ सभा आहे त्यासहि जाणार आहें; पण माझे विचार किती प्रागतिक व एका प्रकारें क्रांति-कारक आहेत याची या मंडळीस कल्पना नाहीं, म्हणून आग्रहानें बोलावीत आहेत असें वाटतें. उदाहरणार्थ अस्पृश्यताच. असो. पण जर प्रेमानें व आग्रहानें बोलावतात तर जाऊं कां नये? कदाचित् त्यांचेहि मनांत माझेप्रमाणेंच विचार असतील व माझा हल्लींचा अंदाज चुकीचा असेल.

ता. १३–२–२८

आज सायंकाळीं श्री. गोस्वामी यांना भेटावयास गेलों होतों. सनातन धर्म सभेचा मी चिटणीस व्हावें असा आग्रह होता. त्यांचे व माझे विचार कांहीं मुद्यांचे बाबतींत मिळते नसल्यामुळें मला अशा सभेचा कार्यवाह होणें शक्य नाहीं असें सांगितलें.–उदाहरणार्थ अस्पृश्यता–जरी मी स्वतः अस्पृश्यता माझे घरांत घालवूं शकलों नाहीं तरी पण त्या बाबतींत माझी पूर्ण विचारक्रांति झालेली आहे. ती मला मान्य नाहीं. अस्पृश्यता आपले माणुसकीस योग्य नाहीं इतकेंच नव्हे तर हिंदुधर्माचे दृष्टीनेंहि वाईट. सबब मी चिटणीस होण्याचें नाकारलें.

ता. १४–२–२८

महाराष्ट्र समाजाचे श्रीदासनवमीचे उत्सवासाठीं कऱ्हाडचे रा. सदाशिव खंडो अळतेकर आज सकाळीं आले. त्यांस भेटावयास गेलों होतों. रात्रौ अळतेकर यांचें व्याख्यान होतें. श्रीदासनवमीचा उत्सव महाराष्ट्र समाजातर्फे होतो, त्यांत यंदा तरुण भारत मंडळाचें नांव जोडलें हें एकंदरींत चांगलें झालें नाहीं असें वाटतें. पण समाजाचे कार्यकारी मंडळानें ठराव केलेला असल्यामुळें इलाज नव्हता. रात्रौ व्याख्यानाचे वेळीं तरुण भारत मंडळाची पाटी उत्सवाचे जागीं लावली हें तर अगदींच गैर. बोलल्यास विपरीत अर्थच घेणार म्हणून बोललों नाहीं. काम वेळेवर

सुरू झालें पाहिजे असा समाजाचा बाणा अथवा आदर्श; पण तेंहि झालें नाहीं व मी घाई करीत असतां तरुण भारतापैकीं एक उद्दाम व अल्लड तरुण थोड्याशा मस्करीचे व तिरस्काराचे स्वरानें दुसऱ्यास म्हणाला, " तुम्हां लोकांस वेळेची किंमत नाहीं. " माझे घाईविषयीं त्याचा कटाक्ष होता व म्हणून मुद्दाम मला ऐकूं जाईल अशा रीतीनें तो बोलला. प्रथम तर मला त्याचा रागच आला पण दुसरेच क्षणीं कींव आली व वाईट वाटलें कीं आपले समाजाची किती अधोगति! वक्तशीरपणा हा गुण वाटेनासा झाला. आपल्याहून वडील माणसांविषयीं आदर नाहीं. साधारण विवेकसुद्धां नाहीं. नवीन पिढी शिक्षित आहे काय? अशी पुनः पुनः शंका येते.

ता. १५–२–२८

महाराष्ट्र समाजाचे पाहुणे श्री. अळतेकर यांजला आज सायंकाळीं फराळास बोलावले होतें. बरोबर इतरहि कांहीं महाराष्ट्रीय मंडळी बोलावली होती. वेळ बरोबर सात वाजतांची दिली होती. त्याप्रमाणें बरोबर कार्यक्रम व्हावा, असा कटाक्ष होता. मडळीहि दहा मिनिटांतच जमली. व कार्यक्रम वेळेवर सुरू झाला. फराळात आग्रह असू नये असें माझें मत, त्याप्रमाणें कोणासहि आग्रह केला नाहीं. मला वाटतें ज्या तऱ्हेनें कार्यक्रम व्हावयास पाहिजे तशाच तऱ्हेने झाला. पण अद्यून पुष्कळ गोष्टी सुधारल्या पाहिजेत. जेवतांना बोलणें व एरव्हींसुद्धा सर्वच फार मोठयानें बोलतात—त्यामुळें कोणाचें कोणास ऐकूं जात नाहीं. विशेष मोठयाने ओरडूनहि शेवटीं ऐकणे नाहींच व विनाकारण आरडाओरड व गोधळ. वाढण्याचे बाबतीतसुद्धां व्यवस्था पाहिजे.

यानंतर बालकीर्तनकार......यांचें कीर्तन होतें. मला बालकीर्तनकारानें कीर्तन करणें कसेसेच वाटतें, आवडत नाहीं म्हटलें तरी चालेल. किंबहुना समाजास तें आवडतें यात समाजाची अधोगति आहे असे वाटतें. कीर्तन म्हणजे खरोखर वैराग्योपासकाचा किंवा हरि'दास' असेल त्याचा उपदेश नसून एक प्रकारचें तें नाटक आहे अशा भावनेनें बाल-

कीर्तनकारांचें समाज कौतुक करतो असें वाटतें. उत्तम अनुकरण या दृष्टीनें रा. नातूचें कीर्तन चांगलें आहे. पण त्याची किंमत केवळ अभिनयकलेचें व अनुकरणकौशल्याचे दृष्टीने. धर्मोपदेश या दृष्टीनें त्याची किंमत शून्य. किंबहुना कांहीं Minus (उणें) व म्हणूनच असें कीर्तन आवडतें म्हणजे माझे दृष्टीनें समाजाच्या मनाच्या अधोगतीचें लक्षण आहे. असो.

### ता. १७–२–२८

आज दुपारीं शेट अंबालाल साराभाई कामासाठीं आले होते. त्यांत म्युनिसिपल कारभार याविषयीं बोलणें झालें. रा. वल्लभभाई बारडोली तालुक्यांत जात असल्यामुळे त्यांनीं म्यु. प्रेसिडेंटच्या जागेचा राजिनामा दिला आहे. त्यांनीं राजिनामा देऊं नये, रजा घ्यावी व सरकारनें जरी त्यांना कैद केले तरीसुद्धां आपण त्यांना अध्यक्ष म्हणूनच ठेवावे हा शेट अंबालाल यांचा विचार मला फारच आवडला.

रात्रौ श्री. सदाशिव खंडो अळतेकर आले होते. मी समर्थ विद्यालयास रुपये तीनशे देण्याचें कबूल करून साहाय्यक झालों. दरवर्षी रुपये साठ द्यावयाचे. पुष्कळ दिवसाचे एक काम हातावेगळे झालें. विचारसाम्य झाल्यामुळें व रा. अळतेकर यांचे विचार कृतींत उतरल्यामुळें बोलण्याच्या भरांत पुष्कळ वेळ गेला.

### ता. १८–२–२८

पंढरपूर येथील अनाथाश्रमासाठीं मदत मागण्यास डॉ. ......आले होते. चांगल्या व इष्ट अशा संस्था पुष्कळ, व आपली पुंजी मात्र थोडी, त्यामुळे त्रेधा होते. याच महिन्यांत १०० गुजरात एज्युकेशन सोसायटी, ६० श्री नवीन समर्थ विद्यालय, ६७ श्री आचार्यकुल पुस्तकें असें झाल्याने ५१ रुपयांचा आंकडा टाकून पुढील महिन्यांत पाठवीन असे सांगितलें आहे. संस्थेचें प्रसिद्धीपत्रक पाहतां खरोखर दरमहा कांहीं तरी द्यावें असें वाटूं लागतें. आपले समाजांत किती सफाईची जरूर आहे.

विधवांनीं गुप्तपणें पुरुषसंग करून प्रसूतीसाठीं आलेलें समाजास चालतें, पण विधवांनीं राजरोस विवाह करूं नये असें बंधन कां ? पुरुषानें वाटेल तितकीं लग्नें करावीं मग प्रत्येक विधवेनें आजन्म ब्रह्मचर्य पाळलें पाहिजे ही सक्ती निसर्गाविरुद्ध नाहीं काय ?

सायंकाळीं श्रीमती अनसूयाबेहेन साराभाई, व श्री. शंकरलाल बँकर यांचेकडे भेटावयास गेलों होतों. सहज बोलतां बोलतां अंत्यजोद्धार अथवा अस्पृश्यतानिवारण या विषयावर बोलणें आलें. पांच सात दिवसांपूर्वी येथील मराठे मंडळींस एक महार आपली जात छपवून भजनास येत होता तो उघडकीस आला. तेव्हां त्यांनीं त्या महारास तोंडास काळे फासून, एक मिशी काढून त्याची धिंड काढली ! केला हा प्रकार फारच गैर, केवळ अक्षम्य ! पण रा. बॅंकर यावर फिर्याद करण्याचें योग्य समजतात, व त्यांनीं केलीहि. फिर्यादीस माझा विरोध आहे. माझ्या मतें ज्या जागीं व ज्या लोकांनीं अशी धिंड काढली तेथें आम्ही जाऊन एक सभा भरवून त्या महारास तेथें बोलावून त्याची जाहीर माफी मागितली असतां जितके अस्पृश्यतानिवारण–कार्य होईल तितके फिर्यादीने होणार नाहीं. कदाचित् फिर्यादीचा परिणाम उलट होईल. धर्माचे बाबतींत युक्तिवाद ( Reasoning ) चालत नाहींत. श्रद्धा असते. श्रद्धेनें अस्पृश्यतेविरुद्ध असणारे लोक लोकांच्या फिर्यादीमुळें त्या मराठ्यांविषयीं सहानुभूतीचे होऊन बिचाऱ्या महाराविषयीं त्यांच्या मनांत अनुकंपा उत्पन्न होण्याऐवजीं त्याजला योग्य शासन झालें असेंहि मानतील.

ता. २१–२–२८

सौभाग्यवतीस कांहींतरी नियमित रीतीनें शिकवावें असें बरेच दिवस वाटत आहे, परंतु कसें जमतें हाच प्रश्न. रा. शेवडे यांनीं शिक्षकाचें काम करण्याचें कबूल केलें आहे. पहावे कसें काय चालतें तें.

### ता. २३-२-२८

आज सकाळीं स्मोक न्यूइसन्स कमिटीचे सभेस गेलों होतों. सभेस हजेरी दिल्याबद्दल रुपये तीस फी मिळते. मला हें आधीं माहीत नव्हतें. अर्थात् हजेरी म्हणजे माझाच त्या रकमेवर हक्क; पण मी म्युनिसिपालिटीचा प्रतिनिधि या नात्यानें तेथें गेलों असलेमुळे ही फी म्युनिसिपालिटींत जमा होणें गैर नाहीं. याविषयीं म्यु.स विचारून मग काय तें करावें असें टरविले आहे.

सभेंत कलेक्टर गॅरटसाहेब यांची वागणूक फारच नमुनेदार होती. प्रत्येक काम रीतसर पूर्णपणें चौकस व निःपक्षपात रीतीनें चाललें होतें. इंग्रज लोक राज्य करीत आहेत ते उगीच नाहीं.

आजपासून सौभाग्यवतीस नियमितपणें शिकविण्यासाटीं रा. बाळासाहेब शेवडे यांस सांगितलें व त्यांनीं सुरुवात केली. रोज एक तास शिकवावें असें आहे. जोंपावेतों पुरुष व स्त्रिया याचे दृष्टिबिंदू एक झाले नाहींत, विचार एक झाले नाहीत तोपर्यंत साधें संसारसुखहि शक्य नाहीं. मग समाजसुधारणा व देशोन्नति तर लांबच. या दृष्टीनेंच शिक्षणाची सुरुवात आहे.

### ता. २४-२-१९२८

आज सकाळीं डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर हे गुजराती ज्ञानकोशाचे कामासाटीं आले आहेत, त्यांचा मुक्काम आमचेकडेच आहे.

मिश्र विवाहाविषयीं रा. केतकर याचे अनुभव-घरचे नेहमींचे गोष्टींतले विचारले. युरोपियन स्त्रियांस आपले घरांत आपलेपणा वाटतो का, आपल्या चालीरीती किंवा समजुतींविषयीं त्यांची मनोदशा काय असते, वगैरे. त्यांच्या अंगांत हिंदीपणा ( Indianism ) येतो, पण आपला जो जातिविशिष्ट अभिमान उपजत असतो, उदाहरणार्थ, ब्राह्मणपणा वगैरे, तो मात्र त्यांच्यांत येत नाहीं. किंबहुना त्याविषयीं अप्रीति व तिटकारा येतो. पण एकंदरींत असे विवाह सौख्यदायी होणें न होणें हें विवाहित

जोडप्यांतील व्यक्तींवर अवलंबून आहे. सरसहा असे विवाह सौख्यदायी होतील असें वाटत नाहीं, असें डॉ. केतकरांना वाटत आहे.

ता. २८–२–१९२८

सायंकाळीं रा. वामनराव यांचेकडे मुंजीनिमित्त जेवणास बोलाविलें होतें, तेथें गेलों होतों. मंडळी सर्व वेळेवर आलीं. रा. वामनरावच उशीरां आलेमुळें सर्वांस अर्धा तास उशीर झाला. पण उशीरां आलेली मंडळी उशीरां आलेबद्दल स्वतःस दोषी मानीत होती ही फारच मोठी समाधानाची गोष्ट होती. सामाजिक वक्तशीरपणा येण्यास वातावरण कमी प्रतिकूल होऊं लागलें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. दुसरी गोष्ट म्हणजे जेवणांत आग्रह नव्हता.

ता. २९–२–२८

आज सकाळीं रा. वामनराव यांचेकडे त्यांचे चिरंजीवाचे मुंजी-निमित्त अहेर रु. १५ केला. आपले अहेराच्या चालीपेक्षां गुजराथी पद्धति बरी असें वाटतें. ५ रु. पेक्षां जास्त अहेर केव्हांहि असूं नये. समाजांत रूढ होईल तेव्हां खरें. आपले येथें कार्यप्रसंग होईल त्यावेळीं रु. ५ पेक्षां कोणीही जास्त देऊं नये व घेणार नाहीं असें सांगून कार्यप्रसंगीं जें प्रत्येकास देणें तें योग्य अहेराचे धोरणावर दिलें म्हणजे झालें.

ता. १–३–२८

आज रात्रौ ८ वाजतां भिक्षावळीची मिरवणूक होती, त्यास गेलों होतों. वाटेंत म्युनिसिपल इस्पितळ कसें असावें, म्युनिसिपालिटीनें काय केलें पाहिजे, सभासदांचीं कर्तव्यें काय वगैरे बाबतींवर रा. बापूसाहेबांशीं चर्चा चालली होती. सर्वच सभासद केवळ अज्ञानी असतात असें नाहीं. पण जेथें बहुमताचे धोरणानें काम चालणार तेथें एका मनुष्यास आपले-

प्रमाणें इतरांचें मत करण्याच्या प्रयासाशिवाय जास्त प्रत्यक्ष असें काय काम करतां येणार ? एकहाती सत्ता असली म्हणजे कार्य करण्यास जसा वाव असतो तसा अनेकहाती असली म्हणजे नसतो. त्यांतूनहि वैद्यकीय, एंजीनिअरिंग अशा विशिष्ट ज्ञानाच्या बाबींत सामान्य सभासद काय करूं शकणार ? ते बिचारे म्यु. चे तज्ज्ञ सल्लागार असतील त्यावर विश्वास ठेवून चालणार. त्यांचे दोष तज्ज्ञांकडूनच कळणार ! तशा तज्ज्ञांनीं आपले विचार अनाहूतच प्रदर्शित केले पाहिजेत. टीकाहि केली पाहिजे. असो.

रात्रौ भिक्षावळ वगैरे आटोपल्यावर दहा सवादहाचे सुमारास ती. सौ. सुंदराताईस एकदम किंचित् पक्षघात झाल्यासारखें झालें व ज्या पडल्या त्यांतच शेवटीं सुमारें दीड वाजण्याचे सुमारास त्यांचा देहांत झाला. सायंकाळीं आम्ही गप्पा मारण्यास बसलों तेव्हां ती बैठक शेवट-चीच अशी स्वप्नींहि कोणास कल्पना नव्हती. मानवी जीविताच्या क्षण-भंगुरतेची साक्ष या उदाहरणानें किती जोरानें पटविली आहे ! मला तर कांहीं सुचेनासें झालें. रडेंही आवरेना व डॉ. बापूसाहेबांस भेटलों तेव्हां तर उमाळा राहीनाच. जग हें नश्वर तर खरेंच, प्रत्येकास मरावयाचें हेंही खरें; पण जन्मभरची आसक्ति विचारानें दूर करणें कठीण. कालां-तरानें तीव्रता कमी होऊन विचारांचा पगडा बसतो.

ता. ३–३–१९२८

सायंकाळीं रा. बाळूभाई व जीवणलाल दिवाण भेटले होते. म्युनिसिपल चीफ ऑफिसरचे नेमणुकीविषयीं बोलणें झालें. रा. दिवाण यांचे बंधु लायक आहेत, तेव्हां त्यांनीं अर्ज करण्यास कांहींच हरकत नाहीं असें मला तरी वाटतें. लोक टीका करतील. पण ज्या गोष्टींत म्युनिसिपल हित आहे ती गोष्ट लोक टीका करतील एवढ्याच सबबीवर न करणें हें कांहीं बरोबर नाहीं. आपले हेतू जेथें शुद्ध आहेत तेथें लोकांच्या गैर टीकेची काय पर्वा ?

ता. ६-३-१९२८

आज सकाळीं मुंबईस पोचलों. मुक्काम शेट हरगोविंददास यांचेकडे होता. ज्या कामासाठीं गेलों होतों ते आटोपल्यावर दुपारीं महालक्ष्मीस वेस्टर्न इंडिया टर्फ क्लबाचे शर्यतीस गेलों होतों. शेट हरगोविंददास यांचे निमंत्रणावरून व कधींहि मी पाहिली नव्हती, तेव्हां पाहाण्याची इच्छा होतीच म्हणून गेलों होतों. शर्यतीचा मूळ हेतु कितीहि चांगला असला तरी एकंदर प्रकार पाहून फार वाईट वाटलें. व्यवस्था उत्तम, नमुनेदार. कामहि सर्व झडपेनें व चोख. पण मला तो एक मोठा जुगारखाना वाटला. मूळ उद्देश बाजूलाच राहून सर्वच लोक पैसे लावून खेळत. मला जर अर्धा तास गव्हर्नर नेमलें तर पहिली गोष्ट हे बंद करण्याची करीन इतका मला तिटकारा आला. बायकानीं तेथे येणें, त्यांचे नाटकी व निर्लज्ज पोषाख, त्यांनीं पैजा मारणें, मला तर अतिशय किळसवाण्या व अधम गोष्टी वाटल्या. "मुंबईचा स्वर्ग" असें कित्येकांनीं विचारलें; "जुगारखाना" मी उत्तर दिलें. ओळखीची पुष्कळ मंडळी भेटली. फॅशनच्या नादांत व छंदांत खेंचल्या जाणाऱ्या त्यांची कींव वाटली. व त्यांना कदाचित् माझ्या गांवढळपणाची व सोंवळेपणाची कींव वाटली असेल. बरोबरच आहे, नरकांतल्या किड्यांना नरक असें वाटतें का? तेथें श्री. छत्रपति कोल्हापूर महाराजांस फिरतांना पाहून तर फारच वाईट वाटलें. कोठें छत्रपतीचें उच्च स्थान व कर्तव्य व कोठें ब्रारीकशी शर्यत व चार घोडे पाळणें! त्यांतच वेळ घालविणाऱ्या 'छत्रपती'विषयीं कोणत्या महाराष्ट्रीयास वाईट वाटणार नाहीं!

ता. ७-३-२८

अमदाबाद स्टेशनवर उतरतांच शेजारचेच डब्यांतून मि. ब्रूमफील्ड (डिस्ट्रिक्ट जज) सहकुटुंब उतरले. त्यांचे नेहमींचे पद्धतीप्रमाणें अगदीं stiff (ताठर) तऱ्हेनें उभे होते. एक वेळ वाटलें कीं आपण त्यांजपाशीं जाऊन औपचारिक 'गुड् मॉर्निंग' करणें हा केवळ शिष्टाचार पाळणें

आपला धर्म आहे. पण पुन्हां वाटलें कीं त्यांचे स्वभावास याचा अर्थ खुशामत असा वाटण्याचा संभव असल्यास आपणांस औपचारिक शिष्टाचाराची काय जरूर ? अशा विचारानें मी कांहींच केलें नाहीं.

सायंकाळीं म्युनिसिपालिटींत गेलों होतों. सर रमणभाई, लॉर्ड सिंह व रेव्हरंड गिलेस्पी यांचे मरणाबद्दल शोकाचे ठराव करून सभा बरखास्त केली. प्रत्येकजण बोलण्यास पुढे सरसावत होता. बोलण्यापेक्षां मृताच्या चांगल्या गुणांचें अनुकरण करतील तर किती बरें चांगलें !

ता. ९-३-१९२८

म्युनिसिपल सभेस गेलों होतों. एका सभासदावर एका माणसानें लांच खाल्ल्याबद्दल आरोप करणारा अर्ज म्युनिसिपालिटीस पाठविला होता. त्यावर चर्चा चालली होती. रा. ... ... यांनीं फारच वाईट व घाणेरड्या रीतीनें आक्षेप केले. असे आक्षेप सुचतात तरी कसे ? इतक्या सडक्या व मत्सरपूर्ण माणसांची ज्या देशांत भरती आहे त्या देशास कधीं तरी स्वतंत्रता शक्य आहे काय ? असा विचार मनांत येऊन फारच उद्विग्नता वाटते. मीहि जबाब देण्याचा प्रयत्न केला—मला वाटतें मीहि जरा संतापांतच बोललों. पण सभ्यतेचें उल्लंघन मी केलें असें मात्र मला वाटत नाहीं.

त्यानंतर शेठ कस्तुरभाई व मी महात्माजींचे तब्यतीचे समाचारास आश्रमांत गेलों. तब्यत बरी आहे. “देशासाठीं कांहीं वर्षें आपण जगणें जरूर आहे, तेव्हां आपण तब्यतीची हयगय करूं नये” अशा अर्थाचे विनंतीस ते म्हणाले कीं “मी माझेसाठींच जगतों आहें. मी असें काय केलें आहे कीं देशासाठीं जगतों आहे असें म्हणतां येईल ? जगण्याची इच्छा आहे. मरण आतांच येत असल्यास तयारी आहे.” पुढें बोलतां बोलतां म्हणाले कीं “मला लढतां खूप चांगलें येतें. पण सध्यां लढणें—क्षात्र व ब्राह्मण वृत्ति—बाजूला ठेवून, मला वाणिज्य वृत्ति—कापड, खादी प्रसार वगैरे—पतकरावी लागली आहे.”

तेथून सर चिनूभाईकडे गेलों. तेथें या वर्षी मी इंग्लंडला त्यांचे-बरोबर जावें याविषयीं त्यांनीं फारच आग्रह केला. माझेंहि मन ललचावलें आहे. एकदां जावयाचें हें तर खरेंच. सौभाग्यवतीसह जावें असेंच आहे. पण जर त्यांचेबरोबर एकदां जाऊन आलों तर पाश्चात्य देशांची माहिती झाल्यानें पुन्हां आम्ही दोघे जाऊं त्यावेळीं अडचण पडणार नाहीं, व खर्चहि कमी होईल. कोणत्या गोष्टी हव्या आणि कोणत्या नको यांचें ज्ञान झाल्यामुळें खर्च व सोय या सर्व बाबतींत सोय होईल. सध्यां तरी जावें असें फार वाटतें.

तेथून घरीं रात्रौ ८॥ वाजतां आलों. तो शेठ ...... माझी वाट पाहात बसलेच होते. प्रश्न आला कीं आपण काय करावें ?—मी दुपारीं १२ वाजतां कोर्टांत गेलों तो रखडतां रखडतां रात्रौ ८॥ ला घरीं आलों. ‘नाहीं’ म्हणावें तरी असभ्यता. पुष्कळांचा आक्षेप असा आहे कीं मी पैशाच्या लोभांत पडून काम करतों. माझी ठाम खात्री आहे कीं हा आक्षेप अगदीं खोटा व निराधार आहे. मी शेवटीं त्यांचेबरोबर थोडा वेळ बसून, त्यांची हकिकत थोडक्यांत ऐकून, मागाहून पाहीन म्हणून सांगून, लौकर उठण्याबद्दल माफी मागून शौचास व जेवणास गेलों. मला थोडी अडचण व उशीर झाला खरा. पण सभ्यता पाळली गेली. शिवाय गरजवंतास अक्कल नसते या न्यायानें येणाऱ्याच्या मनो-दशेचाहि विचार झाला पाहिजे. ते पाऊण तास वाट पाहात होते. काम निकडीचें, रकम मोठी, वेळ नाहीं. अशा स्थितींत मला वाटतें मी केलें हें योग्यच केलें.

ता. १०–३–१९२८

कै. सुंदराताईस आज दहावा दिवस. मी जाणार होतों, पण अनपेक्षित रीतीनें लौकर क्रिया झालेमुळें जाऊं शकलों नाहीं. ९॥ वाजण्याची वेळ मला कळविण्याचें मुद्दाम चि. मकरंद यास सांगितलें असतां तो निरोप न सांगतां गेला. चि. तात्या व बापु यांनींहि कांहीं सूचना दिली नाहीं.

नवीन सर्व मंडळीमध्यें धोरणाचा किंवा काळजीपूर्वक काम करण्याचे संवयीचा अगदीं अभाव दिसतो. त्याचेंच हें आणखी उदाहरण !

ता. ११–३–१९२८

ओरिसा गांधी सेवाश्रमाचे एक गृहस्थ आले होते, त्यांस रु. १० दिले. त्यांजला ते कमी वाटले. जास्तीची अपेक्षा कां व कशी करतात हेंच समजत नाहीं. स्थानिक संस्था कमी आहेत काय? त्या मरूं देऊन बाहेरच्या संस्थांस पैसे देण्याइतके पैसे आमचे जवळ कोठें आहेत ?

ता. १२–३–१९२८

पशी घांचीण इजला अंगउधार रु. १५०० व श्रीकृष्णमंदिराचे वहिवाटदार पार्वतीबाई यांजला रु. ४०० दिले आहेत. पशीस केवळ तिचे आजपावेतोंचे पतीवर पैसे दिले आहेत. पार्वतीबाईचेविषयींहि तोच भरंवसा आहे. पाहावें कसें काय जमतें तें. कोणीही आपसात पैसे उसने मागावयास येणें म्हणजे फार कठीण प्रसंग आहे. नेहमींचा अनुभव हाच कीं पैसे परत देण्याचे वेळीं उसनवार देणारा शत्रू असतो, व पैसे येत तर नाहींतच. अशापेक्षां प्रथम नाहीं म्हटलेलें पुरवतें. पण ही आपल्या समाजाची किती शोचनीय स्थिति? आपणांत पत नाहीं त्याचा हा परिणाम. आमचे पैसे इतर व्यापारी व सरकारनें डिपॉझिट, सेव्हिंग बँक वगैरे रूपानें चार ते सहा टक्के दरानें वापरावे व आमचे इष्टमित्रांनीं मात्र बारा टक्क्यांनीं पुन्हां त्यांचेकडून उसनवार आणावे? आमचा परस्पर भरंवसा नसल्यामुळें मधल्या माणसास परभारें फायदा. या बाबतींत मी माझे विचाराप्रमाणें प्रयत्न केला. पण शेवटीं अनुभव कडूच! इष्टमित्रांशीं वांकडेपणा येऊन पैसे जातात हें वर! बरें, प्रत्येकास पैसे देतांना सर्व गोष्टी बजावून सांगितल्या, रोख ठोक सांगितल्या, केवळ व्यवहारदृष्ट्या चालावयाचें असें बजाविलें, तरीसुद्धां कांहीं एक परिणाम नाहीं. अशी शोचनीय स्थिति ज्या समाजास त्यास स्वराज्य येण्यास किती वर्षें पाहिजेत! असो.

ता. १३-३-२८

सर रमणभाईंचे संबंधांत उद्यां जी जाहीर सभा भरणार तींतील ठरावाविषयीं खा. ब. ......व श्री. ...... यांच्याबरोबर चर्चा केली. अतिशयोक्ति व विवादात्मक भाग ठरावांतून बदलले. Most eminent Services (सर्वांहून जास्त प्रशंसनीय कामगिरी) वगैरेंत Most (सर्वांहून जास्त) कशाला ? कोणत्याही मोठ्या माणसाविषयीं बोलताना तुलनात्मक बोलणें बरें नाहीं. प्रत्येकजण आपआपले परी थोरच असतो. शिवाय Pillar of Local Self Govt. (स्थानिक स्वराज्याचे आधारस्तंभ) असें लिहिलें होतें. त्यांत मतभेदास वाव आहे. म्युनिसिपालिटी सरकारनें Suspend (तात्पुरती रद्द) केली. त्या वेळीं सरकारनिर्मित कमेटीचे अध्यक्ष होणें, सरकारनियुक्त सभासद असणें वगैरे गोष्टी Self Govt. (स्वराज्या)शीं जुळत नाहींत. सुराज्य (Good Govt.) म्हणजे कांहीं स्वराज्य नव्हे, म्हणून तोही शब्द काढावा अशी माझी सूचना होती. खा. ब. ...... यांनीं माझें म्हणणें ऐकलें.

त्यानंतर घरीं आलों. शेट......व रा. ...... म्युनिसिपालिटींतून येऊन वाट पहात बसले होते. सर रमणभाईंचे स्मारकाविषयीं गोष्ट निघाली. सर रमणभाईंनीं असें काय केलें कीं त्याचें स्मारक केलें पाहिजे ? असा शेठ ...... यांचा प्रश्न निघाला. कोणत्याही चळवळींत त्यांचे व्यक्तित्व (impress) दिसत नाहीं. त्यांचे कामांत quantity (पुष्कळ उरक) होती, पण quality (भरीवपणा) कमी वगैरे. मला वाटते हा दृष्टिबिंदु बरोबर नाहीं. आपली छाप कामावर पाडूं शकतात अशीं माणसें क्वचितच. पण समाजाचे कार्याचा गाडा स्वतः झीज सोसून सुरळीत चालविण्यासाठीं झटणारीं माणसें तरी कोठें आहेत ? सर रमणभाईंनीं निरनिराळ्या तऱ्हेनें काम करून राजकीय, सामाजिक, शिक्षणविषयक व साहित्यविषयक संस्था वगैरे टिकविल्या; व कामाचें लोण पुढें दिलें ही काय लहानसहान कामगिरी ? त्यांचें आयुष्य म्हणजे गुजराथचा २५ वर्षांचा इतिहास. अशा माणसाचें स्मारक नाहीं करावयाचें तर कोणाचें ? असो.

ता. १४-३-१९२८

संध्याकाळीं सर रमणभाईबद्दल शोक प्रदर्शित करण्यासाठीं व स्मारक करण्यासाठीं शहरवासीयांची जाहीर सभा सायंकाळीं ५॥ वाजतां होती. मीहि गेलों होतों. ठराव फारच लांब होता. माझें परवांहि तेंच म्हणणें होतें. मला श्री. वल्लभभाईनीं पुष्टि दिली. वक्तेहि फारच ठेवले होते. बोलणारांपैकीं श्री. वल्लभभाई व कालेलकर यांनीं मर्यादित व समयास योग्य असें भाषण केलें. इतरांनीं बरें केलें. स्मारकाचे ठरावावर रा. बाळूभाई यांनीं अमदाबादवासीयांवर सणसणीत कोरडा ओढला कीं स्मारक फंड करतां, पण मागाहून कोणी पैसे देत नाहीं, असें करणें असल्यास फंड करूं नका. रा. मूळचंद आले नव्हते. त्यांचेऐवजीं मी बोलावें असा रा. चाहवाला यांनीं फारच आग्रह केला. पुष्कळ बोलणारे व मला सार्वजनिक सभांतून बोलतां येत नाहीं, त्यामुळें नाहीं म्हटलें. पण ते ऐकेनात. बोलावयाचें तरी काय? किती? व अधिकार तरी मला कसा? या अडचणी तर मुख्यच. शेवटीं रा. काकासाहेब कालेलकर आले, ते सांपडले व मी सुटलों. स्मारक कमेटीच्या चिटणिसांत माझें नांव पुन्हा आग्रहानें ठेविलें. एका माणसानें किती कामें करावयाचीं हा पुन्हां प्रश्न आलाच. शेवटीं नाइलाजानें ' हो ' म्हटलें.

ता. १५-३-१९२८

सायंकाळीं सौभाग्यवतीसह सत्याग्रहाश्रमांत गेलों होतों. प्रार्थना सुरू झालेली होती. प्रार्थनेनंतर महात्माजी बोलले. विषय, आश्रमांतून एका बाईस बिहार प्रांतांत शिक्षकिणीचें काम करण्यासाठीं पाठविणें हा होता. पुरुषांत व स्त्रियांत हिंमत आल्याशिवाय स्वराज्य शक्य नाहीं हा मुद्दा होता.

ता. १६-३-१९२८

दुपारीं तीन वाजतां ...... मिलचे शेअर होल्डरांचे सभेस शेट ...... यांचे निमंत्रणावरून गेलों होतों. एकंदर लोकांचा मूर्खपणा व

हलकटपणा चांगलाच नजरेस आला. जुन्या नियमांत फेरफार नसावा असें प्रामाणिकपणें वाटणारा एकहि होता असे वाटत नाहीं. काम करणारास कित्येक बाबतींत मोकळीक व सत्ता पाहिजे हें तत्त्व उमजणारे दिसले नाहींत. स्वतः काम करण्याची अक्कल नाहीं, जो करीत असेल त्यावर विश्वास टाकण्याची बुद्धि नाहीं व सर्वांत हिडिस म्हणजे केवळ स्वार्थ व तोहि तात्पुरता, यावर नजर ठेवूनच मत देणें. नियमांतील सुचविलेले फेरफार सर्वांस योग्य व न्याय्य वाटत होते. तरी पण ज्या मंडळींनीं दावा केला आहे त्यांचें म्हणणें हेंच कीं आम्हांस काहीं फेरफार नकोत. ज्या फेरफारांविषयीं मतभेद त्यांची गोष्ट वेगळी; पण जे इष्ट म्हणून कबूल तेहि पास करावयाचे नाहींत हा कोठला शहाणपणा !

ता. १८-३-२८

सायंकाळीं डॉ. तळवलकर व जहांगिरराव भेटले होते. मी सर चिनुभाईबरोबर इंग्लंडला जावें कीं न जावें अशा बुचकळ्यात आहें. जावें असें दोघांनींही आग्रहपूर्वक सांगितलें. फक्त तीन महिन्यासाठीं जावयाचें व दहा माणसांचे कुटुंबातील केवळ एका माणसाचे ज्ञानासाठीं किंवा चैनीसाठीं ( आवडीसाठीं ) तीन साडेतीन हजार रुपये खर्च करावा हें जरा मला विसंगत वाटून मनास त्यामुळें संकोच वाटत आहे. मी तेथें जाऊन आल्यानें माझ्यांत जी सुधारणा होईल तेवढ्यापुरता कुटुंबास जरूर फायदा असला तरी ज्या प्रत्यक्ष फायद्याचे वाटेकरी कुटुंबांतील इतर मंडळींस होतां येत नाहीं तो फायदा होण्यासाठींचा खर्च म्हणजे माझे एकट्यासाठींच यांत शंका नाहीं. याला डॉ. तळवलकर यांचें प्रत्युत्तर कीं जर एका माणसानें दहासाठीं मेहनत करावयाची तर त्या एकास कांहीं सवलत दिलीच पाहिजे. लढाईच्या घोड्यास जादा चंदी पाहिजे हा त्याचा अर्थ. केवळ करारशास्त्राचे दृष्टीनें विचारसरणी बरोबर आहे. पण नाजूक कौटुंबिक संबंधांत लागू पडत नाहीं असें वाटतें. कुटुंबांतील मंडळी खुशीनें संमति देतात हा त्यांचा उदारपणा आहे, यांत निदान मला तरी शंका वाटत नाहीं.

ता. १९–३–२८

आज सकाळीं मजूर ऑफिसचे कार्यकर्ते व म्यु. कौन्सिलर श्री. गुलझारीलाल नंदा म्युनिसिपल चीफ् ऑफिसरचे जागेसाठीं कोणाची नेमणूक करावयाची याविषयीं चर्चा करण्यासाठीं आले होते. मला जरी काम पुष्कळ होतें तरी चर्चा करीत बसलों होतों. विशेषतः भगत कां अपात्र आहे त्याचीं कारणें मजपासून त्यांना पाहिजे होतीं. तीं मीं सविस्तर सांगितलीं. रा. रा. वल्लभभाईचे सद्हेतूविषयीं इतकी साशंक नजर कां हें कळणें कठीण आहे. मला वाटतें कीं इतर मंडळींचे खाजगी व व्यक्तिगत ( Personal ) चुकीचे अभिप्राय ऐकून ही मंडळी आपला गैरसमज करून घेतात. सार्वजनिक कार्य जोमानें करण्यासाठीं पुष्कळांस नाखूष करावें लागते व श्री. वल्लभभाईच्या नशिबांत ती गोष्ट प्रामुख्यानें येत असल्याने जो तो त्यांचेविषयीं कोणतीही गोष्ट फैलावण्यास तयार असतो. ऐकणारे कांहीं भाबडे व कांहीं पाजी असतात; कांहीं स्वयंमन्य शहाणे असतात. वल्लभभाईशीं विरोध दाखविण्यांतच आपलें मतस्वातंत्र्य आपण दाखवीत आहोंत असे त्यांस वाटतें. असो.

आज सौभाग्यवतीचें श्राद्ध होते. सौभाग्यवती गेल्याला आज आठ वर्षें पूर्ण झालीं. इतका काळ किती झपाट्यानें गेला !

इंग्लंडला सर चिनूभाईबरोबर जावयाचे ठरवून मी त्याप्रमाणें निरोप आज रोजीं श्री. अंबालाल पटेल यांचेबरोबर कळविला. पॅसेज वगैरे ते व्यवस्था करतील. त्यांचें पहिल्या वर्गाचें तिकीट आहे. मला त्याची जरूर नाहीं; पण बरोबर जायचें म्हणजे घेतलें पाहिजे, नाहींतर बोटीवरसुद्धां एकत्र भेट शक्य नाहीं. तेव्हां फर्स्ट क्लास तिकीट घेतलें. पण यांचें ‘ ए ’ वर्गाचे आहे. मी ‘ सी ’ वर्गाचें सांगितलें आहे. त्यांत ५५ पाउंडांचा फरक पडत आहे.

ता. २०–३–२८

गुजरात व्हर्नाक्युलर सोसायटीचे सभेस गेलों होतों. सर रमणभाईविषयीं सभा होती. किती थोडी मंडळी हजर होती ! तेथें प्रो. बळवंतराय

ठाकोर भेटले. महाराष्ट्रांत ज्याप्रमाणें लो. टिळकांचें चरित्र झालें, तशा धर्तीवर रा. ब. सर रमणभाईचें चरित्र लिहवावें असें मी सुचविलें, तेव्हां ते म्हणाले, " महाराष्ट्राची गोष्टच बोलूं नका. येथील लोकांत तें स्पिरिट नाहीं. " आपसांत कितीहि दुही किंवा शत्रुत्व असलें तरीसुद्धां पुण्याचे कोणतेहि संस्थेस धोका पोहोंचूं नये अशा रीतीनेंच पुणेकर मंडळी वागत असतात असें त्यांनीं सांगितलें, आणि लो. टिळकांचा राजिनामा व ज्ञानप्रकाश यांची हकिकत सांगितली. ४० पानांचा राजिनामा व त्यांतील कांहीं गोष्टींनीं लो. टिळकांचें सार्वजनिक आयुष्य अगदीं नामशेष केलें असतें. पण ज्ञानप्रकाशानें तो प्रसिद्ध केला नाहीं.

## ता. १३–३–१९२८

आज रोजीं सायंकाळीं म्युनिसिपालिटींत स्टँडिंग कमेटीचे सभेस गेलों होतों. चीफ ऑफिसरची नेमणूक हा महत्त्वाचा प्रश्न होता. अगोदर श्री. वल्लभभाई कोर्टांत मला भेटून गेले होते. सभेंत चर्चा झाली व पांच जणांस प्रत्यक्ष भेटीस बोलवावें असें टरलें.

तेथेच मुंबईचे रा. जीनवाला सॉलिसिटर भेटले होते. मुंबईचे हेरल्ड पत्राची डिबेंचरें घ्यावीं असा आग्रह होता. शेट कस्तुरभाई, चिनूभाई मंडळीस मी आग्रहानें सांगावें असेंहि त्यांचें म्हणणें.

मला प्रथम ज्या गोष्टीविषयीं शंका त्याविषयीं मी इतरांस काय आग्रह करूं शकणार ? मुंबईसारख्या एखाद्या शहरीं एक इंग्रजी वर्तमानपत्र चालवून व टाईम्सचे युक्तिवादास उत्तर देणारा युक्तिवाद रोज प्रसिद्ध करून स्वराज्यप्राप्ति कशी होणार ? सरकारास लोकांचीं दुःखें किंवा दृष्टि-बिंदू माहीत नाहीं असें नाहीं. त्यास पूर्ण माहीत आहेत. मग असें वर्तमानपत्र चालविण्यांत खर्चाचे व मेहनतीचे मानानें काय फायदा ? हिंदुस्थानचे सध्यांचे परिस्थितींत वर्तमानपत्रें हीं खरोखरींच जास्त उप-योगी आहेत कीं काय याविषयींच मला शंका वाटूं लागली आहे. लोक-शिक्षणाकरिता जरूर आहे. पण लोकमतदर्शक म्हणून त्यांची किंमत संपा-दकाचा लौकिक व अनुयायांचें पाठबळ किती त्यावर अवलंबून आहे. असो.

ही एक बाब झाली. दुसरी म्हणजे कोणालाही पैशासाठीं शिफारस करणें माझे जिवावर येतें. ज्याला जें देणें तें त्यानें स्वखुषीनें व स्वतःच्या अभिप्रायाप्रमाणें द्यावें. त्यांत आग्रह कसा चालेल? पण नेहमीं लोक येऊन चिकटतात व कांहीं नाहीं तरी शेवटीं ओळखीची चिठ्ठी तरी द्या असा आग्रह. मला तर हें अगदीं असह्यच वाटतें. चिठ्ठी देणें यासारखी फसवेगिरी नाहीं. देणारास माहीत कीं याचा उपयोग नाहीं. ज्याचें नांवची तोहि हेंच धरून चालतो. बरें, जो चिठ्ठी नेतो तोहि समजत असतो. मग हा आग्रह कां?

सायंकाळीं चि. ताईची एकदाणी गळ्यांतून कोठेंतरी पडून हरवली. सौ. काकीचे सांगण्यावरून तिनें त्यांस दाखविण्यासाठीं काढली ती पुन्हां बरोबर घातली नाहीं त्यामुळें पडली. मी चि. ताईवर रागावलों. खरा राग तर इतर मंडळीचाच मला आला कीं त्यांनीं नसती उठाठेव कशाला केली? पण मी ताईस दोन चपाट्या दिल्या. मला वाटतें मी अतिशय मोठी चूक केली. तिचा बिचारीचा काय दोष? आधीं मुलास मारणें हें बरोबर नाहीं. त्यांतूनहि जी चूक तिची नाहीं तिच्याबद्दल रागावणें हें तर जास्तच वाईट. झालेल्या चुकीबद्दल प्रायश्चित्त कसें करावें? चि. ताईची माफी मागावी असेंच वाटतें. पण ती समजून घेण्याइतकी तरी तिला समजूत हवी ना? तेव्हां तिला नवी एकदाणी करून देणे हाच उत्तम मार्ग दिसतो.

## ता. २८–३–१९२८

सायंकाळीं विलायतेस जावयास काय काय तयारी पाहिजे याचा फेर विचार झाला. परदेशी कापड बहुतेक घ्यावें लागणार नाहीं असें दिसलें. तसें (परदेशी कापड न घेणें) कां करतां येऊं नये? पण आपणांस धैर्यच नाहीं हेंच खरें. इंग्लिश लोक आमचे देशांत आमच्यासारखे होतात का? मग आम्ही तरी कां त्याचे देशांत आपलेपणा टाकावा? अर्थात् थंडीनिवारणासाठीं जरूर कोटपाटलून असावें. कपडे वाटेल त्या तऱ्हेचे असावे. पण कापड देशी कां असूं नये? मी तर तोच विचार केला आहे.

ता. २–४–१९२८

आज संध्याकाळीं संकट निवारण कमिटीचे सभेस गेलों होतों. लोन फंडास वचन दिलेल्या रकमा मागण्या कर करून थकलों असतांहि मंडळी देत नाहींत व कांहीं ना कांहीं सबबीवर सबबी काढून चालढकल करीत आहेत; तेव्हां किती पैसे आहेत, किती देणें आहेत, किती पैशांची जरूर आहे वगैरे सर्व मी आंकडे तयार करवून कमिटीपुढें मांडलें. पैसे देत नाहींत याबद्दल खरमरीत टीका केली. शेट कस्तुरभाईनींहि मला दुजोरा दिला. पैसे देण्याचीं वचनें देऊन मागाहून अळंटळं करणें किती नीचपणाचें! व पैसेवाल्या मंडळींनीं असें कां करावें? अशा मनोदशेंत हिंदी म्हणतां येईल असा व्यापार तरी ही मंडळी कशी करणार? जो तो स्वार्थासाठींच पुढें सरसावलेला. विशाल दृष्टिबिंदु मुळींच नाहीं...मुद्दा हाच कीं, पैसे द्यावयाचेच नाहींत व निदान शेवटीं देणें झालेच तर जितकें पुढें ढकलतां येईल तितके ढकलावें. अतिशय क्षुद्र बुद्धि व दानत! माझें हें अनुमान चुकीचें आहे. असें कोणी दाखवून दिल्यास मला किती आनंद होईल तें माझें मलाच माहीत. या गोष्टींनीं मन फारच उद्विग्न व निराश होतें.

ता. ३–४–१९२८

सायंकाळीं म्यु० सभा होती. पण मी कोर्टात ६॥ वाजेपावेतों कामांत गुंतलेला असलेमुळें मला जाणे शक्य झाले नाहीं. धंद्याचें काम आधीं व फावल्या वेळीं सार्वजनिक काम अशी स्थिति असल्यामुळें सार्वजनिक कामांत पडूंच नये असें पुष्कळ वेळां वाटते. वकिली सोडून सर्वच काल सार्वजनिक कामांत घालवावा असा जो मानस आहे तो साध्य होईपावेतों सार्वजनिक कार्यांत पडूं नये. परंतु मित्रांचा आग्रह व शिवाय अर्धवट अशीं कामें करणारीं तरी माणसे कोठें येतात? तेव्हां कामें अगदींच न होण्यापेक्षां अर्धवट झालेलीं काय वाईट?

ता. ४-४-२८

शेट अंबालाल व कस्तुरभाई यांचेबरोबर म्युनिसिपालिटींत स्टॅंडिंग कमेटीचे सभेस गेलों होतों. स्टॅंडिंग कमेटींत मुख्य प्रश्न चीफ् ऑफिसरचे नेमणुकीचा होता. एकंदर प्रकार नेहमींप्रमाणेच फारच शोचनीय! केवळ म्युनिसिपल हिताचे दृष्टीने व्यक्तिशः रागलोभ बाजूला ठेवून या प्रश्नाकडे पाहाण्याची लहान व मोठयाची कोणाची इच्छाच नव्हती. वरून नीटनेटकें बोलावयाचें पण आंत व्यक्तिशः रागद्वेषाचें अथवा स्वार्थाचें मूळ. भगत सारख्या इसमाचें नांव सुचविण्याचें धैर्यच कसें होतें? खरोखर आम्ही इतके पाजी कसे झालों आहोंत!! त्याला 'बिचारा' ठरविण्यांत वल्लभभाईवर किती गंभीर आरोप येतो हे कसे कळत नाहीं? पण यांमध्ये दोन प्रकारच्या मनोदशा आहेत. एक भगतसारख्या लटपटी माणसाचे हातून नेहमीं आपलीं कामें व्हावीं हा केवळ व्यक्तिशः स्वार्थाचा हेतु; व त्यांत कांहीं मुसलमान व इतर दोन चार मिळून १०।१२ फार तर असतील. पण दुसरा प्रकार म्हणजे श्री. वल्लभभाईंना येनकेन प्रकारेण विरोध, त्यांचाच द्वेष या भुताने मात्र पुष्कळ मंडळी पछाडलेली. शेठ ...... सुद्धां यालाच बळी! त्यांचे मनांत द्वेष नाहीं, पण श्री. वल्लभभाईवर अंकुश ठेवणे त्यांना जरूर वाटते. अशा खेचाखेचींत सार्वजनिक हित कोण पाहतो!! मला या एकंदर प्रकारांत ज्या गोष्टीबद्दल विशेष चीड व उद्वेग वाटतो तो दुसऱ्या प्रकारच्या मंडळीबद्दल. स्वार्थी लोक वाटेल ते करतील, पण जे स्वार्थी खरोखर नाहींत व इतर बाबतींत सार्वजनिक कार्य करूं शकतात त्यांनीं रा. वल्लभभाईंच्या खासगी व व्यक्तिगत गुणदोषांवर नजर ठेवून आपलें मत कां निश्चित करावें? आपणां प्रत्येकांत हजारो दोष आहेत. रा. वल्लभभाईहि मनुष्यप्राणी आहेत. दोषांपासून अलिप्त नाहींत. पण एकंदर जर ते प्रामाणिकपणें काम करीत आहेत तर जरी कांहीं बाबतींत आपणांस काम पसंत नसलें किंवा रीत पसंत नसली तरीसुद्धां जेथें आपल्या तत्त्वाचा विरोध नाहीं अशा बाबतींत त्याना त्याचे क्षेत्रांत स्वतंत्रता कां असूं नये? आपण काम करावयाचें

नाहीं व दुसरा करतो त्याला करूं द्यावयाचें नाहीं. आपल्याला काम समजून घेऊन, अडचणी समजून घेऊन काम करण्याइतकी जर फुरसत नाहीं तर जो करतो त्याच्या अडचणी लक्षांत न घेतां अंकुश ठेवण्याची जरूर वाटणें व ती अमलांत आणणें कसें क्षम्य आहे? खरोखर अंकुश ठेवणें असेल तर २४ घंटे आपण कामावर बसून अंकुश ठेवला पाहिजे. तें न करतां अशा प्रसंगीं करणें म्हणजे केवळ व्यक्तिगत नावडीमुळें किंवा विचारामुळें काम करणाराचे मार्गांत अडचण टाकणें आहे. पण—पण इलाज नाहीं. मनुष्यस्वभाव असाच आहे व असेंच चालणार! तरी पण स्वतंत्र देशांत असें वातावरण नसावें असें वाटतें. असो.

### ता. ६–४–१९२८

सायंकाळीं श्रीमती अनसूया साराभाई यांजकडे एका तंट्याचे निकालासाठीं गेलों होतों. तेथें विलायतेस जाण्याच्या गोष्टी निघाल्या. त्यांनींहि काहीं विलायती माल—कापड—घेतलेंच आहे. गरम कापड तेंच पाहिजे, त्याशिवाय चालणार नाहीं असें म्हणाल्या. मला काय करावें लागतें व काय प्रसंग येतो तो पाहावा. मी तर अगदींच गांगरून गेलों आहें. म्हातारा मनुष्य व त्याचा बैल अशी माझी स्थिति झाली आहे. परदेशी कापड घेण्याची मुळींच जरूर नाहीं असें मला ठाम वाटतें. प्रश्न स्वतःच्या मनोधैर्याचा. कोणत्या तऱ्हेचा पोषाख हा प्रश्न गौण आहे. पण तेथेंहि मनाचीच दुर्बलता हें प्रांजलपणें कबूल केलें पाहिजे. आपल्या पोषाखांत असलें तर लोक आपलेकडे मुद्दाम पाहात राहातील, तें बरें नाहीं. To attract attention ( लक्ष वेधून घेणें ) नको, ही मुख्य सबब. पण मी म्हणतों लोकांनीं पाहिले म्हणून काय झालें? पण तितकें मन मजबूत नाहीं हेंच खरे!

### ता. ७–४–२८

श्रीमती अनसूया साराभाई कालचेच कामासाटीं भेटल्या होत्या. पुन्हां विलायतेच्या कपड्यांविषयीं गोष्ट निघाली. स्वदेशीचें व्रत हिंदु-

स्थानाबाहेर नाहीं असें त्यांनीं सांगितलें. मला ही गोष्ट पटत नाहीं. मी व्रत घेतलेलें नाहीं. मला येथेंहि परदेशी कापड घेण्यांत व्रतभंग आहे असें वाटत नाहीं. पण जी गोष्ट पटत नाहीं ती कशी करावयाची? स्वदेशी वस्तु वापरणें तें आपले मनोवृत्तीमुळें आपण करीत असतों. त्यास स्थल-मर्यादा कशी? पण निरनिराळ्या देशांतील हवामान व रीतिरिवाज व आपलें प्रकृतिमान व मनोबल पाहून चालावयाचें. माझा टाम असा आग्रह नाहीं. पण आग्रह ठेवण्याचा प्रयत्न जरूर करणार. पाहावें कसें जमतें तें. मी तर अगदीं घोंटाळ्यांत पडलों आहें व भांबावल्यासारखा झालों आहें. जर एकटाच जाणार असतो तर अशी कुचंबणा झाली नसती. पण ज्या चारचौघांबरोबर जावयाचें त्यांस काय वाटेल हा पहिला प्रश्न येतो. परदेशांत मला कोण ओळखतो व तेथील लोकांच्या मनाची मला काय पर्वा? पण आपलीच मंडळी रागावतील किंवा त्यांस वाईट वाटेल असें करणें म्हणजे जरा जीवावर येतें.

ता. ८–४–२८

सायंकाळीं रा. जहांगीरराव यांचेबरोबर काश्मीर स्टोअरमध्यें स्वदेशी व शुद्ध गरम कापड घेण्यासाठीं गेलों होतों. चांगलें कापड मिळूं शकतें. मला वाटतें कीं सर्व स्वदेशी कापडांत होऊं शकेल. पोषाकाची तऱ्हा मात्र विलायती ठेवावी लागेल असें वाटतें. आतां नेक्टाय, कॉलर वगैरेचें कसें करावें? कॉलर तर त्याच कापडाचे करवितां येतील. टाय कसे मिळतात तें पाहावें. असो. मोजे तर परदेशीच. गरम गंजिफ्रॉक येथील मिळूं शकतील असें वाटतें. मोठी चिंता दूर झाली!

ता. ९–४–१९२८

शेठ...... व ......यांनीं कबूल केलेले संकट निवारण फंडास द्यावयाचे पैसे नाहीं म्हटले असें फंड कमिटीचा कारकून ...... यांनीं सांगितलें. ' आधीं सर्वांचे सर्व पैसे वसूल करा–चार लाख रुपये जे

द्यावयाचे आहेत ते सर्व लोकांना द्या व मग माझेकडे पैसे मागावयास या ' असा निर्लज्जपणाचा जबाब मिळाला. अर्थ काय कीं पैसे द्यावयाचे नाहींत. रा. ...... यांजकडूनहि असाच जबाब आला. फरक एवढाच कीं त्यांनीं नुसतें सांगितलें कीं ' माझेकडे मागावयास येऊं नकोस. ' समाजांत अशी मंडळी शिष्ट म्हणून वागूं शकतात. लोकमत त्यांना कांहींच करूं शकत नाहीं ही केवढी शरमेची गोष्ट आहे!! धडधडीत वचन देऊन, कमेटीचे सभेंत नेहमीं हजर राहून, मेमोरंडम् व आर्टिकल्स रजिस्टर करण्यांत भाग घेऊन, शब्दांचा कीस काढून शेवटीं ' नाहीं ' म्हणणाऱ्या बेशरम माणसांस काय उपमा द्यावी हेंच कळत नाहीं. कोणत्याहि सार्वजनिक कार्यांत अशा माणसाशीं संबंध ठेवावयाचा नाहीं असें मला तर करणें जरूर वाटतें व मी ते करण्याचा व करविण्याचा प्रयत्न करणार.

ता. १०–४–२८

दुपारीं शेट कस्तुरभाई भेटले होते. विलायतेस जाण्याचे सूट वगैरे तयार करण्याचे ठरविले. लाब बद कॉलरचे कोट व पाटलून असे सूट करविणेचे ठरले. इतर कपडे म्हणजे निजण्याच्या वेळचा सूट, शर्ट, अचकन वगैरे. सर्व कापड देशीच आहे. फक्त शुद्ध हातविणीचें नाहीं एवढा गौण प्रकार त्यांत आहे. त्यासहि इलाज नाहीं असें नाहीं, पण मनाला चालते असेंच म्हणावयाचे. माझी एक मोटी चिंता दूर झाली.

त्यानंतर त्यांचेशीं संकट निवारण कमिटीविषयीं बोलणें झाले. कारकून जटाशंकर याचेविषयीं श्री. वल्लभभाईचा रिपोर्ट सांगितला. माझ्या दृष्टीनें कारकून यास जी लोन दिली आहे ती बरोबर नाहीं; तरीपण सर्व गोष्टी कमिटीस माहीत असून कमिटीनें लोन दिलेली असलेमुळें त्यांत कारकुनावर अप्रामाणिकपणाचा आरोप येऊं शकत नाहीं. तो निर्दोष आहे. पण कमिटीनें मंजुरी देणें बरोबर नाहीं. असो. श्री. वल्लभभाईस हकिगत सांगितली. त्या रिपोर्टबरोबरच त्यांनीं राजीनामा पाठविला तें मला आवडलें नाहीं, व त्यामुळें गैरसमज होतो असें सांगितलें. त्यांनीं लगेच

तो रिपोर्ट परत पाठविण्यास सांगितलें व आपला तसा इरादा नव्हता असें सांगितलें. मी मात्र दोन दिवस रा. वल्लभभाईनीं कांहीं विशिष्ट हेतूंनीं राजीनामा दिला असें मानून हेतूचें आरोपण त्यांचेवर करीत होतों. या बाबतींत त्यांचेवर मी अन्याय केला त्याबद्दल त्यांचेजवळ क्षमा मागितली पाहिजे.

ता. १३–४–२८

आज महत्त्वाची गोष्ट म्हणजे म्यु०चे चीफ ऑफिसरची निवडणूक. हा प्रश्न बरेच दिवस गाजत होता. शहानिशा झाली. एकंदर दृश्य व परिस्थिति पाहून अंतःकरण रडूं लागलें. हिंदुस्थानची किती अवनत दशा! केवळ स्वार्थामुळें कांहीं मंडळी ( अशी मंडळी–ज्यांना शिक्षित वर्गांत मोजलें जातें ) व इतर मंडळी श्री. वल्लभभाईस विरोध करण्याचे भुताने व कांहीं मंडळी केवळ व्यक्तिशः सूड उगवण्याचे बुद्धीनें मतें देतात व सार्वजनिक म्युनिसिपल हित कशांत आहे ते पाहात नाहींत. याचा अर्थ हाच कीं स्वराज्य अजून शेंकडो मैल दूर आहे. वल्लभभाईचा इतका द्वेष का? मला तर ही मनोरचनाच कळत नाहीं. वल्लभभाईस स्वतःचा काय स्वार्थ आहे? ते प्रेसिडेंट असावेत अशी बहुतेकांची इच्छा; ती कां? अर्थात् काम करणारा कोणी तरी पाहिजे, त्याने काम करावे. निःपक्षपात बुद्धीने कोणाचीहि भीडमर्यादा न ठेवितां काम करणारास शत्रू हे असावयाचेच. त्या नात्यानेच म्युनिसिपालिटींत दररोज बारीक सारीक गोष्टींत शिफारशी आणणाऱ्यांना वल्लभभाईविषयीं राग वाटणें स्वाभाविकच आहे. असो. श्री. भगत व मी कॉलेजमध्यें बरोबर. त्यानंतरहि मैत्रीचे नातें बरींच वर्षें. परंतु म्युनिसिपल हिताचे दृष्टीनें सर्व बाजूस ठेवून ते या कामास योग्य नाहींत हें स्पष्टपणें सांगणें सार्वजनिक हिताचे दृष्टीनें जरूर असल्यामुळें मी सभेंत थोडें भाषण केलें. वेळ नसल्यामुळें पूर्ण झालें नाहीं. बोर्डांत केवळ म्युनिसिपल हिताचे दृष्टीनें विचार करण्याची बुद्धि दिसत नाहीं. याबद्दल दिलगिरी प्रदर्शित करून रा. भगत माझे सहाध्यायी व मित्र असल्याचें सांगितलें. रा. वल्लभभाईचे हेतूविषयीं कांहींहि म्हटलें तरी

माझेविषयीं तसें म्हणतां येणार नाहीं. मी त्याचा ( भगतचा ) मित्र म्हणून बोर्डांत गेलों. माझे व सर रमणभाईचें शिष्टाईमुळे सन १९२५ सालीं हा प्रश्न बाजूस ठेविला होता. त्यानंतर सॅनिटरी कमिटीचा चेअरमन् मी वर्षभर होतों. ( अदमासें जून १९२५ ते मे १९२६ ) त्या दरम्यान मला जो अनुभव आला त्यावरून या हुद्द्यास रा. भगत मुळींच योग्य नाहींत असा अनुभव आला. जोंपावेतों हा गृहस्थ म्युनिसिपालिटींत आहे तोंपावेतों लटपट जाणार नाहीं असा ठाम अनुभव आला असे सांगितले. विशेषतः मुसलमान लोकांचीं प्रेतें पुरण्याचे कामाचे बाबतींत अत्यत गर्ह्य वर्तन झाल्याचे व त्यासबधांत कागद उडविले गेल्याचेहि सागितले. शेवटी कोणी ऐकणार नाहीं ही खात्री असताहि केवळ कर्तव्य या दृष्टीने व धोक्याची सूचना म्हणून सांगत आहे. व माझे मत चुकीचे ठरल्यास मला अतिशय आनद वाटेल. व जर कोणास अन्याय मी करीत असेन तर त्याची माफी मागण्याचीहि माझी तयारी असल्याचें सांगून वेळ झाल्यामुळे भाषण सपविले. शेवटीं भगत निवडून आले !

त्यानंतर खाडिया चार रस्ता क्लबात गेलों होतो. रा. वल्लभभाईनीं राजीनामा देण्याचे ठरविलेच होते. पण सल्ला विचारली. माझे मतेहि त्यानीं राजीनामा द्यावा असेच वाटले व तसं सागितले. त्याप्रमाणे त्यांनीं तो दिला.

ता. १५–४–१९२८

आज तिसरे प्रहरीं रा. भोगीलाल टाकर भेटावयास आले होते. विलायतेस काय पाहावें, कोणते दृष्टीने, खाणेपिणें, बसणे उठणे वगैरे सर्व बारीक सारीक गोष्टींतहि त्याचा अनुभव कसा काय वगैरे समजून घेण्यासाठीं त्यांना बोलाविलें होतें. थोडा वेळ होता, त्यामुळे बोलणें पुरतें झालें नाहीं. पुन्हा एकदां भेटणार आहे.

सायंकाळीं सर चिनूभाईकडे त्यांचा वाढदिवस असल्यामुळें गेलों होतों. कारंजाचे हौदांत पोहणें, नंतर गप्पा व जेवण, नतर खेळ, बसणें-

बागडणें वगैरे झालें. शेवटीं रा. कनू देसाई यांनीं जुन्या तऱ्हेचा एक नाच नाचून दाखविला. तो चांगला होता.

तेथें प्रो. ध्रुव ( धाकटे ) व इतर मंडळी आली होती. परवां ता. १३–४–२८ रोजीं मी म्यु.त जें भाषण केलें तें त्यांना सर्वांना पसंत पडलें.

## ता. १८–४–१९२८

सकाळीं रा. वल्लभभाई पटेल आले होते. त्यांनीं दिलेल्या राजीनाम्याविषयीं शेट अंबालाल साराभाई यांनीं आपले पार्टीतर्फे पत्र लिहिलें होतें कीं जर तुम्ही राजीनामा परत घेत असाल तर तुम्हांस तशी विनंति करण्याची आमची मर्जी आहे. त्यास उत्तर द्यावें कीं न द्यावें व दिलें तर काय याचा विचार करावयाचा होता. उत्तर द्यावें असें ठरलें व त्याप्रमाणें दिलेंहि. रा. वल्लभभाई यांचे अभिप्रायाप्रमाणें करावयाचें नाहीं, इतकेंच नव्हे तर त्यांचे अभिप्रायाचे Bona fides ( शुद्धते )-विषयीं शंका ठेवून चालावयाचें व पुन्हां राजीनामा परत घ्या म्हणावयाचें म्हणजे दाखवावयाचे व चावावयाचे दांत वेगळे, अशा तऱ्हेचें इंडिपेंडंट पार्टीचें वर्तन आहे.

सायंकाळीं म्यु. मीटिंग होती. तेथें रा. वल्लभभाईंचे राजीनाम्याचा विचार व्हावयाचा होता, तेव्हां गेलों होतों. रा. वल्लभभाईंवर विश्वास आहे व त्यांनीं उत्तम काम केलें आहे अशा अर्थाची रा. अंबालाल साराभाई यांची उपसूचना पसार झाली. रा. ....... यांनीं ठरावांत 'विश्वासा' बद्दलचा कांहीं उल्लेख केला नव्हता, तरी पण रा. वल्लभभाई यांचे सेवेविषयीं ते एकमत होते. रा. ......, डॉ. ...... यांनीं मात्र आपल्या विषारीपणाचें व घाणेरड्या मनाचें प्रदर्शन केलें. या लोकांचे अंगीं श्री. वल्लभभाईविषयींचा द्वेष किती रोमरोम भरला आहे तें मात्र दिसून आलें. रा. वल्लभभाई एका प्रकारच्या दिव्यांतूनच पसार होत आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. रा. वल्लभभाईंचे राजीनाम्याचा प्रश्न संपल्याबरोबर मी सभेंतून उठून गेलों. पुढें बसावयाची माझी इच्छाहि नव्हती व मला आश्रमांतहि जावयाचें होतें.

### ता. १८–४–२८

त्यानंतर मी आश्रमांत गेलों. युरोपचे प्रवासास जाण्यापूर्वी मी महात्माजींस भेटून त्यांचा आशीर्वाद घ्यावा या उद्देशानें गेलों होतों. भेट झाली. पुष्कळ वेळ बोलणें झालें. युरोपांत आपले देशी पद्धतीप्रमाणें पेहेराव करणें व देशीच कापड वापरणें या माझे विचारास त्यांनीं संपूर्ण दुजोरा दिला, एवढेंच नव्हे तर तेथें गेलेल्यांचे अनुभवहि कळविले. पंडित मोतीलाल नेहरू सर्वच शुद्ध व देशी तऱ्हेचे कपडे वापरतात. पटणाचे राजेंद्रबाबू सध्यां तेथें आहेत त्यांचाहि तोच अनुभव सांगितला. एकंदरींत जर माझे हातून त्याप्रमाणें घडलें नाहीं तर तो माझेच मनाचा कमजोरपणा–सोबतीचे मंडळीमुळेंहि कांहीं अंशीं–यात शंका नाहीं. महात्माजींचा स्वतःचाहि जाण्याचा विचार आहे, पण अजून नक्की नाहीं असें म्हणाले. एकादे आठवड्यांत नक्की होईल.

नंतर त्यांनीं म्युनिसिपालिटीची हकिकत विचारली. भगतचा व माझा संबंध–पूर्वींची हकिकत–त्यांच्यांतील योग्यतेचा अभाव वगैरे सर्व सांगून सभासदांमध्यें त्याला मत देणारांचे तीन वर्ग–म्हणजे १ स्वतःचे स्वार्थ साधणारा, २ असहकारिता हाणून पाडण्यासाठीं रा. वल्लभभाईचा विरोध करणारा व ३ वल्लभभाईविषयींच्या तेजद्वेषामुळें विरोध करणारा–सांगितलें. त्यांनाहि तें पटलें. पण दुर्दैवाने सर्वच ठिकाणीं हा प्रकार आहे असें त्यांनीं सांगितलें. पटणा येथें राजेंद्रबाबू, अलाहाबादेस जवाहरलाल नेहरू, कलकत्त्यास दासबाबू, वगैरेंची हीच स्थिति, असें म्हणाले. रा. वल्लभभाई बारडोलीसाठीं मोकळे झाले तें बरे झालें असेंहि म्हणाले.

‘ नवजीवन ’चे ट्रस्टविषयीं विचारलें. माझे जाण्यापूर्वी झाल्यास बरें, नाहींतर आल्यावर झाला तरी हरकत नाहीं असें त्यांनीं सांगितलें.

### ता. २०–४–१९२८

शेट अंबालाल यांनीं कांहीं कामासाठीं म्हणून बोलाविलें. त्यांनीं व त्यांची भगिनी श्रीमती नीमाबेहेन यांनीं आपआपलीं मृत्युपत्रें तयार

केलीं होतीं, त्यांवर माझ्या साक्षी घ्यावयाच्या होत्या. त्यांचे इच्छेप्रमाणें साक्षी केल्या.

शेटसाहेबांचें बील फारच लांबलचक वाटलें. काय मजकूर आहे तो पाहिला नाहीं पण पानेंच्या पानें एवढें लांबलचक बील कशाला हा प्रश्न राहातो. मागचे मंडळींस तंटा करण्याचीच बुद्धि असली तर तो कोणतेहि बिलानें थांबत नाहीं. जेथें जेथें भांडणें होत नाहींत तेथें तेथें मुख्य श्रेय न भांडणाऱ्या मंडळींस व त्यानंतर गौण रीतीनें दस्तैवज तयार करणाऱ्या वकिलांस असा अनुभव नमूद करण्यास हरकत नाहीं. असो.

ता. २१–४–१९२८

विलायतेस जाणेपूर्वी मंडळींना भेटणें वगैरे आजपासून विशेष जोरानें सुरू झालें. दुपारीं इलेक्ट्रिसिटी कंपनीचे मॅनेजर मि. बाल्डविन यांस भेटलों. त्यांनीं प्रवास कसा करावा व कोणते ठिकाणीं जावें वगैरे कळकळीनें सांगितलें. खाणेंपिणें, पेहेरवेश वगैरेविषयींहि त्यांनीं अडचण नसल्याचें सांगितलें. कोणत्याहि वेषात जावयास हरकत नाहीं. अर्थात् नवीन पोषाखांत असल्यास लोक कांहीं वेळ पाहातात, पण तें स्वाभाविक आहे. तेथून रा. रा. रामराव संत यांचेकडे सायंकाळीं ७॥ वाजतां फराळास गेलों होतों. इतरहि १०।१५ मंडळी होती. मी विलायतेस जात असल्यामुळेंच मुद्दाम त्यांनीं बोलाविलें होतें. रा. श्रीधर भटजी अग्निहोत्री तेथें होते. प्रायश्चित्ताबद्दल अर्धवट थट्टेनें व थोडासा गंभीर असा वादविवाद अथवा बोलणें झालें. “ महायात्रेस केव्हां जाणार ? ” असा मध्यंतरींच श्रीधर भटजीनीं एकदां प्रश्न केला होता. त्याचा फायदा घेऊन प्रायश्चित्ताची आता जरूर उरली नाहीं असें विनोदानें म्हणत म्हणत माझें मत पुढें ढकललें. आल्यावर मी प्रायश्चित्त जरूर घेणार आहें, पण तें ती. मातोश्री बाईंचे समाधानासाठीं व कांहीं अंशीं समाजबंधनें राहावीं या दृष्टीनेंच घेणार आहें. प्रत्येक मनुष्य जर केवळ स्वैर वर्तेन असें म्हणूं लागला तर समाज चालेल कसा ? जेथें अनीतिमय गोष्ट नाहीं तेथें आपणांस वेडगळ किंवा निरर्थक वाटणाऱ्या गोष्टींतहि समाजाचे मतास मान देणें जरूर आहे. व याच दृष्टीनें

प्रायश्चित्त घेणार; पण ते घेण्याची जरूर नाहीं व आग्रह नसावा असें मत पण त्याचबरोबर प्रतिपादन करीत राहाणार.

ता. २३–४–२८

सायंकाळीं महाराष्ट्र समाजांत पानसुपारी मी विलायतेच्या प्रवासास जाणार म्हणून होती. बरोबर वेळेवर मी गेलों होतों. अगदीं वेळेवर अशी ५।७ मंडळी आली होती. पण मागाहून थोडेच वेळांत बरीच मंडळी जमली. प्राथमिक संभाषणांत सुरुवात प्रो. आठवले यानीं केली. ग्लोब ट्रॉटर ( जगभर भटकणारे ) अमेरिकन प्रवासी जसे वरवर पाहातात, त्यांत कांहींच अर्थ नसतो अशा तऱ्हेने न पाहाता सर्व नीट पाहाण्याचा उपदेश देऊन व ताशेरा झाडून तेथे Thinkers ( विचारवंत ) जे आहेत त्याना अवश्य भेटा अशी सल्ला दिली. मी सर्व ऐकून घेतलें. नंतर मी कां जात आहे ते सांगण्याचा प्रयत्न केला. समाजसेवेसाटीं जास्त लायक बनण्यास प्रत्येक सेवकाने पाश्चात्य संस्कृति पाहिली पाहिजे. त्या देशांत पर्यटन करून ज्ञान मिळविले पाहिजे. फक्त पुरुषानींच केवळ हें पाहून उपयोगीं नाहीं; पण स्त्रियानींसुद्धा पाहिलें पाहिजे. स्वयपाकघर व दिवाणखाना यांतील मत व दृष्टिबिंदू यात जमीनअस्मानाचे फरक असल्यामुळें समाजसुधारणा होत नाहीं व संसारहि व्हावा तसा सुखकर होत नाहीं. म्हणून समान दृष्टिबिंदू होण्यासाटीं दोघानींहि गेले पाहिजे असें पुष्कळ वर्षापासून वाटत आहे. जाऊन काय काय निरीक्षण करणें हें निश्चित नाहीं. सर्वच पाहाणें व जे पचविणे शक्य तें पचविणें. अशा स्थितींत सर चिनुभाईचें आग्रहावरून जाण्याची गोष्ट घरीं काढली असता श्री. मातोश्रींचा रुकार मिळाला. तो मिळाल्याशिवाय जावयाचे नाहीं हें जसें नक्की तसेच एकदां जावें हें पण नक्कीच. तेव्हां थोडा जास्त खर्च झाला तरी हरकत नाहीं. पण एकदां या पडत्या फळाची आज्ञा घेऊन जाऊन यावें म्हणजे पुढेंमागें दोघांनीं जाण्याचा जो विचार त्याचा अंमल करणें जास्त सुकर होईल. या विचारानें या खेपेचें जाणें अचानक

रीतीनें नक्की झालें आहे असें सांगितलें. त्यानंतर रा. वैशंपायन यांनीं समाजातर्फे निरोप देतांना थोडेसें औपचारिक भाषण केलें त्यांत इंग्लिश स्वभावांत स्वातंत्र्यप्रियता कां आहे याचें अवलोकन करा व जेथें फिराल तेथें राष्ट्रीय दृष्टि ठेवा असे दोन मुख्य मुद्दे होते. त्यानंतर मला हार व कलगी व पानसुपारी दिली. हार कलगी वगैरे प्रकार नको होता. मी विलायतेस जाण्यास निघालों त्यांत एवढें मोठें काय केलें? मी रा. भाऊतात्या जांभेकर यांस त्याप्रमाणें सांगितलेहि. पण माझी विचारसरणी त्यांस पटली नाहीं. असो. उत्तरादाखल मी थोडेसें औपचारिक भाषण करून राष्ट्रीय दृष्टि जरूर ठेवीन असे सांगून कपड्यांचे बाबतींत माझे मनाची स्थिति कशी झाली वगैरे हकिकत सांगितली. कपडे बहुतेक देशी कापडाचे व देशी तऱ्हेचे करविले आहेत व तेच ठेवणार आहे असें सांगितलें. शेवटीं सर्वांचे आभार मानले.

तेथें सत्याग्रहाश्रमांतून श्री. कारखाननीस आले होते. रा. मगनलाल गांधी बिहारमध्यें वारल्याची तार आल्याचें त्यांचेकडोन समजलें. महात्माजींचा उजवा हातच गेला. त्यांचेमुळें आश्रमाची महात्माजींस चिंता नव्हती. ईशेच्छा असें म्हणून स्वस्थ बसण्यापलिकडे उपाय नाहीं.

ता. २४-४-२८

आश्रमांत गेलों. कै. मगनभाईंचे मृत्यूनंतर जाणें प्राप्त होतें म्हणून गेलों होतों. पोंचलों तेव्हां प्रार्थना आटोपली होती. महात्माजींनीं मागाहून रा. छगनलाल जोशी यांस कोर्टांत साक्ष देण्यास ते हजर न राहिल्यामुळें वारंट काढून मॅजिस्ट्रेटनें कसें पकडलें व तसें स्वतःला पकडूं देण्यांत आपला उद्देश काय तें सांगितलें. गरिबीचा आपण स्वीकार केला आहे. तेव्हां गरिबांना कसकशीं व काय काय दुःखें भोगावीं लागतात याचा आपण स्वतः अनुभव घेतलाच पाहिजे. समन्सबरोबर प्रवास-खर्चाचे व अन्नपाण्याचे पैसे जर पाठविले नाहींत तर गरीब माणसानें कसें जावयाचें? समन्स आणणाऱ्या शिपायानें रा. जोशी यांची सही घेतलेली नाहीं किंवा प्रवासाचे वगैरे पैसेहि दिले नाहींत. मॅजिस्ट्रेटनें कांहीं पण

विचारपूस न करतां एकदम वारंट काढलें. अशा वारंटाचा अर्थ काय? या दृष्टीनेंच रा. जोशी यांस पोलिसचे स्वाधीन न होण्याची महात्माजीनीं सल्ला दिली.

नंतर महात्माजींची व आमची सर्वांची गांठ पडली. रा. मगनलाल-भाईविषयींच विषय होता. कांहीं वेळ ऐकत बसलों होतों. ही जगाची राहाटीच आहे. आम्ही सेवाव्रत घेऊन बसलों आहोंत तेव्हां आपणांस शोक करून व त्यामुळें कामकाज बंद करून कसें चालणार? सबब कालरोजींहि आश्रमाचे नित्याचे सर्व व्यवहार चालू होते. सेवेंत अंतर नव्हतें.

## ता. २७–४–१९२८

ता. २६ रोजीं एका अपीलाचे कामासाठीं नडियादेस गेलों होतों. आज तिकडून परततांना आगगाडींत बरोबर दोन ओळखीचे पाद्री होते— रेव्ह. मॅस्टन् व रेव्ह. विल्सन्. पुष्कळ गप्पा मारल्या. त्यांनीं आयर्लंडची कांहीं हकिगत सांगितली. शिक्षणविषयक चर्चाहि झाली. हल्लीं मिळत आहे तें शिक्षण नसून केवळ वाचन ज्ञान आहे असें मी सांगितलें. अर्थात् या विधानास पुरवण्या पुष्कळच आहेत. 'सुराज्य' आणि 'स्वराज्य' यांमध्यें 'सुराज्य' मी जास्त पसंत करीन असें ते म्हणाले. अर्थातच माझा मतभेद आहे. मी 'स्वराज्य'च पसंत करतों. डब्लिनची म्युनि-सिपालिटी नवीन आयरिश सरकारनें बंद करून कारभार तीन अधि-काऱ्यांकडे सोंपविला तेव्हांपासून काम थोड्या खर्चांत व जास्त चांगलें होतें; याच्या उलट बेल्फास्टची म्युनिसिपालिटी लोकनियुक्त आहे, पण तेथें कारभार डब्लिनइतका व्यवस्थित किंवा काटकसरीचा नाहीं, हें उदाहरण त्यांनीं दिलें. पण तें ऐकूनहि मला त्यांचें म्हणणें पटलें नाहीं.

## ता. २८–४–२८

परवां येथून निघावयाचें. तेव्हां कामाची अतिशयच गडबड. पण मंडळी जी भेटावयास येतात तीं काम करूंच देत नाहींत अशी कांहीं त्रेधा झाली आहे.

सौभाग्यवतीची फारच इच्छा असल्यामुळें तिसरे प्रहरीं रा. कानेटकर यांचे स्टूडिओंत फोटो घेवविण्यासाठीं गेलों होतों. मला स्वतःला इतकी जरूरी वाटली नव्हती, पण सौभाग्यवतीचें मन फार असल्यामुळें तिचे संतोषार्थ घेतले.

सायंकाळीं मुलांसह मी शेट कस्तुरभाईकडे जेवावयास गेलों होतों. रात्रौ लौकरच परत आलों. माझे गैरहजेरींत शेट पोपटलाल एक चांदीचा पेला वगैरे भेट म्हणून देऊन गेले होते. स्वीकारावी, न स्वीकारावी अशा विचारांत मी होतों. त्यांचे बंधूंचा व त्याचा तंटा आहे, त्यांत मी लवाद आहे, म्हणून विचार पडला. अर्थात् मी त्यांचा वकील या नात्यानेंच लवाद आहे व लवादचा निकालहि नक्की झालेला आहे. तेव्हां या भेटीमुळे निकालांत कांहीं फरक पडेल असें नाहीं, पण आक्षेपास जागा नसावी. परंतु दुसरे मन असेंहि खरें कीं या शंकेने न घेणें म्हणजे शेट पोपटलाल याचे प्रेमळ कृतीस अनुदार स्वरूप देणें होतें. म्हणून शेवटीं स्वीकारणे हेंच ठरविले.

ता. ३०–४–२८

आज सकाळीं प्रथम सामानाची सर्व बांधाबांध करण्यास सुरवात केली. एकंदर माझे कपडे फारच छान झाले आहेत. अर्थात् सर्वच शुद्ध खादी नाहीं तरीपण परदेशी एकहि नाहीं ही केवढी संतोषाची गोष्ट ! कोटास अस्तर, बटणे असें कांहीं परदेशी मधून मधून डोकावतें. पण मी अल्पसतोषी माणूस. एवढा बारीकसा विटाळ मला खपतो. नसेल तर जास्त उत्तम. पण तेवढें टाळतां येत नाहीं म्हणून अगदींच सर्व बाजूला ठेवणें मला तरी पटत नाहीं.

रात्रौ घरीं आलेवर सर्व इस्टेटीचे व देण्याघेण्याचें एक ठोकळ टांचण ती. मा. बाईचेसाठीं करून ठेवलें आहे. मृत्युपत्रवजा तें आहे. मला कांहीं कमीजास्त परदेशांत झाल्यास तें मृत्युपत्रच आहे. मला वाटतें सर्व कांहीं गोष्टी मी त्यांत चोख करून ठेवल्या आहेत.

## ता. १–५–१९२८

सायंकाळीं रायपूर मिलचें मजुरांचें बालसंगोपनगृह महात्माजींचे हस्तें उघडण्याचा समारंभ होता. त्यासाठीं मुद्दाम आजरोजीं अमदाबादेस राहिलों होतों. सबब तेथें हजेरी दिली. मालक व कामकरी यांचें नातें पितापुत्रांचें असावें, पाश्चात्यांच्या Intelligent Selfishness ( दूरदर्शी स्वार्थी ) च्या धोरणावर मजुराची सुधारणा व उन्नति करण्याचे धोरण पैसेवाल्यांनीं ठेवूं नये, असा त्यांचे म्हणण्याचा आशय होता.

शेट मंगळदासकडे शेट कस्तुरभाई व ध्रांगध्रा दिवाण यांसहि जेवावयास बोलाविलें होतें. वेळेवर सर्व मंडळीस भोजन सुरूं करणें न झाल्यामुळे मी व शेट कस्तुरभाई लौकरच उठलों व गाडीवर येण्यास निघालों. शेट मंगळदास आपले जेवण अर्धेच टाकून आम्हांस पोचवावयास आले, हारतुरे दिले व मला रु. ५१ चा अहेर केला. माझेवर त्यांची किती ममता व प्रेम! फारच प्रेमानें व आपलेपणानें त्यांनीं निरोप दिला.

स्टेशनवर तर मित्रांनीं प्रेमाचा पाऊस पाडला. हारतुऱ्यांनीं सर्व डबा भरून गेला. नका येऊ असें सांगितलें असतांसुद्धां खूप मंडळी आली.

## ता. २–५–२८

आज सकाळीं मुंबई मुक्कामीं दाखल झालों. आजचे सर्व दिवसांत थॉमस् कुकचे ऑफिसांत जाणे येणें व कांहीं किरकोळ खरेदीपलिकडे कांहीं एक झाले नाहीं. मोजे व गरम चड्ड्या परदेशी घ्याव्या लागणार अशी भीति होती. पण सर्व कांहीं उत्तम तऱ्हेचें स्वदेशी मिळालें. बूट मात्र परदेशी आले. स्वदेशी मिळत नव्हते असें नाहीं, पण जितकें चांगले असावे तितके नव्हते व मीच त्याचा आग्रह धरला नाहीं.

युरोपचे मुख्य मुख्य शहरीं प्रवास करावा अशी इच्छा असल्यामुळें त्या बाबतींत थॉमस् कुकचे ऑफिसात विचारले. मार्सेल्सला उतरून

एक दिवस हॉलंडमध्यें होणारी साक्षीदारी जबानी संपवून लगेच प्रवास करावा अशा बेतानें व एका महिन्याचे बेतानें अदमासें १५० पौंड खर्च येईल असें सांगितलें. मित्रांचा विचार घेऊन मग काय तें नक्की कळवीन असें सांगितलें.

ता. ३–५–१९२८

सकाळीं शेट कस्तुरभाईकडे गेलों होतों. त्यांनीं सल्ला दिल्यावरून युरोपचा सबंध प्रवास थॉमस् कुकचे मार्फत करविणें नाहीं असें ठरविलें. विलायतेंत खर्चासाठीं लागणाऱ्या पैशाची तजवीज स्वतंत्र असलेली बरी असेंहि त्यांनीं सुचविलें. मी सर चिनुभाईकडे रु. तीन हजार पाठविले आहेत व जसजसे पैसे लागतील तसतसे त्यांचेकडोन घेणार आहे.

रात्रौ रा. रा. गोविंदराव सरदेसाई बडोदकर व रा. रा. गोविंदराव सरदेसाई कोल्हापूरकर या दोघांसहि त्यांचे ब्रिन्हार्डीं भेटलों. सरदेसाई घराण्याचे इतिहासाविषयीं व पुढील सालचे ( १९२९ चे ) संमेलनाविषयीं बोलणें बरवर झालें. दोन्ही अवश्य करावयाचीं असें ठरविलें.

ता. ५–५–१९२८

आज बोट निघावयाची म्हणून सकाळपासूनच गडबड. सर्व मंडळीसह ११ वाजतां मोल स्टेशनवर हजर झालों.

आगबोट सुटण्यापूर्वी पोंचवावयास आलेल्या मंडळीस खालीं उतरावें लागलें. तेव्हां तीं. मा. बाई व सौभाग्यवती यांस अश्रू आले. मलाहि फारच वाईट वाटलें; पण माझें मन अश्रू येण्याइतकें मऊ नव्हतें. निरोप देणाऱ्या सर्वांसच एक प्रकारें आनंद व एक प्रकारें दुःख वाटलें. बरोबर दीड वाजतां आगबोट सुटली व सुमारें १५ मिनिटांत बंदरावरची मंडळी दिसेनाशी झाली.

—*—

# भाग २ रा

ता. ५-५-१९२८

केवळ दररोजचा धंदा करून खावें, प्यावें व शरीराचा कांहींहि विशेष उपयोग न करतां आयुष्ययात्रा संपवावी असा माझा प्रथमपासूनच दृष्टिबिंदु नव्हता. कुटुंबांतील माणसांसाठीं कांहीं तरी करणें, त्यांची सेवा करणें, हा धर्म तर खराच, पण जन्मभर तेंच करावें असें नाहीं. आयुष्यांतील उत्तम भाग—जवानीचा—कुटुंबाप्रीत्यर्थ खर्च झाल्यानंतरसुद्धां पुढें जनसमाजाची सेवा करून त्या तऱ्हेने ईशसेवेत घालवावें असा हेतु असल्यास व त्याप्रमाणें वर्तल्यास कुटुंबाची हेळसांड केल्याचा दोष खास पदरीं येणें शक्य नाहीं; आला तरी मग त्याची पर्वा नाहीं. तेव्हां जन-सेवा हा अंतिम हेतु नक्की झाल्यामुळें व त्यासाठीं, तसेंच स्वतःसाठीं, ज्ञानार्जन हें अवश्य असल्यामुळेच प्रवास व देशाटन मी जरूर मानलेलीं आहेत. वास्तविक प्रथम स्वदेशपर्यटन व नंतर परदेशपर्यटन. परंतु तसें जरी न झालें तरी परदेशपर्यटन संधी आली असतां केलेंच पाहिजे असें वाटत होतें. स्वदेशांत तरी बहुतेक ठिकाणें मुख्य मुख्य अशीं कॉंग्रेस, वकिली व इतर प्रसंगीं मिळून पाहिलेलीं आहेत. पंजाब, काश्मीर व सिंध याशिवाय जवळ जवळ सर्व हिंदुस्थान उडत उडत पाहिलें म्हणा-वयास हरकत नाहीं.

पाश्चात्य देश, संस्कृति, लोक व तेथील सर्व प्रकारच्या संस्था—सामा-जिक, राजकीय, शिक्षणविषयक वगैरे सर्व—एकदां प्रत्यक्ष पहाव्या असें पुष्कळ दिवस मनांत होते. विशेषतः इंग्रज लोकांच्या संस्था जास्त जवळून व विशेष बारकाईने पहाव्या ही इच्छा. त्यामुळें ज्ञानप्राप्तीबरोबर दृष्टिबिंदु विशाल होऊन मनांत धरलेल्या जनसेवेस त्याचा फार उपयोग होईल असा भरंवसा वाटत असल्यामुळें इंग्रजांचा व पाश्चात्य देशांचा प्रवास अंगीकारावा असें वाटत होतें.

या प्रवासाचा योग मोठ्या अकल्पित रीतीनें जुळून आला. गेलीं तीन वर्षें मी सर चिनूभाईकडे ते उन्हाळ्यांत जेथें जातील तेथें जात आहे. प्रथम वर्षी (१९२५) नैनीताल, नंतर दार्जीलिंग, नंतर उटकमंड. जेथें जेथें ते जातील तेथे तेथें मी येईन असें त्यांनीं मजकडून प्रेमानें वचन घेतलेलें. अर्थातच तें हिंदुस्थानपुरतें होतें व मीहि तें एका अटीवर मान्य केलें होतें कीं एकाच स्थळीं दोन वेळां येण्याचें बंधन नाहीं. गुदस्तां उटकमंड येथेंच त्यांनीं बेत केला कीं पुढचे वर्षी (१९२८ सालीं) स्वित्झर्लंडला जावयाचें. अर्थात् मला शक्य नव्हतें. केवळ सुखासाठीं पैसे खर्च करून प्रवास करावा हा हेतु नसल्यामुळे मी अर्थातच नाहीं म्हटलें. नंतर त्यांचा बेत फिरून त्यांनीं इंग्लंडला जावयाचें ठरविलें. मला आग्रह केला. माझें मन द्विधा झाले. एक मन वाटे, कीं जावें; एक मन वाटे कीं २॥–३ महिन्यांसाठीं चार पांच हजाराचें पाणी करून जाणें बरोबर नाहीं.

इकडे सर चिनूभाईंचा आग्रह फार व माझेंहि मन हुळहुळून राहिलेलें कीं थोडे कां होईना पण अगदींच नाहीं त्यापेक्षां बरें. अशा स्थितींत ती. मा. बाईशीं गोष्ट काढली. प्रथम भीतभीतच काढली. एकदां केव्हां तरी विलायतेस जावें हा माझा विचार त्यांना माहीत होता. तेव्हा मी एकटाच जाईन, त्यापेक्षा चांगल्या सोबतींत गेलों तर चिंता कमी या दृष्टीनें त्यांनीं अनपेक्षित रुकार दिला. त्यांचा रुकार मिळाल्यामुळे एक मोठी चिंता दूर झाली. त्यांचे मर्जीविरुद्ध जाणें नव्हतेंच. नुसतें इंग्लंड-लाच जाऊन आलों तर रु. ३००० पावेतों खर्च येईल असा अदमास होता, पण पुढें युरोपांतील मुख्य मुख्य स्थळें पहावीं असें वाटल्यावरून सध्याचा अदमास रु. पाच हजारांचा झाला आहे. कदाचित् सहा हजारांपर्यंतहि जाईल.

निघण्याचें ठरल्यावर मग तयारीविषयीं सुरुवात झाली. प्रवास-खर्चाच्या रकमेची व्यवस्था केली. रु. तीन हजार सर चिनूभाईकडे पाठवून दिले. हे आगाऊ पाठविण्याची जरूर होती असें नाहीं, पण ज्यांच्याशीं मित्रत्वाचा व्यवहार त्यांचेशीं होतां होईल तोंपावेतों पैशाचा

व्यवहार ठेवूं नये अशी माझी समजूत आहे. त्यामुळें कित्येक वेळां क्षुल्लकशा बाबतींत गैरसमज होऊन मित्रत्व जातें. शिवाय थोडक्याशा बाबीसाठीं ओशाळेपणा चांगला नव्हे. अशा विचारानें त्यांचेकडे आगाऊ पैसे पाठवून दिले व माझा जो खर्च होईल त्याचा हिशोब घेऊन जें कांहीं देणें घेणें निघेल तें चुकवावयाचें असें सांगून टाकलें.

विलायतेच्या सफरीची म्हणजे बरोबर काय काय सामान, कपडेलत्ते घ्यावे वगैरेची तयारी दिसण्यांत क्षुल्लक पण एका प्रकारें विशेष कठीण वाटली. हिंदुस्थानांत ज्या तऱ्हेचा पेहेराव करीत असतों तसा तर हवामानामुळें चालणेंच शक्य नाहीं हें उघड होतें, पण जो पेहेराव असावा तो कसा व कशाचा हे दोन मोठे अडचणीचे प्रश्न होते. शुद्ध किंवा मिश्र खादी किंवा हिंदुस्थानचाच माल वापरावा अशी माझी प्रतिज्ञा नव्हती. प्रतिज्ञा असणारासहि हिंदुस्थानबाहेर परदेशी माल वापरतां येतो असें खुद्द महात्मा गांधी यांनींहि मला सांगितलें. पण असें असूनहि माझ्या मनास संतोष होईना. शेवटीं मी सर्व कापड देशी घेण्याचें ठरविलें. सुदैवानें सर्व कापड देशीच मिळालें. दुसरा प्रश्न होता तऱ्हेचा. युरोपियन लोक आमच्या देशांत जर त्यांची तऱ्हा सोडीत नाहींत तर आम्ही तरी आमची तऱ्हा त्याचे देशांत कां सोडावी, या विचारानें मी सर्वच पोषाख हिंदु-स्थानी पद्धतीचा करविला आहे व हॅट वगैरे कांहीं न ठेवतां टोप्या साध्या खादीच्या व फेटा असा बेत केला आहे. मला वाटतें अशा पेहेरावामुळें कदाचित् कांहीं लोक माझ्याकडे कुतूहलदृष्टीनें पाहातील हें खरें, पण राष्ट्रीयत्व व आपलेपणा म्हणजे काय हें ज्या लोकांस पूर्ण माहीत आहे अशा इंग्रज लोकांस त्यांच्या पोषाखाच्या अनुकरणापेक्षां त्यांच्या गुणांचें अनुकरणच जास्त प्रिय वाटेल. पण कदाचित् त्यांना नाहीं वाटलें तरी मला त्याचें काय?

इतकें असूनहि शॉर्ट कोट व नेकटाय हॅट मला घालावयाचीच नाहीं असा माझा आग्रह नाहीं. माझ्या पोषाखामुळें मला इंग्रज लोकांत मिसळण्याची अडचण होते व शिक्षणाचा माझा उद्देश साध्य होणार नाहीं असें मला वाटेल त्यावेळीं मी त्यांचेप्रमाणें पोषाख करण्यास तयारच आहे.

दुपारीं बरोबर दीड वाजतां बोट सुटली. त्याच वेळेस दुपारची न्याहा-रीची वेळ असल्यामुळें ब्यूगल होऊन सर्व मंडळी न्याहारीस गेली. आम्ही मात्र डेकवर मुंबई दिसत होती तोंपावेतों होतों व मग डायनिंग हॉलमध्यें न्याहारीसाठीं गेलों. सर्वजण आटोपून गेले होते; पण पहिलाच दिवस असल्यामुळें सर्व कांहीं केवळ वक्तशीर नव्हतें. आम्हांस भूक नव्हती, पण काय काय देतात व कसे कसें याचा अनुभव घेण्यासाठींच आम्ही गेलों होतों. त्यांतून आम्ही शाकाहारी, त्यामुळें तर जाणण्याची विशेष जरूर. सर चिनूभाई व शेट कस्तुरभाई यांनीं आपलेबरोबर आचारी आणलेले आहेत, पण होतां होईल तो आगबोटींतच मिळणाऱ्या शाकाहारी पदार्थां-वर भागवावयाचें असा निश्चय केला आहे. हें जेवण अंगवळणीं पडण्याची जरूर आहे. तसें न झाल्यास सर चिनूभाई किंवा कस्तुरभाई यांचेव्यतिरिक्त मला एकट्यालाच जो प्रवास करावयाचा आहे त्याचें कसें होणार!

दुपारीं लंच झाल्यावर आम्ही डेकवर गेलों. 'बी' डेकवर पर्सरचें ऑफिस आहे. सर्व नोटिसा, माहिती, वगैरे तेथें लावलेलीं असतात. जी माहिती पाहिजे असते ती तेथें मिळतेहि. बिनतारी विद्युत्संदेश येतात तेहि एका फळ्यावर येथें लावलेले असतात. एकंदर जगांतील सर्व महत्त्वाची बातमी या रीतीनें रोज ताजी मिळत असते. पण त्यांत पहातां हिंदुस्थानांतील बातमी मात्र नाहीं! बरोबरच आहे. हिंदुस्थानांत असें महत्त्वाचें जगाचे दृष्टीनें काय आहे? बारडोलीची काय स्थिति आहे वगैरे हकीकती आम्हांस शिळ्याच म्हणजे हिंदुस्थानांतील पत्रांतून मिळतील त्याच मिळावयाच्या.

आज पर्सरच्या बोर्डावर नोटीस होती कीं तीन वाजतां घड्याळ अर्धा तास मागें करावें. मी त्याप्रमाणें घड्याळ मागें लावलें.

बोटीवर देशी उतारू पुष्कळच आहेत. सर चिनूभाई व त्यांची मंडळी माझ्यासुद्धां १० व शिवाय दोन नोकर, शेठ कस्तुरभाई लालभाई व मंडळी मिळून ५ जण व एक नोकर. शिवाय पहिल्याच दिवशीं ओळ-खीची असलेली मंडळी म्हणजे मि. महंमदअली जीना (बॅरिस्टर),

श्री. षण्मुखम् चेट्टी (एम्. एल्. ए.), डॉ. रॉली (पंजाब सरकारचे व्यापार व उद्योग खात्याचे सल्लागार) व शिवाय इतर पारशी, गुजराथी वगैरे मंडळींचा भरणा होता. महाराष्ट्रीयांमध्यें मी व रा. बखले असे दोघेच असल्याचें सायंकाळपावेतों माहीत होतें.

सायंकाळीं जेवणाची वेळ होईपावेतों बोटीवरच फिरलों. सूर्यास्ताचा देखावा फारच मनोहर वाटला. समुद्र अतिशय शांत आहे. चहूंकडे पाण्याशिवाय कांहींच दिसेनासें झालें. पण समुद्र इतका शांत आहे कीं अगदीं सपाट जमिनीसारखा पसरलेला दिसत आहे. आगबोटीचे जाण्यामुळें ज्या लाटा उसळतील त्याच.

रात्रौ जेवणाचे वेळीं आज पहिलाच दिवस असल्यामुळें मंडळी कपडे बदलून आली नव्हती. मीहि माझ्या खादीच्या—सुरवार व लांब उत्तर हिंदुस्थानी पेहेराव व पांढरी टोपी घालून बोटीवर चढलों होतों त्याच—वेषांत डायनिंग हॉलमध्यें गेलों. मी व रा. दिवान असे दोघे खादीवाले व तिसरे श्री. श्रीनिवास अयंगार. तरीपण आम्हां दोघांकडे सर्वजण विशेष पहात असावे असें वाटलें. पण त्या पहाण्यांत सामान्य कुतूहलापेक्षां कांहीं विशेष अर्थ होता असें मला वाटत नाहीं. आम्हीहि त्यांचे प्रत्येक कृतीकडे तसें पहात नाहीं का ?

आम्ही सर्व शाकाहारीच असल्यामुळें सर्व ठीक जमतें. जेवणाचे पदार्थांची यादी—मेन्यू—रोज प्रत्येक वेळचा एका सुंदर कार्डावर छापून ठेवलेला असतो. मी आमचे वेटरला (वाढप्याला) प्रत्येक पदार्थाविषयीं विचारतों, कसा खावयाचा, त्यांत काय आहे वगैरे व तोहि मोठ्या कौतुकानें व आनंदानें सांगतो. मेन्यू बोटीवरच रोज छापतात.

जेवण बरें गेलें. उपाशी राहिलों असें वाटलें नाहीं. ब्रेड्, बटर व फळें यांवरच मारा चालू ठेवला.

त्यानंतर डेकवर फिरलों. सृष्टिसौंदर्यांत विशेष नयनमनोहर वाटला तो पाण्याचा रंग. मुंबई सोडल्यापासून पाणी हिरवट होतें तें पुढें साधारण निळें असें होऊन मध्यसमुद्रांत आल्यावर तर जांभळें दिसूं लागलें.

मोरचुदाचे पाण्यासारखा अगदीं बरोबर रंग आहे. त्याकडे कितीतरी वेळ पहात राहावेंसेंच वाटतें.

ता. ६–५–१९२८

काल रात्रीं जेवणाचे वेळीं प्रत्येक उतारूचे टेबलावर बोटींतील सर्व उतारूंची छापील यादी ठेविली होती. त्यामुळें बोटीवर कोण कोण उतारू आहेत तें कळण्याचें साधन झालें.

येथील दिनचर्या रोजची सारखीच. कपड्यांचें व बाह्य टापटिपीचें बंड फार. मला तर ती एक कसरतच होऊन बसली आहे. रोज दाढी करणें, दिवसांतून तीन वेळां केंस विंचरणें, कपडे बदलणे म्हणजे कोण यातायात ? पण येथें दुसरा कांहींच कामधंदा नसल्यामुळें मला वाटतें वेळ घालविण्याचें साधन म्हणून ठीक आहे.

मी आज सकाळपासून खादीचाच पोषाख केला होता. सुरवार व अचकन. डोक्यास कांहीं ठेविलें नव्हतें.

लंचसाठीं गेलों होतों. खाणें बरें गेलें. नंतर वर आलों. एकसारखा हालल्यासारखा भास होत होता, पण उलटी होईल असें वाटत नव्हतें. सर्व दिवस डेकवरच आरामखुर्चीवर पडून राहिलों होतों. सायंकाळीं फिरत होतों. त्यामुळें एकंदर बरें वाटलें. सौम्य तऱ्हेची बोट लागल्याचाच हा प्रकार होता. समुद्राचे हवेमुळें पुष्कळास असें होतें. यास उत्तम उपाय म्हणजे केबिनमध्यें न राहातां डेकवर येणें हाच होय.

रात्रौ काळा सूट घालून भोजनास गेलों. कपड्याचे टापटिपींत जीव कासावीस होतो खरा, पण ‘एक नूर आदमी आणि दस नूर’ कपडा याची सत्यताहि कांहीं अंशीं पटते. इंग्लिश बायका निरनिराळ्या तऱ्हेचे पोषाख घालून येतात. पण सर्वांत खांद्यांपासून हात उघडे व ढोपरांपासून खालीं तंग चामडीचे रंगाचे पायमोजे. यामुळें त्या बाया जास्त सुंदर दिसतात असें वाटत नाहीं, पण जास्त विषयाकर्षक मात्र दिसतात. कदाचित् युरोपियन लोकांना नेहमींच अशा तऱ्हेची संवय असल्यामुळें विशेष

वाटत नसावें हें स्वाभाविक आहे. संवयीचा परिणाम पुष्कळ आहे यांत शंका नाहीं. या सर्व बाया केस कापवितात व ब्रिड्या पिणाऱ्यांची संख्या पुष्कळ आहे.

युरोपियन बायांचें ठीक आहे; त्यांचा समाज वेगळा, आचारविचार वेगळे, हवापाणी वेगळें. पण जेव्हां हिंदुस्थानी बाया त्यांच्या या प्रकाराचें अनुकरण करतात तेव्हां अतिशय वाईट वाटतें व संतापहि येतो. गरती स्त्रियांप्रमाणें त्या दिसत नाहींत. नटवेपणाची किळस वाटते. बोटीवर अशा तीन चार बाया आहेत. अगदीं प्रामुख्यानें दिसते ती ... यांची मुलगी व मि. ... यांची स्त्री. सगळा दिवस नटण्यांत मुरडण्यांत, हंसण्या खिदळण्यांत, दारू पिण्यांत व कपडे बदलण्यांत घालविते. मला तर तिच्या नवऱ्याची कींव आली व तिच्या शिक्षणा(?)साठीं खर्च झालेला पैसा व्यर्थ गेला असें वाटलें. पण माझे विचार तिला काय उपयोगी? आपल्या समाजानें पाश्चात्याचें अनुकरण करण्यांत फारच सावधगिरी ठेविली पाहिजे. कपडे नीटनेटके, सुंदर असावे, पण नाटकी नसावेत, एवढाच माझा मुद्दा.

आज शेठ नरोत्तम मोरारजी व रा. सा. अभ्यंकर (नागपूरचे) यांची ओळख झाली. रा. सा. अभ्यंकर फ्रान्समध्यें असलेल्या मुलास आणण्या-साठीं सहकुटुंब जात आहेत. गेलीं सात आठ वर्षे तो इकडे येतच नाहीं. बिचारी आई! धर्माच्या व स्वतःच्या सर्व कल्पना बाजूला ठेवून केवळ पुत्रप्रेमानें हाल–अपेष्टा सोसून जात आहे! त्यांना बोटीवरील जेवण जात नाहीं, तेव्हां सर चिनूभाईकडे व्यवस्था करण्याचें कळवून मी सांगितल्यावरून सर चिनूभाईनीं मोठया आनंदानें 'हो' म्हटलें.

येथील नोकर मंडळींतहि शिस्त व आज्ञाधारकपणा फार दिसतो. काम तर विचारूं नका. आमचे सर्वांआधीं उठून सर्वांचे मागून निजतात. प्रत्येकास कांहीं केबिन सोंपून दिल्या आहेत. त्यांतील सर्व उतारूंची तैनात त्यांचेकडे असते. सकाळीं चहा देणें, बूट साफ करून ठेवणें, बिछाना घालणें, ज्या ज्या वेळीं जें जें लागेल तें करणें व शिवाय ब्रेकफास्ट, लंच, चहा व जेवणाचे वेळीं भोजनगृहांत वाढप्याचें काम

करणें. मला तर ही स्थिति पाहून त्यांची कींव येते व सादर कौतुकहि वाटतें. इतकी शिस्त, इतका सौम्यपणा व इतकें सौजन्य आपल्या नौकर मंडळींत दिसत नाहीं. त्यांचे अंतरांत कांहीं का असेना, आपणांस दिसण्यांत कांहीं एक येत नाहीं. मग अंतरांत तरी कांहीं असेल असें कां गृहीत धरावे ?

बोटीवरील नौकर वर्गांत देशी, युरोपियन वगैरे भेदभावानें सेवा करण्याची वृत्ति दिसत नाहीं.

बोटीवरील समाजांत दोन निरनिराळे विभाग उघड दिसतात— १ देशी व २ युरोपियन. हिंदुस्थानातील युरोपियनांचा ताठा याला कारणीभूत आहे असें जें मानण्यांत येतें तें मात्र मला अजून पटलें नाहीं. आम्ही जसे आमच्या लोकांत मिसळतों तसे ते आपल्या लोकांत मिसळतात व स्वाभाविक ओळख होण्यास तीन चार दिवस लागतातच. सर्व देशी मंडळीशीं तरी आमच्या बसल्याबरोबर कोठें ओळखी झाल्या आहेत ? आणि आम्ही तरी कोठें एकमेकांस विचारतों आहोंत ? तेव्हां इंग्रज लोकांनीं आमचेप्रमाणें मनुष्यस्वभावजन्य सहज वर्तन केलें असतां त्याला निराळें नांव देणें व 'त्यांचा ताटा आहे,' 'राज्याधिकाराची गुर्मी एडनपावेतो असते' वगैरे म्हणण्यांत मला तर अर्थ वाटत नाहीं. असो. पुढें काय अनुभव येतो तो पहावा.

ता. ७–५–२८

बोटीवर खेळ वगैरेस सुरुवात चांगली झाली. करमणुकीचे प्रकार पुष्कळ आहेत. पत्ते, बुद्धिबळें, वाचनालय, टेनिस, नेमबाजी, कडया फेंकणें, पोहणें वगैरे. मी सकाळीं टेनिस खेळलों. तेथें फारच थोडया वेळांत थकल्यासारखें होतें.

इंग्रज लोकांत दरेक बाब म्हणजे व्यवस्थाशक्तीची पूर्णता. खेळ खेळावयाचे तरीसुद्धां कमेटी. लॉर्ड लिन्लिथगो यांच्या अध्यक्षतेखालीं कमेटी नेमली. दोन हिंदी गृहस्थ सभासद आहेत. सर चिनूभाई ट्रेझरर

आहेत व दुसरे चेट्टी. बोट एक दिवसांत किती चालली याबद्दल पैजा आहेत. प्रत्येक खेळावर पैजा.

आतां हिंदी लोकांच्या आपापसांत जास्त भेटी व ओळखी होऊं लागल्या आहेत.

रात्रौ भोजनोत्तर गायन व नाच झाला. कांहीं वेळ पहात होतों. रात्रौ चांदणें चांगलें पडतें, त्यामुळें फारच बहार वाटते. चहूंकडे जांभळें पाणीच पाणी व मध्यें फक्त बोट ! चांदणें मजेदार, दृश्य फारच मनोहर आहे. पण कोटपावेतों? जोंपावेतों निसर्गाचें स्वरूप रम्य आहे तोंपावेतों ! जर कां उग्र स्वरूप धारण केलें तर प्रत्येकाची पांचावर धारण बसण्यास उशीर नाहीं ! मनुष्यानें कितीहि स्वतःच्या अकलेच्या बढाया मारल्या तरी निसर्गापुढें काहीं नाहीं. मनुष्यप्राणी व मनुष्यकृति किती क्षुद्र आहे व केवळ परमेश्वरी कृपेमुळेंच सर्वजण विद्यमान आहोंत याचें क्षणोक्षणीं भान होत आहे. आम्ही सर्व–बोटीसुद्धा–" दर्यामें खसखस " किंवा खसखशीचा एक कण ! पण या बरोबरच इंग्रज लोकाच्या चातुर्याचें, हिंमतीचें व शिस्तीचें कौतुक वाटल्यावांचून राहात नाहीं.

## ता. ८–५–१९२८

आज सकाळीं लौकर उठून, चहा वगैरे आटोपून डेकवर गेलों. तेथें काल स्थापन झालेल्या कमिटीची नोटीस लागली होती. सर्व तऱ्हेच्या खेळांचे सामने व्हावयाचे आहेत. मी डेक टेनिस व बकेटचे खेळ यांमध्यें नांव नोंदविलें आहे.

'ईजिप्तला कोणास जावयाचें असल्यास जातां येईल' अशी नोटीस लागली आहे. माझा जाण्याचा विचार आहे. सहा पौंड पडतील, व सर्व केवळ बारा तासांत पाहून यावयाचें. परंतु पुन्हां योग केव्हां येणार? तेव्हां एकदां पाहून घ्यावें तें बरें असें वाटतें.

घड्याळ रोज अर्धातास मागें लावण्याचें चालूंच आहे. आजच्या-सुद्धां एकंदर २ तास घड्याळ मागें लावलें.

शाकाहारी भोजनाची व्यवस्था बरोबर नसते. मांसाहारी लोकांस विशेष प्रकारचे पदार्थ असतात, तऱ्हा जास्त असतात. असा फरक नसावा वगैरेबद्दल शेठ नरोत्तम मोरारजी यांचेबरोबर पर्सरकडे तक्रार केली. त्यानें झाल्या प्रकाराबद्दल दिलगिरी दर्शवून शक्य ती व्यवस्था करण्याचें कबूल केलें आहे. उद्यांपासून काय फरक पडतो तें पहावयाचें. मला तर एकंदर अजूनपावेतों अडचण वाटली नाहीं. रोज भात असतो, पाव व लोणी असतें व शिवाय बटाटे, चवळीच्या शेंगा, फळें वगैरे असतें. त्यामुळें मी तर पोटभर जेवतों. सर्व पदार्थास एक प्रकारचा वास येतो त्याची मात्र संवय झाली पाहिजे. तो घालविणें शक्य नाहीं. एकाच स्वयंपाकघरांत सर्व स्वयंपाक होणार व एकाच कोठारांत सर्व सामान ठेवणार तेथें वास कसा जाईल ?

जेवताना कसें जेवावयाचें, काटेचमचे ठेवलेले असतात ते कोणते कशासाठीं ? कांहीं डावे बाजूस, काहीं उजवे बाजूस, कांहीं समोर याचा अर्थ काय ? आलेला प्रत्येक पदार्थ काय आहे, कशाशीं व कसा खावयाचा, हें मी वेटरला विचारतों व तोहि मोठ्या आदरानें व प्रेमानें सांगतो. त्याला थोडा अभिमानहि वाटतो. आमचे कंपूतील मंडळींना याचें हसूं येतें, पण मी जी माहिती मिळवितों ती स्वतः माझेकडून मिळविण्यास मात्र सर्वजण उत्सुक असतात. यांतील मर्म हेंच कीं स्वतःचें अज्ञान दाखविणें मनुष्यास जिवावर येतें. आपणांस ज्या गोष्टी माहीत नाहींत त्या विचारण्यांत लाज कोणती, हा माझा विचार झाला. इंग्रज लोक आपलेकडे जेवावयास आले म्हणजे विचारीत नाहींत कां ? तसेंच आपण विचारावयाचें. अज्ञान झांकण्याचा जर प्रयत्न केला तर ज्ञानप्राप्ति कशी होणार ?

**ता. ९–५–१९२८**

आज एडन येणार. सकाळीं सर्व टपाल लिहून ११ वाजण्याचे आंतच पोस्टांत टाकलें.

ईजिप्तला जाण्याचें नक्की ठरवून त्याप्रमाणें ६ पौंड १७॥ शिलिंग म्हणजे ९२ रुपये भरून तिकीट घेतलें. सुएझ कालव्यांतून बोटीस जाण्यास जेवढा वेळ लागतो तेवढयांत पिरामिड, कैरो व इतर स्थळें पाहून रात्रौ पोर्ट सैदवर येऊन बोटींत बसावयाचें. बरोबर इतर मंडळीहि आहेत.

सुमारें ३ वाजल्यापासूनच जमीन स्पष्ट दिसूं लागली. दूरवरचे डोंगर तर सकाळपासूनच अंधुक अंधुक दिसत होते. हा अरबस्तानचा किनारा. चार दिवसांनीं जमीन दिसूं लागल्यामुळें रुक्ष असे डोंगर पहाण्यांतहि मजा वाटली व आनंद झाला.

पोहोंचल्याबरोबर बंदरांतील होडया, मचवे वगैरेमधून तद्देशीय लोकांनीं " औ हे—औ हे " म्हणत टाळ्या वाजविण्यास सुरुवात केली. यांची भाषा अरबी, पण हे शब्द अरबी नाहींत असे एडनच्या एका मुसलमान ऑफिसरानें सांगितलें. ते लोक कांहींतरी मागत होते, व " औ हे " चा अर्थ " सुखी व्हा " असा होता.

येथें आगबोटींतून मिरच्याच्या खूप कोथळ्या उतरल्या. रेशमी रुमाल, गालिचे, ताडाच्या करंड्या, पेट्या, शिंपल्याचे पदार्थ, माळा वगैरे विकणारे लहान लहान मचव्यांतून येऊन स्वतःचा माल दाखवीत होते. सिगरेट—चिरूट वगैरेहि विकावयास आले होते. त्यांना बोटीवर येण्याची मनाई असल्यामुळें ते लोक आपला माल दुरून दाखवीत व चटईच्या झोळींत घालून ती झोळी बोटीवर ओढून घेण्यास उतारूंकडे दोरी फेंकीत. अशा रीतीनें व्यापार चालला होता. किंमती कांहींच्या काहींच सांगत होते. नेहमींच्या सौदे करणाऱ्या मंडळींनीं मात्र भाव बरोबर दिले. रुपयाच्या मालास ५ रुपये असा किंमत सांगण्याचा प्रघात होता. पक्ष्यांच्या पिसांचे निरनिराळ्या तऱ्हेचे पंखे चांगले होते. किंमती जास्त होत्या. गालिचे वगैरे येथील कारागिरीचे नसून युरोपियनच होते असें कळलें.

येथें पाण्यांत बुडी मारून तरणारीं मुलें व माणसें पुष्कळ आहेत. वरून नाणें टाकलें तर तें खालीं जातां जातांच पकडून घेतात. अर्थात् तळापावेतों जाणें शक्य नाहीं व तळावर चिखल वगैरेमुळें दिसणेंहि

शक्य नाहीं. पण तळापावेतों जाऊंच देत नाहींत. अशीं नाणीं ते तोंडांत ठेवतात. बुडी मारतांना फक्त लंगोटीशिवाय दुसरें कांहींच नसल्या-मुळें तोंडाशिवाय दुसरें पैशाचें पाकीट कोणतें आणणार ?

रात्रौ साडे आठचे सुमारास बोट सुटली. बोट सुटल्यावर रा. बखले ( सर्वंट्स ऑफ इंडिया सोसायटीचे सभासद ) यांची रा. गुलाबचंद-मार्फत ओळख झाली.

भोजनोत्तर डेकवर नाच वगैरे चालू होता पण गेलों नाहीं. श्रीमती डाहीबेनबरोबर त्यांचा मुलगा राजाबाबू याने बॅरिस्टर व्हावें कीं काय या प्रश्नांवरून बोलत बसलो होतों. बॅरिस्टर होऊं नये असें माझें मत सांगितलें. धद्यांत अतिशय गर्दी व सुरुवातीस कंटाळून चिकाटी न राहि-ल्यानें पुष्कळ मंडळीचें आयुष्य व्यर्थ जातें. हिंदु कायदा, पूर्वींचा समाज, स्त्रियांची हिंदु कायद्यांतील स्थिति ( status ) वगैरे पुष्कळ गोष्टींवर गप्पा मारीत बसलों होतों.

ता. १०–५–१९२८

आज रात्रौ एडनहून निघालों ते तांबड्या समुद्रांत शिरलों. याला ' तांबडा समुद्र ' कां म्हणतात हें समजत नाहीं. पाण्याचा रंग हिंदी महासागरासारखाच जांभळा आहे.

पर्सरला विचारतां रविवारीं ( ता. १३ रोजीं ) सकाळीं ६ वाजतां सुएझला पोचूं अशी अटकळ आहे, व ७ वाजतां आम्ही कैरो–पिरामिडचे यात्रेस निघण्यास तयार असावें असें त्यानें सांगितलें.

आज मी डेकवरील स्विमिंग बाथमध्यें आंघोळीस गेलों होतों. माझे-शिवाय दुसरें दोन हिंदी गृहस्थ, दोनतीन युरोपियन पुरुष व एक बाई होती. त्या मंडळीस संकोच वाटत नव्हता; पण मला वाटला. मला वाटतें त्या युरोपियन बाईसहि वाटला. पण कदाचित् जागा लहान व तेवढ्यांतच ५।६ पुरुष मंडळी झाल्यामुळें वाटला असावा.

आज आगबोटीवरच्या खेळांचा वगैरे सर्व कार्यक्रम छापून प्रत्येक उतारूस वांटण्यांत आला. दररोज सकाळीं, दुपारीं व रात्रीं कांहींतरी

कार्यक्रम ठेविला आहे. ही बारीकशी गोष्ट. पण प्रत्येक गोष्ट संघटित व व्यवस्थित करावयाची या बाळकडूचेंच हें उदाहरण आहे. मी बकेट-कॉइलचे सामन्यांतला खेळ खेळलों. माझ्या विरुद्ध असणाऱ्या गड्यानें जिंकलें. त्याचें नांव सेव्हॉय.

रात्रौ म्युझिक हॉलमध्यें "बुक रेप्रेझेंटेशन" होतें. मला प्रथम समजलें नाहीं, पण मागाहून समजावून घेतलें. आपणास जें पुस्तक उत्तम वाटतें त्याचें सूचक असें कांहीं चिन्ह छातीवर, पाठीवर किंवा दंडावर–टोपीवर ठेवावयाचें. ज्यांचें पुस्तक उत्तम व सूचक चिन्ह उत्तम तो पहिला. बहुतेक सर्व युरोपियन बायांनीं व पुरुषांनीं सूचक चिन्हें घातली होतीं व एकमेकांस दाखवीत प्रत्येकाच्या कल्पनातरंगास व विचारास वाव मिळत होता. ही करमणूक बौद्धिक तर खरीच, पण कोणाचें किती वाचन याचीहि परीक्षाच होती. पुष्कळ ग्रंथकार, त्यांचे पुष्कळ ग्रंथ यांची माहिती व वाचन असेल तोच बरोबर ओळखूं शकेल, व त्याशिवाय ज्याला विशेष कल्पनाशक्ति असेल तोच जास्त सुंदर चिन्ह देऊं शकेल. मला अर्थातच हा प्रकार नवीन वाटला, तेव्हां म्युझिक हॉलमध्यें फिरत होतों, पहात होतों व विचारत होतों. पाश्चात्य समाजामधील वाचनाभिरुचि, वाङ्मयवृद्धि व बौद्धिक शिक्षणाची आवड यांचा निदर्शक हा खेळ होता. आमच्याकडे तर याची कल्पनासुद्धां नाहीं. बोटीवरील हिंदी लोकांचें वाङ्मयदृष्टया व समाजदृष्टया याकडे लक्ष्यहि गेलें नाहीं याचा अत्यंत खेद वाटतो. समाजांतील स्त्रिया व पुरुष दोघांचीहि सारखीच बौद्धिक वाढ, दोघांच्याहि शारीरिक शिक्षणाची सारखीच सोय वगैरे गोष्टी महत्त्वाच्या वाटतात. येथें बायासुद्धां वाचनांत, फिरण्यांत व खेळण्यांत वेळ घालवितात. इतकें असून मुलांची आबाळ करीत नाहींत. त्यांची उंची, शरीराचा बळकट बांधा व सशक्तपणा पाहिला म्हणजे जसा आनंद होतो तसेंच त्याबरोबर आमच्या इकडील विचार आला म्हणजे वाईट वाटतें. त्यांच्या बायकांची जी शारीरिक शक्ति (Health) आहे ती आमच्या पुरुषांत नाहीं. मग आमच्या बायकांची तर गोष्ट लांबच. मानसिक विकासाच्या बाबतींत तर न बोलणेंच बरें, इतकी आमची शोचनीय स्थिति दिसते.

बोटीवर ज्या देशी बाया आहेत त्यांपैकीं ज्यांनीं पाश्चात्यांचें अनुकरण केलें आहे त्या तर बहकलेल्याच आहेत. सुवर्णमध्य काढून योग्य शिक्षण देणें हा मोठा कठीण प्रश्न आहे व तो जर साधणें अशक्य असेल तर शिक्षणाचा अभाव ही कमी आपत्ति असेंच म्हणतां येईल. आपला धर्म, आपल्या देशाचें हवामान, आपले रीतिरिवाज, आपला इतिहास, आपली राहाणीकरणी, आपली आर्थिक स्थिति या सगळ्यांचा विचार करून त्याचे पायावर पाश्चात्यांचे गुण आपल्या अंगांत आणणाऱ्या शिक्षणाची उभारणी झाली पाहिजे. हल्लींप्रमाणें त्यांचेसारखे निर्लज्ज कपडे करणें, रंग लावणें, किनरें बोलणें, नटणें मुरडणें, केस कापणें, पत्ते खेळणें, पैजा मारणें वगैरे गोष्टी नको आहेत. पण दुर्दैवानें त्यांचाच भरपूर भरणा दिसतो. बाकी अशा बायांविषयीं युरोपियन लोकांतहि आदराची भावना दिसत नाहीं.

काल व आज रात्रौ मी जेवणाचे वेळीं काळा सूट न घालतां खादीची सुरवार व पांढरें लांब पेहेरण घालून गेलों होतों. रा. गुलाबचंद पांढराच सूट घालून आले होते. मि. महंमदअल्ली जीना पांढरी सुरवार व एक पातळसा पांढरा अंगरखा घालून आले होते. असा हल्ला आम्ही त्या काळ्या ड्रेसचे पद्धतीवर चढविला. उकडतें म्हणजे कोण! त्यावेळीं अगदीं लंगोटी नेसून बसावयास परवानगी दिली तरीसुद्धां उपकार वाटतील. अशा वेळीं म्हणे काळा सूट घाला! बरें, युरोपियन लोक करतात म्हणून आम्ही करतों. ते करतात तें योग्य आहे. सामाजिक शिस्त आहे. त्यांत सामाजिक जीवन आहे व सामुदायिक भावना आहे. पण सोंवळ्यावर टीका करणाऱ्यांना व घरच्या म्हाताऱ्या आजीबाईंना नांवें ठेवणाऱ्यांना काळा ड्रेस करण्याचा काय हक्क आहे? आपलें तेवढें वाईट. आपले समाजांत एकी व जोम नाहीं म्हणून त्यास फेटाळावयाचें व युरोपियन समाजास स्वतःच्याच काल्पनिक विचारांनीं व भीतीनें मान वांकवून काळा ड्रेस घालावयाचा, हा कोणत्या तऱ्हेचा स्वतंत्रपणा अथवा सुसंगतता? असो. आम्हांस कोणीहि स्वतःची नापसंती दर्शविली नाहीं व कोणास कांहीं वाटलें असेल असेंहि दिसलें नाहीं. जेवावयाचे वेळीं

स्वच्छ व चांगले कपडे असावे हें तत्त्व व तें आम्हांस मान्य आहे. सोंवळ्याची या दृष्टीनें मीमांसा करून त्याचें अस्तित्व कायम ठेवलें पाहिजे.

आज घड्याळ २० मिनिटें मागें लावावयाचें होतें. कालपावेतों रोज ३० मिनिटें होतें, आतां पश्चिमेकडे जरी जात आहों तरी सरळ पश्चिमेकडे नसोन उत्तरेकडे असल्यामुळें १० मिनिटांचा फरक पडला आहे.

## ता. ११–५–१९२८

खेळकरमणुकीसाठीं नेमलेल्या कमिटीनें जो कार्यक्रम तयार केला आहे त्यावरून प्रत्येक गोष्ट व्यवस्थित व संघटित स्वरूपानें करण्याचें इंग्रज समाजाच्या किती अंगवळणीं पडलें आहे व खेळकरमणूक ही ते आपल्या जीवनांतील आवश्यक अशी वस्तु किती प्रमाणांत मानतात तें दिसून आलें.

आजहि घड्याळ २० मिनिटें मागें लावलें.

## ता. १२–५–१९२८

येथें खेळांचे वेळीं सेकंड क्लासांतल्या एका इंग्रज बाईशीं बोलणें झालें. सेकंड क्लासची खेळकरमणुकीची कमिटी अगदीं वेगळीच आहे. फर्स्ट क्लासवाले वेगळे. खेळकरमणुकींतहि एकमेकांशीं संबंध नाहीं. हा उच्चनीच वर्गाचा भेदभाव त्या बाईस रुचत नव्हता. ती फर्स्ट क्लासवाल्या लोकांचाच दोष काढीत होती. त्यांस वाटतें कीं सेकंड क्लासवाल्यांशीं मिसळण्यांत आपला कमीपणा आहे. उच्चनीच जातींप्रमाणेंच हा प्रकार झाला. फक्त जन्मावर जात न ठरवितां आर्थिक स्थितीवर ठरवावयाची एवढाच फरक. अर्थात् हा मोठाच फरक आहे यांत शंका नाहीं, पण एकंदर परिणाम तोच.

आज घड्याळ २० मिनिटें मागें लावलें.

ता. १३-५-१९२८

कैरो सफरीस ज्यांस जावयाचें असेल त्यांनीं डेकवरील लाउंजमध्यें ७ वाजतां तयार होऊन हजर व्हावें व त्यांना उपासमोड ( ब्रेक फास्ट ) —न्याहारी—सकाळीं ६ ते ७ वाजेपावेतों मिळेल अशी नोटीस काल रात्रौ लागलेली असल्यामुळें लौकर ५ वाजतांच उठलों. येथें सूर्योदय फारच लौकर म्हणजे ५ चे आधींच होतो.

काल रात्रींपासून उष्मा जाऊन थंडी सुरू झाली, व पुढेंहि वाढत जाणार तेव्हां आमच्या तैनातींतील सर्व नोकर लोकांचे वेष आज बदलले. आतांपावेतों स्ट्युअर्ड, वेटर वगैरे सर्वजण पांढरे स्वच्छ कपडे घालीत असत. त्याऐवजीं आतां सर्व जांभळे, काळे रंगाचे सूट घालूं लागले. सर्व नोकर साफ हजामत ( दाढी ) करून, केस बरोबर विंचरून, पोषाख नीटनेटका करून असतात. घाणेरडेपणा नसतो. त्यामुळें त्यांना पाहूनहि मन प्रसन्न असतें. आपलेकडील पंक्तींत किंवा घरींसुद्धां घाणेरडें व पहातां-क्षणींच उलटी होईल असें पटकुरवजा सोंवळें (!) नेसून येणारा वाढपी किंवा आचारी, व वाढावयास शुद्ध सोंवळ्यांतून आलेल्या भाताच्या झांकण्या किंवा भाजीचीं पातेलीं यांवरील व मधील स्वयंपाक घरांतील चुलीच्या ओट्यावरील राख व कोळसे आणि खालीं धरावयाचें कळकट पोतेरेंवजा लोंब्रें यांत व येथील वाढपी ( वेटर ) व भांडीं यांत किती अंतर! एकास पाहून प्रसन्नचित्तानें जेवण व खाणें जातें तर एकास पाहून संवयीमुळें जरी उलटी होत नाहीं तरी मन प्रसन्न होत नाहीं हें खास. जेवतांना रागावणें, आरडणें, ओरडणें वगैरे प्रकार नसल्यामुळें तर किती प्रसन्नता व आनंद वाटतो. आपली सोंवळ्याची कल्पना फारच उत्तम आहे; पण ती आपण अगदीं अवनत व निकृष्टावस्थेस पोंचविली असून युरोपियन लोकांनीं तिचें तत्त्व ग्रहण केलें आहे असें स्पष्ट दिसून येतें. जेवणाचे वेळीं मन प्रसन्न असेल तर खाल्लेलें अंगीं लागतें व सर्व श्रम जेवणासाठींच जर आहेत तर त्यावेळीं जास्तींत जास्त आराम व आनंद पाहिजे, म्हणून स्वच्छ व उत्तम कपडे घालावयाचे ही मूळ कल्पना असावी. पण आपल्याइकडे त्याचा किती विपर्यास झालेला आहे. सहा

महिने न धुतलेलें कळकट सोंवळें, वाढावयाच्या भांड्यांतील राख, कचरा वगैरे सर्व असतां ओंवळें होत नाहीं. पण एका दोऱ्याचे टोंकावर पाय पडल्याचा भास जरी झाला तरीसुद्धां ओंवळेपणा होतो. जिवंत शरीरांतील आत्मा गेल्यावर मढ्यास जिवंत समजून कवटाळणाऱ्यास जितका शहाणा म्हणतां येईल तितकेंच शहाणपण हल्लींच्या पद्धतीनें चालविलेल्या सोंवळे-पणांत आहे. आपलें सोंवळें शुद्ध प्रकारानें चालविण्याची अत्यंत जरूर आहे.

सर्व आटोपून तयार होऊन डेकवर आलों. अदमासें ४०।४५ मंडळी कैरो सफरीस होती. बहुतेक सर्व हिंदी गृहस्थच होते. कांहीं बायाहि होत्या. आमचे पासपोर्ट पर्सरजवळ दिलेले होते. त्यानें आम्हांस थॉमस् कुक्चीं तिकिटें दिलीं होतीं.

बोट बंदरांत आल्यावर ईजिप्तचे बंदरावरील अधिकारी आले. त्यांच्या लॉंचवरील निशाण ईजिप्तचें, पोस्टाची लॉंच आली तीसुद्धां त्यांचीच; ईजिप्शियन स्वराज्य आहे हे जेथें तेथें दिसणाऱ्या फेझ टोपी-वाल्या अंमलदारांवरून व ईजिप्शियन भाषेंत व्यवहार होता त्यावरून सहज समजण्यासारखें होतें. नाणेंहि तेथे ईजिप्शियन. त्याला पिआस्ट्र म्हणतात. १०० पिआस्ट्र म्हणजे एक पौंड.

लॉंच सुएझ बंदराचे धक्क्यावर पोंचल्यावर ईजिप्शियन ऑफिसर्सनीं नामधारी डॉक्टरी तपासणी केली. त्यानंतर कुकनें तयार ठेवलेल्या मोटारीमध्यें आम्ही बसलों. रेल्वे स्टेशनबाहेर आपलेकडे ज्याप्रमाणें तिसऱ्या वर्गाचे उतारू स्टेशनच्या पडव्यांतून पडलेले असतात त्याप्रमाणें येथेंहि पडलेले होते. हे बहुतेक मक्केचे यात्रेस जाणारे असावे असें दिसलें. गरीबांची सर्व ठिकाणीं सारखीच सोय—अथवा गैरसोय—हेंच खरें.

येथें व लॉंचमध्यें, तसेंच कैरो शहरांतसुद्धां, चित्रांचीं कार्डें विकणारे लोक व इतर विक्री करणारे लोक फारच लबाड दिसले. दिल्लीचा ठग किंवा पुण्याचा भामटा यांस हार जातील असे नव्हते. किंमती अदीच्या दिढी सांगतात.

सुएझ गांवांतून आम्हांस पुढें जावयाचें होतें. येथून सुमारें तीन तास मोटारीचा प्रवास करून कैरो शहरास लागूनच हेलिओपोलिस गांव आहे तेथें आलों. येथें गाड्या, मोटारी वगैरे सर्व रस्त्याच्या डाव्या बाजूनें हांकावयाच्या ऐवजीं उजघ्या बाजूनें हांकाव्या असा नियम आहे. सर्व ईजिप्तभर हाच नियम आहे. त्यामुळें पुष्कळ वेळां आम्हांस समोरून मोटार येत असतां चुकल्यासारखें वाटून आतां टकराटकरी होते कीं काय असें वाटे.

आमची मोटार हेलिओपोलिस गांवांतून कैरो शहरीं गेली. लगेच आम्ही सर्व तेथील म्युझियम पहावयास भेलों. साधारण बारा वाजण्याचे सुमारास म्युझियममध्यें पोहोंचलों. म्युझियम १ वाजतां बंद होतें व लंचला वेळ होता तेवढ्यांत पाहून घ्यावयाचें होते.

मुख्य पाहावयाच्या वस्तू म्हणजे तूतम खानमच्या शवाच्या पेट्या व त्याबरोबर सापडलेल्या जिनसा. ख्रिस्ती शकाच्या दोनतीन हजार वर्षां-पूर्वींच्या संस्कृतीचीं हीं सर्व चिन्हे होतीं. दगडांत किंवा टेकडींत एखादी खोलीवजा पोकळी करून त्यांत एक मोठी पेटी बंद करून ठेवीत व त्या पेटींत मृताचे शव दुसऱ्या एका पेटींत घालून ठेवीत. आणि दुसऱ्या वस्तू निरनिराळ्या पेटींत ठेवीत असत. शव जतन व्हावें म्हणून एक प्रकारचा मसाला करीत व तें कपड्यांत गुंडाळून एका पेटींत ठेवीत. ती पेटी दुसऱ्यांत, ती तिसऱ्यांत. याप्रमाणें निरनिराळ्या पेट्यांत पेट्या असत. तूतम खानमच्या शवाची वरची पेटी व आंतील पेट्याहि सोन्यानें व एनॅमेलनें मढविलेल्या होत्या. जशा कांहीं कालच्च करविल्या आहेत इतक्या सुंदर रीतीनें त्या व त्यांतील इतर जिनसा कायम आहेत. शव याप्रमाणें पेटींत घालण्यापूर्वी शवांतून काळीज, आंतडीं व मेदू काढून त्यांच्या निराळ्या लहान पेट्या करीत असत. त्याहि उत्तम स्थितींत होत्या. जिवंत असतां लागणाऱ्या सर्व वस्तू—आंगठ्या, दागिने, रथ, खुर्ची, कोच वगैरे सर्व पदार्थ—ठेवीत असत. दारूचीं ॲलॅबॅस्टर नांवाचे दगडाचीं भांडीं फारच सुंदर होतीं. हस्तिदंताचें काम उत्तम होतें. एकहि वस्तु त्या लोकांस माहीत नव्हती, असें यावरून वाटत नाहीं.

पेपियस झाडाचे पानावर लिहिलेले लेखहि म्युझियममध्यें पाहिले. ते चित्रलिपींत होते.

एवढया पूर्ण व उत्तम संस्कृतीचा लोप कसा झाला, पूर्वी आणखी काय काय गोष्टी होत्या वगैरे हकिकत फारच रम्य व मनोहर असली पाहिजे. ‘ सर्वे यस्य वशात् अगात् स्मृतिपथं कालाय तस्मै नमः । ’

लंच आटोपल्यावर अडीच वाजतां मोटारींतून गीझचे स्फिंक्स व पिरामिड पहाण्यास निघालों. शहरांतूनच नाईल नदीचे एका मुखाचे बाजूनें जावयाचें होतें. नाईल नदीस जास्त मुखें आहेत, त्यांपैकीं एक प्रवाह कैरो शहरांतून वाहात जात असून दोन्ही बाजूंस शहर आहे. सुमारें ३–३॥ मैलांवर पिरामिड टेकडीचा पायथा लागतो. येथें मोटारींतून उतरून उंटावर किंवा खेचरावर बसून जावयाचें असतें. आम्ही सर्व उंटांवर बसलों. सर्वांची उंटावर त्रेधाच झाली. उंट उठतांना व बसतांना तर कांहीं विचारूंच नये. चालतांना पोटांतील सर्व जेवण जणूं काय घुसळलें जात होतें इतकें हलत होतें. बसल्याबरोबर, आपल्याला बक्षिस मिळालें पाहिजे अशा गोष्टी उंटवाला बोलूं लागला. आम्ही ऐकत होतों. सर्वांत जास्त त्रेधा श्री. श्रीनिवास आयंगार यांची झाली. त्यांचे उंटवाल्यानें बक्षिसाच्या आशेनें सुरुवातीसच त्यांना विचारलें: " Are you alright Sir ? " ( काय महाराज, ठीक आहे ना ? ) त्यांनीं विनोदात्मक ( right या शब्दावर कोटी करून ) उत्तर दिलें. " My good fellow, I am all wrong. " आम्ही सर्व आमच्या स्वतःचे व एकमेकांचे वेषास हंसत उंटावरून चाललों होतों. उंटावरच्या शहाण्यांची जणूं फौजच चालली होती.

पिरामिड म्हणजे जुन्या राजांचीं थडगीं. त्यापुढें पूर्वेकडे तोंड केलेली स्फिंक्स. ती सूर्याकडे पहात प्रार्थना करीत असते अशी कल्पना. ही जागा खोदून त्यांतून पुराणवस्तु संशोधनाचें काम चालूं होतें. पिरामिड दोन मोठे व एक लहान होता. उंची ४२० फूट आहे असें म्हणतात. ज्यावेळीं रेल्वे, आगबोटी नव्हत्या त्यावेळीं एवढे मोठे दगड कोठून कसे आणले असतील, कसे चढविले असतील, स्फिंक्ससारखी मोठी मूर्ति

कशी केली असेल याच्या कल्पनाच करावयाच्या. संस्कृतीच्या पूर्णत्वाचेंच हें द्योतक.

पिरामिड पाहून परत मोटारींतून तेथील किल्ल्यांत महमंदअलीची मशीद आहे ती पाहाण्यास गेलों. आमचे बुटांवर जोडे बांधून आम्ही आंत गेलों होतों. मशीद पाहून बाजारांत आलों. तेथें पुष्कळ चांगल्या वस्तू दिसल्या; पण उपयोगी वस्तु एकहि नसल्यामुळें व किंमतीविषयीं खात्री वाटत नसल्यामुळें खरेदीच्या भानगडींत पडलों नाहीं.

बाजारांतून हॉटेलांत येऊन, चहा घेऊन स्टेशनवर आलों. गाडी कैरोहून सायंकाळीं ६ वाजतां सुटली. ईजिप्तमध्यें स्वराज्याखालीं लोकांची राहाणीकरणी झपाट्यानें बदलत असून पाश्चात्य वळणावर जात आहे असें वाटलें. इंग्रजांचा संरक्षित टापू म्हणून त्यावर डोळा अथवा देखरेख असली तरी फ्रेंचांचें जास्त वळण लोकांनीं घेतलेलें दिसतें.

आगगाडींतील जेवण बरें झालें. तेथें (युरोपांत) ज्या ज्या वस्तू पाहिजे असतील त्या त्या मागून घेण्यांत शरम टेवल्यास उपाशींच राहाण्याची पाळी यावयाची. मागणें म्हणजे शिष्टाचारास सोडून आहे असेंहि कोणी समजत नाहीं. जेवतांना आग्रह करण्याची पद्धति नाहीं.

ईजिप्तमधील लोक गोरे व सुंदर आहेत. बांधा मजबूत व उंच. काळ्या रंगाचे लोक आहेत. ते व गोरे इजिप्शियन आपापसांत विवाह करीत नाहींत. बायका आपल्याकडील मारवाडी स्त्रियांप्रमाणें तोंडावरून कपाळापर्यंत पदर व पुढें नाका खालून घेतात. डोळे व गाल यांशिवाय कांहींहि उघडें नसतें. पण नाकाखालील कपडा इतका पातळ असतो कीं तोंडवळ्याची सहज कल्पना होते. नाकावर एक पिवळ्या रंगाची बांबूची पोकळ नळी सुमारें पाव इंच व्यासाची व नाकाइतक्या लांबीची बांधतात. बुरख्यांतून श्वासोच्छ्वासास अडचण पडूं नये म्हणून बांधण्याचा प्रघात पडला असावा अशी माझी कल्पना आहे. कैरोहून आगगाडींतून निघाल्यावर रात्रौ नऊ वाजण्याचे सुमारास इस्मालिया स्टेशन आलें. तेथें सुएझ कालवा दिसूं लागला. कालवा जास्त जास्त खोल करण्याचें चालूच होतें.

रात्रौ १०–१५ ला पोर्ट सैदला गाडी पोचली. तेथें कुकच्या मोटारी तयार होत्याच. पोर्ट सैद पहात रात्रौ साडेदहा वाजतां धक्कयावर आलों व तेथून बोटीवर चढलों. बोट पोर्ट सैदहून रात्रौ १ वाजतां सुटली.

ता. १४–५–१९२८

रात्रौ नाच होताच. यांत मला कांहीं कळत नव्हतें, तेव्हां एका इंग्रज गृहस्थास विचारलें. लग्न झालेल्या बाया व कुमारिका दोघीहि नाचतात. लग्न झालेल्या बाईने जोडीदार म्हणून वाटेल त्या गृहस्थाबरोबर नाचण्याची मुभा आहे. एखाद्यानें 'नाचावयास येतेस का ?' असें विचारलें तर 'नाहीं' म्हणणें म्हणजे विचारणाऱ्याचा अपमान आहे.

हवा थंड आहे. खादीवरच चालविलें.

ता. १५–५–१९२८

आज रात्रौ भोजनोत्तर सेकंड क्लासांत फॅन्सी ड्रेस बॉल होता. निरनिराळ्या तऱ्हेचे पेहेराव करून मंडळी आली होती. कोणी मुसलमानी बादशाह, तर कोणी साधाच मुसलमान, कोणी पारशी स्त्री तर कोणी मुसलमानी, तर कोणी अमेरिकन टूरिस्ट वगैरे पुष्कळ सोंगें होतीं. यांत कल्पकता तर होतीच, पण फारच बारकाईच्या निरीक्षणाचीहि परीक्षा होती. एक तर मुंबईचा पोलीस अगदीं हुबेहूब झाला होता.

शुक्रवारीं मार्सेल्स् येणार तेव्हां थोडी थोडी आजपासूनच आवराआवर सुरू केली. पत्रें लिहिणें वगैरे उद्यांवर ढकललें आहे. आगबोटींत १३ दिवस कसे जातील अशी प्रथम धास्ती होती, पण हे दिवस इतके लौकर गेले कीं आणखी जरी ८–१० दिवस असते तरी अडचण नव्हती. कारण इतकेंच कीं समुद्र शांत, त्यामुळें आगबोट म्हणजे घरच, व जेवणें, कपडे करणें, गप्पा मारणें, खेळणें व निजणें यांशिवाय धंदाच नाहीं. हां हां म्हणतां दिवस आजपावेतों गेलें.

आज घड्याळ १५ मिनिटें मागें केलें.

ता. १६-५-१९२८

सकाळीं फर्स्ट क्लासचा जिमखाना होता, म्हणजे निरनिराळे खेळ होते. खेळ निरनिराळे व कांहीं तर फारच गमतीदार असून कला व अक्कल यांस मदत करणारे होते. सर्व खेळांत स्त्रीपुरुष सारखेच भाग घेत असून कांहीं सामने मिश्र होते. जेथें तेथें या समाजाची हीच खुबी दिसते, कीं असें सामाजिक जीवनाचें एकहि अंग नाहीं कीं ज्यांत पुरुषांइतकाच स्त्रियाहि भाग घेत नाहींत. संसाराच्या गाड्याचीं दोन्हीं चाकें जवळ जवळ समान असतात. दोषैक दृष्टीनेच पहावयाचें तर हजारो खोड्या सांगतां येतील. पण सौख्यमय संसार म्हणजे जर पतिपत्नींच्या व कुटुंबांतील सर्व मंडळींच्या दृष्टिबिंदूंची, आकांक्षांची वगैरे एकवाक्यता किंवा कमींत कमी विसगतता असेल तर ती युरोपीयन समाजांत चांगली पहाण्यास मिळते असें दिसलें. जास्त अनुभवानें हा अभिप्राय बरोबर आहे कीं नाहीं हें दिसेलच. धर्म, राजनीति, खेळकरमणूक, राहाणीकरणी वगैरे सर्वांमध्यें स्त्रीपुरुषाची सारखीच गति ( level ) दिसते व यामुळेंच आपल्याकडे सर्व वस्तू अनुकूल असताहि जी मानसिक असंतोषामुळें जळफळाटाची प्रवृत्ति राहून संसार दुःखमय होतो किंवा कमी सौख्यमय होतो तशी या समाजाची स्थिति दिसत नाहीं.

आज सकाळीं ९ वाजल्यापासून इटालीचा किनारा उजवे बाजूस दिसूं लागला. इटालीची आकृति पायासारखी आहे व टोंक मध्येंच लांब समुद्रांत घुसतें. त्याचाच हा शेवटचा भाग होता. डावे बाजूस फारच दूर अंतरावर 'एटना' ज्वालामुखी दिसत होता. ज्वाला वगैरे नव्हत्या, फक्त पर्वत दिसत होता.

तेथून पुढें आगबोट मेसिनाच्या सामुद्रधुनींत ११ वाजण्याचे सुमारास आली. दोन्ही बाजूंकडे जमीन, उंच डोंगर, शहरें व गांवें. उजवे बाजूस इटाली व डावे बाजूस सिसिली. इटालीचें मोटें शहर रेगो व सिसिलीचें मेसीना. हा सर्व प्रदेश इटालियन सरकारचा—मुसोलिनीचे स्वराज्याचा—आहे. किनाऱ्यावरचीं तीं सुंदर गांवें पाहून कोंकण किनाऱ्याची आठवण

झाली. मेसीना सामुद्रधुनीचा किनारा म्हणजे २–३ मैल, पण तेवढ्यांत किती सुंदर शहरें आहेत! कोंकणपट्टी शेंकडो मैल असून, हवापाणी उत्तम असून एकहि अशा धर्तीचें गांव नाहीं. स्वराज्य व त्याचा अभाव या दोहोंतील अंतराची तीव्र जाणीव झाली.

याच सामुद्रधुनींत 'स्किला' नावाचा खडक व 'चेरिब्डिस' किंवा 'केरिब्डिस्' नांवाचा भोंवरा आहे. भोंवरा दिसत नाहीं पण जोराचे प्रवाह दिसून येतात. वाफेचीं गलबतें होण्यापूर्वी या समुद्रधुनीस दर्यावर्दी लोक भीत असत. खडक टाळावयास जावें तर प्रवाहांत सांपडूं व प्रवाह टाळावा तर खडकावर आपटूं अशी कात्री होती. यावरूनच एकादा अडचणीचा प्रसंग येऊन 'खाल्लें तर बाधतें व टाकले तर शापते' अशी स्थिति होते, त्यास इंग्रजींत 'स्किला आणि केरिब्डिस्'मध्ये सांपड-ल्याची उपमा देतात. हल्लीं आतां मोटीं व वाफेच्या शक्तीने चालणारीं गलबतें झाल्यानें ही सामुद्रधुनी मुळींच जोखमीची नाहीं.

तेथून पुढे पुनः समुद्रच समुद्र जिकडे तिकडे झाला. दुपारचे लंच-नंतर खेळ होते. सुमारे अडीचचे सुमारास स्त्रोंबोली नावाचा पर्वत लागला. हा ज्वालामुखी आहे. एका बाजूने अजून जिवंत असून बाकीचे भागावर वस्ती आहे. आकाश निरभ्र नसल्याने धूर वगैरे दिसला नाहीं. पण स्वच्छ आकाश असलें तर दिवसां धूर व रात्रौ ताबूस उजेड किंवा क्वचित् ज्वाळाहि दिसतात असें म्हणतात.

आज रात्रींचा नाच खास होता. सोंगें घेतलीं होतीं तशाच वेशांत सर्वजण नाचत होते. कांहीं हिंदी बायाहि नाचांत सामील झाल्या होत्या. कांहीं का कारण असेना, मला तो प्रकार आवडला नाहीं.

आज घड्याळ १५ मिनिटें मागें लावलें.

## ता. १७–५–१९२८

आज बोटींतील प्रवासाचा शेवटचा दिवस. उद्यां सकाळीं मार्सेल्स येणार व हा जलप्रवास संपणार. ता. ५ पासून आजच्यासुद्धां म्हणजे

एकंदर १३ दिवस जलप्रवासांत ( कैरोच्या १४ तासांशिवाय ) गेले, पण येथील एकंदर कार्यक्रमानें हा वेळ चुटकीसारखा गेला. आगबोटीवर फुरसतीच्या कामांपैकीं हें करूं, तें करूं असे केलेले बेत ढांसळले. रिकाम-पणामुळें फुरसतच नाहीं अशी एका अर्थी स्थिति होती. सर्व वेळ केवळ Frivolities मध्येंच व निर्दोष आनंदांत, चेष्टेंत व रोजच्या कवायतींत गेला.

आजच्या प्रवासांत कॉर्सिका आणि सार्डियाना हीं बेटें लागलीं. नेपोलियन बोनापार्टचा जन्म कॉर्सिकांत झाला होता, तेव्हां त्या बेटाकडे पहाण्यांत एका मोठ्या पुरुषाच्या जन्मभूमीच्या दर्शनाचें पुण्य लागलें.

रात्रौ खेळांचे सामने, फॅन्सी ड्रेस वगैरेमध्यें यशस्वी झालेल्यांस बक्षिसें देण्याचा समारंभ झाला. लॉर्ड लिन्‌लिथगो अध्यक्ष होते. या बाबतींत लॉर्ड सिंह व लेफ्ट. जॅक यांचा तीव्र मतभेद झाल्यामुळें अध्यक्षस्थान आपण घेतल्याचें लॉर्ड मजकुरांनीं सांगितलें.

ता. १८–५–२८

सकाळीं लौकर उठून स्नान वगैरे आटोपून डेकवर आलों. बंदराचा देखावा फारच मनोहर वाटत होता. बोट हळूं हळूं बंदरांत शिरत होती. ७ वाजल्यापासून ब्रेक फास्ट होता. आज बोट सोडून द्यावयाची, तेव्हां पाश्चात्य पद्धतीप्रमाणें ज्यांनीं ज्यांनीं आमची सेवाचाकरी केली त्यांना त्यांना चिरिमिरी ( Tip ) देणें होतें. काय द्यावें हा प्रश्नच होता. जास्ती खर्च करणें तर शक्य नव्हतें, कमी तर पडतां कामा नये. तेव्हां मीं कापडियांचे बुकांत पाहिलें. मेजर भाऊसाहेब गायकवाड यांसहि विचारलें व आपसांत सल्ला घेऊन ठरविलें.

उतरावयाचे वेळीं कोण गडबड ! पण सर्व काम व्यवस्थित. मला घेण्यासाठीं शेठ रणछोडलाल अमृतलाल यांचे पत्रावरून मि. येट्स् ( मँचेस्टर ) हे येणार होते. त्यांना कसें ओळखावें ? डेकवर फिरून धक्कयावर येणाऱ्यांस पाहून ‘ कोणी येट्स् म्हणून आहेत का ? ’ असें मोठ्यानें विचारावें या विचारांत होतों, पण तसें केलें नाहीं. पुनः खालीं

आलों त्या वेळीं एका गृहस्थानें सांगितलें कीं एक गृहस्थ तुम्हांस शोधीत आहेत व अमुक ठिकाणीं उभे आहेत. ते मि. येट्सूच होते. ते भेटल्यानें मनाला निश्चिंतता वाटली.

बोट धक्यास लागून पॅसेंजर उतरावयास साधारणतः दीड तास लागतो. सामान बोटीवरून काढून धक्क्यावर कस्टमचे अधिकाऱ्याचे तपासणी-साठीं एका शेडमध्यें ठेवतात. ही तपासणी तांत्रिकच होते. हातावर थोडे पैसे पडले कीं सर्व पसार, नाहींतर ही पेटी उघडव, ती उघडव असें चालतें. आमचें काम थॉमस कुक मार्फत असल्यामुळें आम्हांस कांहीं त्रास झाला नाहीं.

तेथून आम्ही हॉटेलांत गेलों. मार्सेल्स हें आमचे पहाण्यांत आलेलें पहिलेंच युरोपीयन शहर. साधारणपणें सांगावयाचें तर मुंबईत कोटांतील भाग आहेत त्याप्रमाणें दिसतें. स्वच्छता पुष्कळच दिसली. रस्त्यांत किंवा दुकानांत किंवा बाहेर केरकचरा, कागदाचे तुकडे वगैरे कांहीं नाहीं. बसण्यास व सामानास घोड्याच्या गाड्याहि फिरत होत्या. घोडे मोठाले, उंच व धिप्पाड, पायांस केंस फार. येथें तीन घोड्यांच्या गाड्याहि पाहिल्या. रस्त्यांत लोकांचे चालण्यांत वगैरे, तसेंच गाडी हांकणाऱ्या वगैरे मंडळींत शिस्त चांगली. येथें रस्त्याचे वळणावर किंवा इतरत्र पोलीस दिसला नाहीं. तरी पण व्यवस्थित काम चालू होतें. रस्त्याचे उजव्या बाजूनें गाड्या हांकण्याचा येथें नियम असल्यामुळें प्रथम आपणांस चुकल्यासारखें होतें व रस्ते ओलांडतांना भांबावल्यासारखें होतें.

हॉटेलांत येऊन, सामान ठेवून, चहा वगैरे घेऊन आम्ही मोटार करून गांव पहाण्यास गेलों. निरनिराळ्या भागांतून मोटार हाकल्यामुळें गांवाची पुष्कळच कल्पना आली. स्वच्छता व शिस्त यांची आमचेवर छापच पडली.

दुपारीं हॉटेलांत लंच घेतल्यावर पुनः पहावयास गेलों. शाकाहारी लंच( भोजना )बाबत खास सूचना द्यावी लागली. आपल्यास पाहिजे तसें होतच नाहीं, पण उपाशी राहाण्याची मुळींच जरूर नाहीं किंवा मांसाहार केलाच पाहिजे असेंहि नाहीं. पुढें काय अनुभव येतो तो पहावा.

खास पहाण्यासारखीं ठिकाणें दोन-एक 'नोत्र दाम' म्हणजे 'नांवाजलेली बाई' अर्थात् येशू ख्रिस्ताच्या आईचें मंदिर व दुसरें 'शानो दीफ्' म्हणजे मॉन्टे कार्लोचा काउंट राहात होता तो समुद्रांतील किल्ला.

नोत्र दाम एका उंच टेकडीवर आहे. जुन्या पद्धतीवर बांधलेलें असून तेथें रोज शेंकडो भाविक ख्रिश्चन येत असतात. मुलांना सेंट मेरीचे पायांवर घालण्यासाठीं आणतात. येणारा तेथें मेणबत्त्या जाळण्यासाठीं देत असतो. ज्याप्रमाणें आपल्या देवळांत कापूर किंवा दिवा लावण्यासाठीं तेल भाविक लोक दर्शनास जातेवेळीं देतात त्याचप्रमाणें एका खोलीवजा जागीं ४०–५० मेणबत्त्या सतत जळत असतात.

नोत्र दाम पाहून आम्ही खालीं उतरून शानो दीफ् पहाण्यासाठीं एका मोटर लॉचमधून निघालों. पण समुद्राच्या लाटा लॉचचे मानानें प्रचंड व वाराहि जोराचा होता. त्यामुळें लॉच फारच हेलकावे खाऊं लागली. बरोबर मुलें व बायका असल्यामुळें पुढें जाणें अगदींच निर्धास्त व सुरक्षित वाटले नाहीं, म्हणून आम्ही तसेच अर्ध्या रस्त्यावरून परत आलों.

मला पारिसला थांबून पुढे जावयाचें असल्यामुळें मी व मि. येट्स् मार्सेल्स स्टेशनवरून सायंकाळीं ७–१० चे गाडीनें पारिसला जाण्यास निघालों. जोंपर्यंत दिसत होतें तोंपावेतों म्हणजे सुमारें ९ वाजेपावेतों सभोंवतालच्या प्रदेशावरच दृष्टि होती.

आम्ही निजावयाच्या गाडींत जागा घेतल्या नव्हत्या. म्हणून दोन उशा भाड्यानें घेतल्या होत्या. त्या कोपऱ्यांत ठेवून उत्तमपणें रात्रीं झोप आली.

ता. १९–५–२८

सकाळीं पारिस शहरीं 'ल गारे लीऑं' स्टेशनवर आलों. बरोबर मि. येट्स् असल्यामुळें मला कांहींच पंचाईत नव्हती.

पारिस हें फारच नामांकित व सुंदर युरोपियन शहर. पुनः परत जातांना सर चिनूभाईबरोबर एक आठवडा राहून सर्व पहाणें असल्यामुळें या खेपेस नुसतें वरवरच पाहिलें. मुख्य काम म्हणजे पुढें हॉलंडला जाण्यासाठीं तजवीज करणें होतें. प्रथम हॉटेलांत दोन सिंगल खोल्या मिळविण्यासाठीं ग्रांड हॉटेलांत गेलों. येथें हजारावर खोल्या असूनहि पुष्कळ वेळां रिकामी खोली नसते. येथील सर्व हॉटेलांतून राहाणीकरणी आमच्या येथल्या मानानें फारच श्रीमंतीची व ऐषआरामाची. फर्नीचर उत्तम, खोलींत–जिन्यावर वगैरे गालीचे. युरोपची राहाणीकरणी आपल्यापेक्षां पुष्कळच ऐषआरामाची व श्रीमंतीची. जितक्या प्रमाणांत राहाणीचें मान जास्त उच्च तितक्या प्रमाणांत हॉटेलांच्या व्यवस्थेंतहि फरक. जशी सोय जास्त तसे दरहि कडक.

माझा हॉलंडास जाण्याचा बेत मागाहून झाल्यामुळें माझ्या पासपोर्टांत हॉलंडचा उल्लेख नव्हता. तेव्हां पासपोर्टावर ब्रिटिश कॉन्सलच्या सहीची जरूर असल्यामुळें स्टेशनवरून बॅग आणून ब्रिटिश कॉन्सल ऑफिसमध्यें गेलों.

नंतर येथील एक मोठें दुकान ‘ऑ लफाये गॅलरिझ्’ म्हणून आहे तेथें गेलों. हें दुकान एका फार मोठ्या भांडवलवाल्या कंपनीने चालविलें आहे. त्या कंपनीनें अशीं दुकानें लंडन व इतर शहरींसुद्धां काढलेलीं आहेत असें समजलें. सबंध दुकान एका मोठ्या भव्य इमारतींत आहे. इमारतीचें काम मजबूत व सुंदर आहे. निरनिराळे स्टॉल्स आहेत. एकहि जिन्नस असा नाहीं कीं जो येथें मिळत नाहीं. निरनिराळे विभाग करून मग त्यांत निरनिराळे स्टॉल्स. किंमती ठरलेल्याच. माल विकण्यासाठीं सर्व मुली, अथवा तरुणी. कितीहि विचारा, कितीहि माल काढवून एकहि घेऊं नका, विकणाऱ्या रागवावयाच्या नाहींत. पण उलट आपल्यालाच तसदी दिल्याबद्दल क्षमा मागतील.

नंतर हॉटेलांत जाऊन नुसता चहाच घेतला. रात्रीं जेवलों नाहीं. मी, मि. येट्स् व तिसरे एक अमेरिकन गृहस्थ असे तिघे तेथून एक नाटक पहाण्यासाठीं ‘मोलीन रूज’ थिएटरांत गेलों. तिकिटें मि. येट्सनेंच घेतलीं.

येथें प्रत्येक बाबतींत चिरीमिरी आहेच. मागण्याच्याहि तऱ्हा अनेक. थिएटरजवळ आमची टॅक्सी उभी राहातांच एक लालभडक शिपाया-सारखा पोषाखवाला थिएटरचा नोकर दार उघडण्यास आला व दार उघडून सलाम केला. त्यास एक फ्रांक ( चवली ) देणें प्राप्त. थिएटर-मध्यें लघवीस जावें लागलें. तेथें रुमाल, साबू वगैरे देण्यासाठीं शेजारीं एका खोलींत एक बाई. तिनें नुसतें कोणत्या बाजूस मोऱ्या आहेत तें बोट करून दाखविलें. रुमाल वगैरे मी कांहींच घेतलें नव्हतें. तेव्हां मी परत जातांना काहीं दिले नाहीं. ती बाई मागोमाग आली. येट्सूला विचारतां कळलें कीं कांहींतरी देण्याचा परिपाठ आहे. एक फ्रांक दिला. अशा रीतीनें येथें नवीन मनुष्य बेजार होतो. अशा प्रकारास चिल्लर नाण्यांची जरूर लागते व नाणीं नवीं व प्रत्येक ठिकाणीं निराळीं असल्या-मुळें हिशोबाची तोंडमिळवणी होणें दुरापास्त होतें.

थिएटरांतील नाटक फ्रेंच होतें, त्यामुळें काय होतें तें कळलें नाहीं. नाटक म्हणण्यापेक्षां करमणूक होती असें म्हटलें तर जास्त शोभेल. यांतील मुख्य भाग ऐकण्यापेक्षा पहाण्याचा होता. आम्ही प्रॉमानादचीं तिकिटें घेतलीं होतीं. 'प्रॉमानाद' म्हणजे आपलेकडे 'पिट' म्हणतात तशा धर्तीवर जागा असते, पण प्रॉमानादमध्यें बसावयाची सोय केलेली नसते. उभेंच राहावयाचें. बसण्याची सोय प्रॉमानादचे कठड्याचे आंतल्या अंगास, पण त्यास तिकिट १०० फ्रांकचें. एवढे पैसे खर्चण्याची इच्छा नव्हती. पहाण्यास लांब वाटलें तर दुर्बिणीहि तेथेंच भाड्यानें मिळतात. नाटकांतील देखावे, रंगांचा मिलाफ, कल्पनाचातुर्य मला सर्वच उच्च प्रतीचें कलापूर्ण वाटलें. नाचांत कांहीं समजलें नाहीं; पण तोहि उच्च प्रतीचा असावा असें वाटलें. हें सर्व कांहीं ठीक. पण नाचणाऱ्या स्त्रिया जवळ जवळ नग्न अशा प्रकारें असत. शरीराचे निरनिराळे अवयव मुरडून मुरडून निरनिराळ्या रीतीनें प्रामुख्यानें दाखवीत नाच करीत तें मला बरोबर वाटलें नाहीं. केवळ कलेच्या दृष्टीनें तें त्याज्य म्हणतां येणार नाहीं—नव्हे चांगलेंच म्हटलें पाहिजे, परंतु साधारण जन-समूहापुढें एखाद्या जाहीर नाटकगृहांत असले प्रयोग पहाणारे कलाभिज्ञ

किंवा कलेचे भोक्ते या नात्यानें येणारे नसल्यामुळें त्या दृष्टीनें सामुदायिक नीतिमत्ता सुरक्षित ठेवण्यासाठीं असले प्रकार सरकारनें बंद केले पाहिजेत असें वाटतें. एखादा शिल्पकार किंवा चित्रकार नग्न पुतळे किंवा चित्रें कलेच्या मार्मिकतेनें काढतो व कलाभिज्ञांची ते पहातांना विषयी दृष्टि नसते. पण सामान्य जन तर विषयी दृष्टीनेंच पहाणार. या रीतीनें पहातां असे खेळ जाहीर नाटकगृहांत होतां कामा नयेत.

रात्रीं हॉलंडकडे जाण्यासाठीं निघावयाचें असल्यामुळें थिएटर सोडून हॉटेलांत गेलों व सामान घेऊन स्टेशनवर आलों. रात्रीं १२ ला गाडी सुटली.

### ता. २०–५–२८

रात्रौ मी निघालों ती इंटर–नॅशनल गाडी होती. ही गाडी निर-निरनिराळ्या देशांतून जातांना बदलावी लागत नाहीं; प्रत्येक देशांत त्यांच्या स्वतःच्या निरनिराळ्या रेल्वे आहेत. एकाचा दुसऱ्यावर ताबा नाहीं. आपलेकडेहि तसेंच आहे. पण मोठ्या लाइनीवर तसा प्रकार नसल्यामुळें विशेष नजरेस येत नाहीं. हॉलंडमध्यें जाण्यास मला फ्रान्स व बेल्ज्यम ओलांडून जावयाचें होतें.

युरोपांत अशा गाड्या प्रत्येक देशाच्या सरहद्दीवर आल्या कीं त्यांचा चार्ज ज्या दुसऱ्या देशांत गाडी जाते त्या देशच्या अधिकाऱ्यांस दिला जातो. त्याचप्रमाणें आमची गाडी सकाळीं ५॥ चे सुमारास फ्रान्स–बेल्जियमचे सरहद्दीवर येतांच गार्ड, कंडक्टर, एंजिन ड्रायव्हर वगैरे सगळे फ्रेंच होते ते बदलून सर्व बेल्जियन् आले. याप्रमाणें गाडी बेल्जियन् लोकांचे ताब्यांत आली. तेथें पासपोर्ट तपासणीहि एका बेल्जियन् अंमलदारानें येऊन केली. ज्याचा पासपोर्ट बिनचूक नाहीं त्यास सरहद्दीवरूनच परत घालविण्यांत येतें. पासपोर्ट अंमलदारामागून जकात खात्याचा अंमलदार. पण कोणीहि मुद्दाम किंवा साधारणहि त्रास देत नाहीं. जकातीलायक माझ्याजवळ कांहीं नाहीं एवढें सांगितल्यानें बस्स होतें.

फर्स्ट क्लासमध्यें माझ्या कंपार्टमेंटमध्यें मी एकटाच होतों. त्यामुळें रात्रौ निजावयास बर्थसारखीच जागा झाली. गाडींत भेटतील त्या गृहस्थांशीं बोलून माहिती विचारण्याचा विचार केला होता. त्याप्रमाणें सकाळीं एक डच गृहस्थ भेटले. त्यांस इनिस्किडीचा मार्ग व वेळ विचारला. त्या गृहस्थानें स्वतः टाइमटेबल काढून मला सर्व हकिकत सांगितली. येथें पाहिलें तों प्रत्येकजणाचे खिशांत टाइमटेबल व रेल्वेचा नकाशा असतोच. वाटेंत बेल्जियमचीं मॉन्स, ब्रुसेल्स, अँटवर्प हीं शहरें लागलीं.

साधारण १०॥ चे सुमारास बेल्जियमची हद्द संपली व पूर्वीप्रमाणें सर्व बदल्या व तपासणी होऊन गाडी हॉलंडमध्यें शिरली.

बेल्जियम व हॉलंड हे प्रदेश सारखेच नयनमनोहर वाटले. रस्त्यांत पुष्कळ खेडीं लागलीं. शेतकऱ्यांचीं घरें लहान, टुमदार व नीटनेटकीं ठेवलेलीं आढळलीं. गाई फारच सुंदर दिसल्या. येथें शेतींत कोंबडीं, खबुतरें वगैरे खाण्याचे पक्षी राखण्याच्या व त्यांचीं अंडीं विकण्याच्या धंद्याचा समावेश होतो. त्यामुळें शेतकऱ्याचे घराजवळ पक्ष्यांच्या जोपासनेसाठीं केलेलीं लहान लहान खुराडींहि दिसलीं. शहरांचे आसपास मजुरांच्या चाळी होत्या. आपल्या इकडील मध्यम वर्गाच्या लोकांस मुंबईसारख्या ठिकाणीं जी सोय मिळते त्यापेक्षां जास्त सोयीस्कर अशीं हीं घरें दिसलीं. प्रत्येक घराचे तळमजल्याचे बिऱ्हाडकरूस मागें परसाची जागा होती. त्यांत बहुतेक प्रत्येकानें स्वतःचा बाग केलेला होता. झाडांची व फुलझाडांची आवड सर्वसामान्य असल्याचें दिसलें.

बेल्जियमपेक्षां हॉलंडमध्यें महत्त्वाचीं अशीं जास्त शहरें वाटेंत लागलीं. सृष्टिसौंदर्यहि बेल्जियमपेक्षां जास्त वाटलें. येथील प्रत्येक देशांत रेल्वेचें जसें कांहीं जाळेंच पसरलेलें आहे. जगाची शांतता परिषद भरते त्या हेग शहराचें दुरुनच दर्शन झालें.

हॉलंडमध्यें गाई फारच उत्तम. जिकडे तिकडे पाण्याचे कालवे व पाट. शेतांतील जास्त पाणी जावयास व शेताला पाणी द्यावयास यांचा उपयोग आहे. हॉलंड देश समुद्रसपाटीपासून खोल आहे. समुद्राचे

बाजूस मोठा जमिनीचा बांध असून समुद्राच्या पाण्यांत देश बुडूं नये अशी व्यवस्था आहे.

येथें साधारणपणें लोक परकीयांस मदत करणारे दिसले. कोणीहि कांहीं विचारले तरी उडाणटप्पू उत्तर न देतां काळजीपूर्वक, बिनचूक माहिती सांगणारे, स्वतःस माहिती नसली तर दुसऱ्यास विचारून सांगणारे व नच सांगतां आलें तर सभ्यतेनें दिलगिरी दर्शविणारे दिसले. सभ्यपणा हा सर्व सार्वत्रिक दिसतो. या बाबतींत पाश्चात्य राष्ट्रांपासून आपण पुष्कळच शिकण्यासारखें आहे.

दुसरी एक बरवर दिसणारी गोष्ट म्हणजे प्रत्येकास असलेला आपल्या राष्ट्राचा व देशाचा अभिमान. माझा देश सर्वांत उत्तम, माझी भाषा उत्तम. माझे लोक उत्तम आणि युरोपांत जर कोणताहि देश विशेष पाहाण्यासारखा असेल तर तो माझा देश अशी भावना बोलण्यावरून समजूं शकते. उघडपणें असें बोलत नाहींत पण स्वतःचे व इतर देशां-विषयीं बोलण्यांत उत्साहाचा जो फरक व वेगळेपणा दिसतो त्यावरून वरील अनुमान करण्यास हरकत नाहीं.

दुपारीं बरोबर १२–२९ ला आम्स्टरडामला गाडी पोचली. येथून पुढली गाडी ३–५० ला निघावयाची होती. गांवांत जावें असें मनांत फार होतें, पण कोणी सांगावयास बरोबर असल्याशिवाय काय उपयोग? स्टेशनवर इंग्रजी बोलणारा एकजण भेटला त्याचे साह्यानें नव्या तिकि-टाची व सामान लगेज रूममध्यें ठेवण्याची व्यवस्था करून खर्चाचें टिपण व राहिलेली डायरी लिहावी या विचारानें वेटिंगरूममध्यें जाण्याचें ठरविलें. इतक्यांत माझी अडचण समजून एक इंग्रजी येत असलेला तरुण डच विद्यार्थी माझेजवळ आला व आपण होऊन त्यानें मदत करण्याची इच्छा दर्शविली. त्यानें “शहर पहाण्यास याल काय?” म्हणून मला विचारलें. मला तो धंदे-वाईक वाटाड्या असावा असें वाटून “काय खर्च येईल?” असें मी त्यास विचारलें. “कांहींएक खर्च नाहीं, मी एक विद्यार्थी आहे व तुम्हांस इंग्रजी येतें, तेव्हां कांहीं वेळ इंग्रजी बोलतां यावें व तुमचा

परिचय व्हावा म्हणून तुम्हांस मदत करण्यास आलों." असें त्यानें सांगितलें. मी जरा साशंकच होतों, पण दिवसा ढवळ्या जावयाचें त्यांत काय अडचण, असा विचार करून त्याचेबरोबर आमूस्टरडाम पहावयास जाण्याचें ठरविलें. जाण्यापूर्वी कॉफी, चहा कांहीं तरी घ्यावें असा विचार केला. माझ्या नवीन डच मित्रास 'तुम्ही कांहीं घ्याल का?' असें विचारलें. दोघेहि स्टेशन रेस्टोरॉंत गेलों. तेथें कॉफी मागविली व त्यानें स्वतःसाठीं सँड्विच् ( एक प्रकारची करंजी ) मागविलें. कॉफी आपलेकडील पाऊण पेला व बरोबर दूध अगदीं थोडें म्हणजे स्वयंपाकाची पाऊण पळी. येथें लोक अगदीं कमी किंवा बिनदुधाची व कडवट कॉफी घेतात. मी वेट-रला सांगून आणखी दूध आणविलें. आमचे बिलाचे पैसे मी नको म्हणत असतांहि त्या डच गृहस्थानें दिले. नंतर गांव पहावयास गेलों.

गांवांतून फिरतांना जी विशेष गोष्ट एकदम नजरेस येते ती गांवांतील आडवे उभे कालवे—दोन तीन रस्ते ओलांडले कीं कालवा. हे रस्त्या-प्रमाणेंच आहेत. ओलांडण्यास अनेक ठिकाणीं पूल. यांस डच भाषेंत 'ग्रास्ट' म्हणतात. या कालव्यांतून लहान स्टीम होड्या सुंदर असतात व त्यांतून लोक सहल करावयास जातात. या कालव्यांमुळें शहरास विशेष सौंदर्य आलेलें दिसतें. येथें विशेष पहाण्यासारखी गोष्ट म्हणजे म्युझियम. तो पाहून परतलों व तिसरे प्रहरीं आमूस्टरडामहून निघालों. नवे डच मित्रहि त्याच गाडीनें स्वतःचे गांवीं जाण्यास निघाले. त्यांचें स्टेशन आल्यावर ते उतरून माझ्या डब्याकडे येऊन मोठ्या प्रेमानें त्यांनीं निरोप दिला.

सायंकाळीं ६–५१ ला एनिस्किडीला पोंचलों. स्टेशनवर हॉटेलचा मनुष्य आला होता. त्यास सामान देऊन पायींच हॉटेलपर्यंत गेलों. तेथें डच वकील डॉ. टेकांटी माझी वाटच पहात होते. त्यांस घरीं परत जावयाचें असल्यामुळें केसची हकीकत समजावण्यासाठींच प्रथम बसलों.

रात्रौ शाकाहारी जेवणासाठीं मुद्दाम सूचना द्यावी लागली. पाव, लोणी, उकडलेले बटाटे, ओले वाटाणे, गाजरे, भात, चहा असें जेवण होतें. रात्रीं सर्व आटोपण्यास उशीर झाल्यामुळें जेवल्याबरोबर

निजलों. थंडी बरीच होती, पण सायंकाळीं थंड पाण्यानें स्नान करूं शकलों. आजपावेतों तरी थंड पाण्याचें स्नान चालू आहे.

हॉलंडमध्यें घड्याळ ग्रीनिच टाईमपेक्षां नेहमीं २० मिनिटें पुढें असतें. इंग्लंडपेक्षां हा देश पूर्वेकडे अधिक असल्यानें हा फरक आहे.

ता. २१–५–१९२८

आज कोर्टांत मि. कौर यांची जबानी व्हावयाची होती. डॉ. टेकांटी ( डच वकील ) सकाळीं ९ वाजतांच आले होते. तेव्हांपासून ११ वाजेपावेतोंचा वेळ त्यांचेबरोबरच गेला.

कोर्टांत बरोबर ११ वाजतां पोचलों. सर्व काम इंग्रजींत न चालतां डच भाषेंत चाललें. जबानी झाल्यावर दुभाषी बाईकडून मला सर्व समजाविलें व तें मी ऐकून मला जे कांहीं प्रश्न योग्य वाटले ते सांगितल्यावर ते तिनें डचमध्यें विचारले. सर्व काम संथ व शांतपणें पार पडलें.

काम आटोपून सुमारें दीडनंतर परत हॉटेलांत आलों. त्यावेळीं कांहीं तंतुवाद्यें घेऊन फिरणारी बायापुरुषांची ७–८ जणांची टोळी दिसली. हे लोक जर्मन भाट ( minstrels ) होते. आपल्याकडे ज्याप्रमाणें अशा तऱ्हेचे भिक्षेकरी असतात तसेच होते. गांवांतील मुख्य मुख्य ठिकाणीं वाद्यें वाजवून मिळेल त्यावर उपजीविका करतात. वाजविणें बरें असतें.

सायंकाळीं ५–४१ चे गाडीनें इंग्लंडास येण्यास निघालों. गाडी वाटेंत दोन ठिकाणीं बदलावयाची होती. त्यामुळें जरा कठीणच होतें. हॉटेलचे मुख्य वेटरनें मला कागदावर बदलण्याची स्टेशनें व वेळा लिहून दिल्या होत्या. तरी पण कसें काय जमतें याची थोडीशी धाकधूक होतीच. हॉटेलांत असतांना तार करणें, टपालाचीं तिकिटें, रेल्वेचीं तिकिटें, टेलीफोन सर्व कांहीं हॉटेलवालेच करतात व मग बिलांत ती रक्कम घालतात. आगाऊ पैसे द्यावे लागत नाहींत.

एनिस्किडीहून सायंकाळीं निघालों. स्टेशनवर येतांना एक उंच काळा कुळकुळीत शिद्दी व त्याचेबरोबर एक गोरी बाई असे दोघे येत होते.

माझ्याबरोबरचा पोर्टर त्यांना पाहून हंसूं लागला व मला खुणावूं लागला. हीं नवराबायको आहेत का असें मी त्यास विचारलें, तेव्हां त्यानें 'होय' म्हणून सांगून तो हंसूं लागला. अशा लग्नाची लोक तेथें टवाळी करतात हें उघडच दिसलें. अशीं लग्नें कशीं होऊं शकतात हें मात्र गूढ आहे. असो.

फर्स्ट क्लासांत बसलों. सुदैवानें त्यांतच एक डच भाऊबहीण इंग्रजी जाणणारे भेटले. त्यांस विचारलें. त्या गृहस्थानें लगेच खिशांतून टाइम टेबल काढून गाडी कोठें बदलावयाची तें सांगितलें. मध्यंतरीं त्या भावा-बहिणीशीं गप्पा चालल्या होत्या. हिंदी व युरोपियन संस्कृति वगैरे अनेक विषयांवर बोलणें खुल्या दिलानें चाललें होतें. रॉटर डॅमला ते उतरले व मला पुनः समजावून सांगून पोर्टरलाहि सूचना देऊन निरोप घेऊन गेले.

रॉटर डॅमहून हूक ऑफ हॉलंडला जावयाचें. तेथें रात्रौ साडेदहा वाजतां पोचलों. तेथें प्रथम पासपोर्ट दाखवून मग आगबोटीचें तिकीट मिळतें तें घेऊन बोटीवर आलों. थोडा थोडा पाऊस असून गारवा फार होता, त्यामुळें केबिनमध्येंच जाऊन निजणें बरें वाटलें.

ता. २२-५-१९२८

सकाळीं जागा झालों तो सुमारें सहा वाजण्याचे सुमारास. इंग्लंडचा किनारा जवळ दिसूं लागला. बोट बंदरांत जात होती. बंदराचें नांव 'पार्क टाउन क्वे' अथवा 'हारिच'. येथून लंडनला तडक कोठेंहि न थांबतां येणाऱ्या गाडीनें निघावें असें होतें. लंडन म्हणजे लिव्हरपूल स्ट्रीट स्टेशन. हें या गाडीचें शेवटचें स्टेशन.

लंडन जवळ येऊं लागलें तेव्हां हाइड् पार्क अलेक्झांड्रा हॉटेलांत कसें जावें याविषयीं डब्यांतील उतारूंजवळ चौकशी सुरूं केली. लंडनमध्यें वाहतुकीचीं जीं साधनें आहेत त्यांत ट्यूब रेल्वे हें एक महत्त्वाचें साधन आहे. ट्यूब म्हणजे नळी. जमिनीखालून अदमासें ५०-६० फूट खोल मोठमोठ्या लोखंडी नळ्या घातल्या आहेत व त्यांतून ही आगगाडी विजेच्या

साह्यानें चालते. स्टेशनें चांगलीं प्रशस्त व आंतून वारा व हवा खेळ-ण्याची उत्तम सोय आहे. जमिनीवरून स्टेशनवर व स्टेशनांतून वर येण्यास मोठमोठाले लिफ्ट केलेले आहेत. गाडींतून उतरणारे सर्व उतारू एकदम वर येऊं शकतात. एका वेळीं अदमासें ७५ उतारूंस वर खालीं नेतील एवढे मोठे लिफ्ट आहेत. जमिनीवर दरेक स्टेशनाचें नांव, तिकीट ऑफिस वगैरे असतें. ट्यूबमध्यें (गाडींत व स्टेशनवर) विजेच्या दिव्यांचा नेहमीं लख्ख प्रकाश असतो. या गाडींत बसून जातांना आपण एका मोठया शहराच्या इमारती, रस्ते, ट्राम वगैरेच्या खालून भुयारांतून जात आहों अशी कल्पना सुद्धां येत नाहीं.

सेंट्रल स्टेशनांत खालीं उतरण्यास लिफ्ट नसून पायऱ्या आहेत. पण हा जिना असा आहे कीं रहाटाच्या माळेप्रमाणें पायऱ्या सारख्या फिरत राहातात. एका पायरीवर उभें राहिलें म्हणजे मनुष्य आपोआप खालीं त्या पायरीबरोबर जातो व शेवटीं पोचला कीं जमिनीवर पाय ठेवावयाचा. पहिल्या प्रथम पाय ठेवतांना पाय निसटेल कीं काय अशी भीति वाटते. पण ती काल्पनिक असते असें अनुभवानें ठरतें.

मेरीब्लांज स्टेशनवर उतरून पुढें अलेक्झांड्रा हॉटेलचा तपास केला. सव्वा मैल जावें लागलें. हॉटेलचा भपका व झगझगाट येथील मानानें इतरांसारखाच पण आपल्या मानानें विशेष. आपल्या गरजा पहातां ही राहाणी म्हणजे बादशाही व बिनजरूरी ऐषआरामाची असते. परंतु येथें ती साधारण उच्च वर्गांत सामान्य आहे. शिवाय हिंदी लोकांविषयीं हलकेपणाच्या कल्पना येथें लोकांचे मनांत येऊं नयेत म्हणून आपली राहाणी जरा उच्च ठेवावी असा कित्येक मित्रांचा आग्रह होता. मला स्वतःला त्यांत कांहीं तथ्य वाटत नाहीं. आपल्या कपडयांवरून व राहाणीकरणीवरून आपली किंमत होते ही गोष्ट खरी आहे; पण त्याला मर्यादा आहे. केवळ ऐषआरामी राहाणीवरून हिंदुस्थानाविषयीं चांगला व आदरमय अभिप्राय बांधण्याइतके इंग्रज लोक भोळे नाहींत ! शिवाय ज्या वर्गाचे अभिप्रायाविषयीं ही धडपड त्यांचे हातांत हिंदुस्थानाचें बरें वाईट करण्याचें काय आहे ? परंतु माझा स्वतःचा अभिप्राय कांहीं

असला तरी कांहीं तरी इतरांसाठीं करावें लागतें. मला वाटतें येथें आल्यावर खर्चिक संवयी लागतात त्याची सुरुवात नेहमींच ऐष-आरामाच्या बुद्धीनें होत नसावी.

येथें सर्व नौकर लोक फारच शिस्तींत व अदबीनें वागतात. प्रत्येक वेळीं 'सर' म्हणतात. पण त्याचप्रमाणें आपल्याकडूनहि सभ्यतेची अपेक्षा असते. आपणहि त्याला 'थॅंक यू,' 'गुड् मॉर्निंग' वगैरे म्हटलें पाहिजे. समाजांत कोणाचा दर्जा कांहींहि असला तरी सर्व मनुष्यें आहेत व सभ्यतेनें वागण्याचा आणि वागून घेण्याचा प्रत्येकास हक्क आहे या तत्त्वाचें हें द्योतक आहे. आपण 'थॅंक यू' वगैरे म्हटलें नाहीं तर ते रागावतात किंवा काम करीत नाहींत असें नाहीं, पण आपली किंमत करतात. वरकरणी क्षुल्लक वाटणारी गोष्ट राष्ट्राच्या स्वतंत्रतेची साक्ष मला तर पटविते.

सर्व आटोपून सर चिनूभाईच्या मुक्कामाचे हॉटेलकडे गेलों. त्याचें नांव रॉयल पॅलेस हॉटेल, केन्सिंग्टन्. अलेक्झांड्रा हॉटेलापासून किती लांब, कसें जावें ही पंचाईत. तोंडाचा उपयोग करतांच येथील लोक अगदीं खुषीनें व बिनचूक माहिती सांगतात. कित्येक वेळां तर रस्ते जवळच फुटत असले तर बरोबर येऊन दाखवितातहि. येथें सर्वांत सभ्य, कितीहि विचारलें व बथ्थडपणें नाहीं समजलें तरी न रागावणारा, उलट हंसून पुनः सांगणारा व बिनचूक माहिती देणारा असा पोलीसमन आहे. पोलीसास रस्त्यावर मोटारी, गाड्या, बस वगैरेच्या रहदारीमुळें काम अतिशय, तरी पण माहिती सांगण्यास घाई नाहीं किंवा कांकूं नाहीं. हिंदुस्थानांत व येथें या बाबतींत किती जमीन अस्मानाचें अंतर! असो. सर चिनूभाईची भेट घेऊन रात्रौ अलेक्झांड्रा हॉटेलांत येऊन निजलों.

ता. २३–५–१९२८

सकाळीं मुक्काम सर चिनूभाईकडे हलविला. दुपारीं इंडियन स्टूडंट्स् होममध्यें गेलों होतों. शोधतां शोधतां तपास तर लागला. येथें रस्त्यावर

ज्या पाट्या रस्ता किंवा मोहोल्ला दाखविण्यासाठीं लावल्या आहेत त्यांत एक फारच चांगली व्यवस्था ऐतिहासिक माहिती देण्याची आहे. हल्लींचें लंडन शहर पुष्कळ लहान लहान निरनिराळीं वसतिस्थानें किंवा शहरें मिळून झालेलें आहे. तेव्हां पाटीवर प्रथम जुन्या शहराचें नांव, नंतर रस्त्याचें किंवा चौकाचें नांव असतें. यामुळें मूळ लंडन शहरांत आपण आहों कीं बाहेर व बाहेरच्या भागाचें मूळ नांव काय हें चट्कन् समजतें. शिवाय ज्या घरांत किंवा ठिकाणीं येथील स्मरणीय माणसें जन्मलीं–राहिलीं अथवा त्यांनीं धंदा केला त्या त्या ठिकाणीं दगडावर कोरून ती हकिकत बसविलेली आहे. इंडियन स्टूडंट्स् होमच्या जागीं शेक्सूपियरची राहाण्याची जागा होती. ही पद्धति आपल्याकडेहि उपयोगांत आणण्यासारखी आहे.

इंडियन् स्टूडंट्स् होम हें यंग मेन्स् ख्रिश्चन असोसिएशननें चालविलें आहे. वर वर पहातां बरी सोय असल्याचें वाटलें. पण स्वच्छता व टापटीप कमी दिसली. इंग्लंडमध्यें राहूनसुद्धां इंग्लिश वातावरणाचा परिणाम झालेला दिसला नाहीं.

ता. २४–५–१९२८

मॅन्चेस्टरहून मि. येट्स् कालपासून आले असून त्यांजबरोबर सर चिनूभाई घरांचा तपास करीत आहेत. घराचें नक्की झाल्याशिवाय इतर कार्यक्रम ठरविणेंहि कठीण आहे.

दुपारीं येथील रा. के. बी. मावळंकर यांस भेटावें व जमल्यास त्यांचेकडून घराविषयीं माहिती मिळवावी अशा विचारानें विम्बल्डन्ला जाण्यास एकटाच निघालों. कोठेंहि गेलों तरी वेळ लागेल, पण पत्ता काढतां येईल असा भरंवसा आतां वाटूं लागला आहे.

विचारीत विचारीत अखेर पत्ता काढला. येथील लोकांची रीतभात, सभ्यता वगैरे खरोखर शिकण्यासारखें आहे. पोलीसचें सौजन्य व सभ्यता तर पदोपदीं दिसून येते. रस्ता ओलांडण्यासाठीं ५–७ माणसें अथवा

एखादाहि मनुष्य २–३ मिनिटें थांबला कीं त्यानें सर्व गाड्या थांबवून सोय केलीच म्हणून समजा. आपण जनसमाजाच्या सेवेसाठीं आहोंत व सेवाधर्म बजावीत आहोत याची जाणीव त्यांच्यांत असल्याचें उत्तम दृष्टीस पडतें.

रा. मावळंकर घरीं नव्हते. पण थोड्या वेळानें त्यांच्या पत्नी आल्या, मुलेंहि आलीं. दोघी मुली आहेत. त्यांना मराठी समजतें, पण बोलण्याची हिम्मत करीत नाहींत. इंग्रजी हीच त्यांची भाषा झाली आहे. कांहीं वेळानें रा. मावळंकर आले. त्यांची मीच ओळख करून घेतली व माझी करून दिली. त्यावेळीं त्यांचेकडे डॉ. परांजपे, वगैरे मंडळी आली होती. मलाहि जेवण्याचा आग्रह केला, तेव्हां मी जेवण्यास तेथें राहिलों. जेवण टेबलावरच, पण सर्व पदार्थ आपल्यासारखे श्रीमती मावळंकरबाईनीं तयार केलेले. जेवण अशा तऱ्हेचें पुष्कळ दिवसांनीं झाल्यामुळें त्याची विशेष गोडी वाटली.

रा. मावळंकर येथें बरींच वर्षे आहेत व केवळ पुरुषार्थानेंच येथें व्यापाराचा जम बसवून सुखी आहेत. हिंदी लोकांविषयीं त्यांना पूर्णपणें आत्मभाव आहे व येथील सर्व हिंदी लोकांच्या सामाजिक चळवळींत ते प्रामुख्यानें भाग घेतात. ते आमचेच कुटुंबांतील खेड शाखेचे असल्यामुळें मला त्यांचेविषयीं साभिमान आपलेपणा वाटावा हें स्वाभाविकच आहे.

ता. २५–५–१९२८

काल दुपारीं हाइड पार्क हॉटेलांत मेजर भाऊसाहेब गायकवाड यांस भेटलों. श्रीमंत राणीसाहेब कोठें जावयाच्या होत्या त्या गडबडींत होते. श्रीमंत महाराजासाहेबांचे घोडे कोठल्याशा शर्यतींत धांवावयाचे होते त्याची प्राथमिक तपासणी करण्यासाठीं जात असल्याचें समजलें. आपले हिंदी राजे येथें येतात व फारच खर्चिक तऱ्हेनें पैशाचें पाणी करून राहातात याबद्दल वाईट वाटतें. जग काय आहे, येथें राज्यशकट हांकण्याची कला किंवा प्रजेच्या उन्नतीचे, सौख्याचे, सुधारणेचे उपाय पाहून अभ्यास

करण्यासाठीं राजे लोकांनीं जरूर यावें. पण चैनीसाठीं येण्याचा या राजे लोकांस हक्क आहे काय? गरीब प्रजेचे पैसे पाण्यासारखे उधळले जातात. संस्थानच्या कारभारांत लक्ष्य नसल्यामुळें व आपलेपणा नाहींसा होत गेल्यामुळें होणारे घोटाळे व येत जाणारी नालायकी ही वेगळीच. एकंदर प्रकार फारच शोचनीय व मनास उद्वेग आणणारा! असो.

आज सकाळीं घरें पहाण्याचें काम पुढें चालू केलें. सर्व घरातून सोय जवळ जवळ सारखीच. आम्ही मध्यम वर्गातल्या लोकांचींच घरें पाहिलीं. फार श्रीमंत किंवा गरीब वर्गाचीं नाहींत. भिंतीवर, फायर प्लेस( शेगडी )-वर व इतर ठिकाणीं लहान लहान चित्रें, तसबीरा, घड्याळें वगैरे स्वच्छ व सुंदर रीतीनें मांडलेलीं. मुलांकरितां एक स्वतंत्र नर्सरी म्हणून खोली मोठी असते, त्यांत सर्व खेळ वगैरे असून शेजारींच बहुधा मुलांस निजाव-वयाची खोली असते. प्रत्येक खोलींतून आरसे भरपूर. आम्हांस प्रत्येक ठिकाणीं स्वयंपाकघर पहावेंच लागलें व तेंहि उपयोगांत असलेलेंच दरेक ठिकाणीं दिसलें. तेथेंहि कमालीची स्वच्छता दिसली. मांसाशनाच्या कंटाळ्या-मुळें त्या अन्नाचीच घाण वाटेल ती वेगळी, पण त्याशिवाय सर्व स्वच्छ.

घरांत काम करणाऱ्या मेड( मोलकरिणी )साठीं बहुधा खोली अगदीं वरचे मजल्यावर ( माळ्यासारखी जागा ) असते. पण तिचीसुद्धां अंथरूण-पांघरुणांची व्यवस्था व स्वच्छता अशी असते कीं आपलेकडे आपण खुद्दहि तशी आपली स्वच्छता ठेवीत नाहीं.

भाड्यानें घर घ्यावयाचें म्हणजे फर्नीचरसुद्धां घ्यावयाचें. घरांतील फर्नीचर व इतर शोभेच्या वस्तू येथील लोक आपली महत्त्वाची मिळकत समजतात, आणि तें खरेंहि आहे. प्रत्येक घरांत पियानो असतोच-सहज १५०० रु.ची किंमत. तसेंच कोचें, खुर्च्या वगैरेचा सेट, गालीचे, चहाकॉफीचे व जेवणाचे सेट वगैरे फारच चांगले व भारी किंमतीचे असतात. सामान्य रीतीनें एखाद्यानें जर १००० पौंडाचें घर घेतलें तर त्यांत १००० पौंडाचें फर्नीचर वगैरे असावयाचेंच. यावरून कल्पना येईल. हें सर्व भाड्यानें देणें म्हणजे वापरणारा कसा आहे याकडे घरवाले पहातातच. आपल्या लोकांस असें फर्नीचर वापरण्याची किंवा

अशा रीतीनें राहाण्याची संवय नसते. त्यामुळें युरोपीयनांशिवाय इतरांस घर भाड्यानें देण्यांत एक प्रकारची नाखुषी दिसते ती स्वाभाविक आहे. शिवाय मुलेंबाळें किती हाहि प्रश्न असतो. साधारणपणें मुलें असलीं तरीसुद्धां नाखुषी असते. कारण उघडच आहे. हिंदी मनुष्यास तो केवळ हिंदी म्हणून घर भाड्यानें देण्यास खुषी नाहीं असें सामान्यपणें तरी दिसत नाहीं. कांहीं असतील. जास्त मंडळी किंवा मुलें असलीं म्हणजे भाडें जास्त पडतें एवढेंच.

तिसरे प्रहरीं मॅडम टसोचीं चित्रें पहाण्यास गेलों होतों. आपलेकडे रा. फडके यांचीं जशीं मेणाचीं चित्रें आहेत तशीं हीं चित्रें. पण फडक्यांचे चित्रांपेक्षां यांचा दर्जा फारच वरचा लागेल. या संग्रहांत जुने व नवे ग्रंथकार, कवी, राजकारणी पुरुष वगैरे निरनिराळ्या विभागांत दाखविले आहेत. हुबेहूब आकृति–कपडे वगैरेसुद्धां सर्व–अस्सलबरहुकूम. ही मंडळी आतां बोलतील कीं काय असा भास होतो. चित्रें किती हुबेहूब असतात त्याचें एक उदाहरण देतों. चढतांनाच जिन्यांत एक शिपाई उभा केला आहे व 'अमुक बाजूनें जा' असें बोट दाखवीत आहे. अगदीं जवळ जाऊनसुद्धां दोन मिनिटें त्याकडे पाहून तो हालत नाहीं यावरून तो पुतळा आहे असें ठरवावयाचें. गंमत अशी झाली कीं एका खोलींत दोन मुलें शिरलीं. तेथें एक शिपाई थेट पुतळ्यासारखा उभा होता. त्याला न्याहाळून पाहून मुले कांहीं वेळानें, कोणी आपल्याकडे पहात नाहीं असें समजून, उलट्या बाजूनें जाऊं लागलीं. लागलीच तो पुतळा चालता बोलता झाला !

ता. २७–५–१९२८

येथें सूर्यास्त फार उशीरां होतो व त्यानंतर संध्याप्रकाशहि पुष्कळ राहातो. रात्रौ १० वाजले तरीसुद्धां आपल्याकडील उन्हाळ्यांतल्या ७–७॥ चा भास होतो. तसेंच उजाडतेंहि फार लौकर. ४॥ ला फटफटीत होतें. शिवाय् आणखी एक फरक आहे. उन्हाळ्यांत येथें घड्याळ एक तास पुढें व हिंवाळ्यांत एक तास मागें असा येथें कायदा

झालेला आहे. यास ‘ डे लाईट सेव्हिंग बिल ’ म्हणतात. याचा अर्थ एवढाच कीं सरकारी व इतर सार्वजनिक ऑफिसें यांना जो काम करण्याचा वेळ मिळतो ( सकाळीं १० ते सायं. ५ ) तो दिवसाच्या उजेडीं जेवढा मिळेल तेवढा मिळावा व त्यायोगें फायदा व्हावा. यामुळें येथें सूर्यास्त होतो त्यावेळीं ८॥–८॥। झालेले असतात. रात्रीं जेवणखाण आटोपून यावें आणि पहावें तों १०॥–११ झालेलेच असतात.

ता. २८–५–१९२८

मला लंडनला व इंग्लंडांत थोडेच दिवस राहावयाचें असल्यामुळें रोज कांहीं तरी पहाण्याचा कार्यक्रम ठरविणें जरूर होतें. एकट्यानेंच जाण्यापेक्षां कोणी बरोबर असलें तर बरें, म्हणून रा. गुलाबचंद दोशी ( सोलापूर ) यांस विचारतां त्यांनाहि सोबत हवी असल्यानुळें आमचा कार्यक्रम बरोबरच जमेल असें ठरविलें.

येथील कोर्टें व बॅरिस्टरांच्या इन्स ( शिक्षणसंस्था ) पहाण्यासाठीं टेंपल्सला गेलों होतों. पण कोर्टांस रजा असल्यामुळें तीं बंद होतीं.

सायन्स म्यूझियम पहावयास गेलों. येथें म्युझीयमें व गॅलेऱ्या ( चित्र–कलावस्तू–संग्रहस्थानें ) पुष्कळ आहेत. त्यांपैकीं सरकारी आहेत त्या सर्वांचा कार्यक्रम सरकार दर महिन्यास प्रसिद्ध करीत असतें, तो प्रत्येक म्यूझियममध्यें किंवा गॅलेरीमध्यें मिळूं शकतो. प्रत्येक म्यूझियमचे किंवा गॅलेरीचे विभाग असतात व प्रत्येक विभागाविषयीं लोकांना माहिती देण्यासाठीं निरनिराळ्या दिवशीं समजावून देणारे तज्ज्ञ लोक येऊन ठरलेल्या वेळीं ठरलेल्या विभागांतून स्वतःचें व्याख्यान अथवा समजावणें, जे लोक असतील त्यांस बरोबर घेऊन, वस्तू दाखवून, करतात. कांहीं ठिकाणीं प्रवेश फी व व्याख्यान फी असते. पण बहुतेक सर्व ठिकाणीं व्याख्यान फी नाहीं व प्रवेश फी पण थोडीच. प्रत्येक ठिकाणीं त्या त्या म्यूझियमची किंवा गॅलेरीची माहिती देणारीं पुस्तकें, पत्रकें, पोस्ट कार्डें, चित्रें मिळतात तीं वेगळींच.

सायन्स म्यूझियम पाह्याण्यास सुरवात केली. प्रत्येक विषयाची शाखा वेगळी व शाखावार माहितीचीं पुस्तकेंहि होतीं. आम्हांस त्यांत विद्यार्थी या नात्यानें गम्य नसल्यामुळें नुसतें पहात चाललों. तेथें ठेवलेलीं एंजिनें व इतर यंत्रें लहान नमुन्याचीं होतीं पण तीं बटन दाबून चालवितां येतात. वाटेल त्यानें चालवून पहावीं व त्याचें काम कसें चालतें त्याचा अभ्यास करावा अशी सोय आहे.

बारा वाजतां आम्ही लढाऊ जहाजांच्या विभागांत गेलों. तेथें व्याख्यात्यानें सर्व विषय अगदीं सामान्य माणसांना समजेल अशा व मनोरंजक रीतीनें सांगितला. हें म्यूझियम सायं. ५॥ वाजेपावेतों पाहिलें. जयपूरच्या वेधशाळेची प्रतिकृति ( Model ) ठेवलेलें आढळलें. शास्त्रीय ज्ञानांत ज्योतिषशास्त्राशिवाय कोठेंहि हिंदुस्थानाचें नांव नाहीं अशी शोचनीय स्थिति दृष्टोत्पत्तीस आली.

ता. ३१-५-२८

आज टपालाचा दिवस असल्यामुळें पत्रें लिहिलीं व नंतर व्हिक्टोरिया व आल्बर्ट म्यूझियम पहावयास गेलों, या इमारतींत इतके पुष्कळ व गुंतागुंतीचे सोपे आहेत कीं म्यूझियमचा नकाशा बरोबर ठेवल्याशिवाय जर पाहूं म्हटलें तर पुनः पुनः तेथें तेथेंच घोटाळण्याची पाळी यावयाची. म्यूझियम इतकें मोठें आहे कीं नुसतें एकदांच पहाण्यासाठीं फिरलें तर ७ मैल चालणें होतें असें रखवालदारानें सांगितलें.

येथें जवाहिराचा माल चांगला ठेवला आहे. मौल्यवान व ऐतिहासिक दृष्टीनेंहि प्रेक्षणीय वस्तु आहेत. तो इतिहास मात्र आपला नव्हे, इंग्रजांचा !

म्यूझियमच्या आंतला चौक मोकळा आहे. तेथें सुंदर लॉन केलेलें आहे. आंतील दरवाजाचे वरच्या बाजूस पुढीलप्रमाणें लिहिलेलें आहेः—

" Wisdom exalteth her children and layeth
hold of them that seek her

Better to get wisdom than gold
Wisdom cometh from the Lord and is
with Him for ever."

यावरून ज्ञानाची किंमत सोन्यापेक्षांसुद्धां जास्त ठरवून ज्ञान-देवतेच्या उपासकांकरितां म्यूझियमचें मंदिर उभारण्यांत आलें असल्याचें जाहीर करण्याचा उद्देश उघड दिसतो. तसेंच भौतिकशास्त्रें व कला यांवर विशेष भर दिसतो.

ता. ३–६–१९२८

रा. गुलाबचंद यांचेबरोबर जाऊन आज रोजीं सकाळीं डॉ. काका-साहेब यांस भेटलों. ते राहातात तेथें आणखीहि हिंदी–महाराष्ट्रीय विद्यार्थी राहात आहेत. शाकाहारी खाणें ठेवून चालविण्यांत फारच त्रास होऊं लागल्यानें स्वतःस शाकाहारी राहातां आलें नाहीं असें त्यांनीं सांगितलें व मी तें ऐकून घेतलें. मला वाटतें याचा अर्थ एवढाच कीं मनाचा त्या बाबतींत निश्चय नाहीं.

ता. ४–६–१९२८

आज रोजीं राजेसाहेबांच्या वाढदिवसाकरितां मोठी मिरवणूक व स्वारी हॉर्सगार्डसूमधून बकिंगहॅम पॅलेसमध्यें जाणार होती. मिरवणुकीचे पूर्वी राजेसाहेब ११ वाजतां राजवाड्यांतून हॉर्सगॉर्ड्सूचे पटांगणांत लवाजम्यानिशीं येणार होते. तें पहावयाला सांपडावें यासाठीं चांगली जागा मिळावी म्हणून मॉन्यूमेंटच्या डयूक स्टेप्सूवर जाण्याची घाई होती. ड्यूक स्टेप्सवर उजवे बाजूस उभें राहिलें म्हणजे जातांना स्वारीहि दिसते व पटांगणांतील कवाईतहि दिसते. त्यामुळें ती जागा मिळविण्याची विशेष आवश्यकता होती. १०॥ वा. पोंचलों. सर्व पायऱ्या दोन्ही बाजूंचे रस्ते, पटांगणांतील बैठकी व बाजू प्रेक्षकांनीं फुलून गेलेल्या होत्या. लाखो लोक जमलेले होते. पण यत्किंचितहि गोंगाट नाहीं कीं एकमेकांवर पडापडी,

धक्काबुक्की वगैरे प्रकार नाहीं. राजेसाहेबांची स्वारी प्रिन्स ऑफ वेल्स, ड्यूक ऑफ यॉर्क व परदेशीय आणि साम्राज्यांतर्गत भागांचे प्रतिनिधी यांसह बरोबर ११ वाजतां पटांगणांत दाखल झाली. तेथें कवायती व पहाणी झाली, व सुमारें १२ वाजतां सर्व मिरवणूक वाजत व लष्करी शिस्तीनें चालत परत बकिंगहॅम राजवाड्यांत गेली. स्वारी रुबाबदार व इंग्लंडच्या लष्करी शिस्तीची व झगझगाटाची द्योतक अशी झाली.

अशा गर्दीचे वेळीं पुष्कळ लोक गर्दीमुळें घेरी येऊन किंवा इतर कारणांमुळें बेशुद्ध होतात. अशांना प्राथमिक उपचार करण्याची सर्व तयारी पोलिसांनीं जय्यत ठेवली होती. आमच्या देखत बाया व पुरुष मिळून ५–७ जणांना उपचार केले. दूरदर्शीपणानें सर्व तजवीज ठेवण्यांत कार्यकुशलता तर खरीच! स्वारी गेल्यावर लोकांची गर्दी अगदीं शांतपणानें नाहींशी झाली. त्यांतहि धांवाधांवी, धक्काबुक्की वगैरे कांहीं एक प्रकार नव्हता.

ता. ६–६–१९२८

आज एप्सम्‌चे मैदानांत घोड्यांच्या शर्यती होत्या. 'डार्बी' नांवानें या प्रसिद्ध आहेत. कोणता घोडा जिंकेल यावर लॉटऱ्या असतात व लाखो लोक एकदम श्रीमंत होण्याच्या लालसेनें पैसे टाकून एकाद्या दुसऱ्याची धन करतात. खूपच मोठी सट्टेबाजी असते.

परंतु ही जरी एक बाजू झाली तरी चांगले घोडे व्हावे, यासाठीं शर्यतींची जरूर आहे व एकंदर इंग्लिश लोकांस शर्यतीची फार आवड. शिवाय या शर्यती पुष्कळ वर्षें चालू असल्यामुळें व पुष्कळ लोक जात असल्यामुळें हा दिवस आपल्याकडील जत्रेच्या दिवसासारखा झाला आहे. त्यामुळें निर्दोष आनंद मिळविण्यासाठीं व फॅशन म्हणूनहि जाणारे पुष्कळ असतात. या शर्यतीस जाणें इतक्या फॅशनेबल रीतीचें समजलें जातें कीं शर्यती पहाण्यासाठीं विमानांतून युरोपांतून येणारी मंडळी होती. किती लोक जमले होते याचा अंदाज करणें कठीण आहे. पण मुंग्यासारख्या माणसांचा एक समुद्रच होता असें म्हटल्यास अतिशयोक्ति

नाहीं. एकंदर समुदाय सुमारें दहा लाख जमला असावा. एवढा समुदाय होता तरी पण बेशिस्त कारखाना किंवा गडबड नाहीं. पहाण्याची प्रत्येकाला एवढी आतुरता व एवढी गर्दी पण धक्काधक्की नाहीं. आम्ही दिवसभर तेथें राहून खेळ वगैरे पाहून सायंकाळीं परत आलों.

ता. ७–६–१९२८

आज सकाळीं आम्ही सर्वजण ऑक्सफर्डला जाण्यास निघालों. तिकडे जातांना वाटेंत रीडिंग लागतें. हंट्ले पामरचा कारखाना दिसतो. एकाद्या मोठ्या गिरणीइतका विस्तार आहे. 'स्टटन' नांवाची फुलझाडें, बीं, फुलें विकणारी कंपनी आहे, हिचींहि उष्णतागृहें, प्रयोगशेतें वाटेंत लागतात.

ऑक्सफर्डला सुमारे दोन तासांत पोंचलों. स्टेशनवरून गांवांत पायींच चालत गेलों. गांव लहान पण रस्ते वगैरे सर्व कांहीं उत्तम. गांवास महत्त्व युनिवर्सिटी व कॉलेजें यांमुळें.

सर्व कॉलेजें फार जुनीं आहेत. प्रत्येक कॉलेजास पूर्वपीठिका व इतिहास आहे, आणि पूर्वस्मरण उत्तम राहील, ताजें राहील व परंपरा कायम राहील यासाठीं जितकी काळजी घेणें शक्य आहे तितकी घेतली जात आहे. कॉलेजांतील नामांकित विद्यार्थी व पुढें नामकित झालेले कवी, तत्त्ववेत्ते, राजकारणी पुरुष यांच्या तसबीरा, नांवाच्या तक्त्या, फळे, लढाईत गेलेल्याच्या व कामीं आलेल्यांच्या याद्या आहेत. जेवणाचे दिवाणखान्यांत बहुधा अशा तसबीरा व त्यांच्याखालीं नांव, साल व कशासाठीं नामांकित हें दिलेलें असतें. कॉलेजांत वेगळे प्रोफेसर नसतात. सर्व प्रोफेसर युनिवर्सिटी नेमते व सर्व कॉलेजांतील विद्यार्थ्यांनीं आपापल्या नियत प्रोफेसरांचीं व्याख्यानें ऐकावयाचीं. कॉलेजांत ट्यूटर असतात ते विद्यार्थ्यांस मार्गदर्शकाचें काम करतात, मदत करतात. शिस्तीविषयीं फारसा कडकपणा दिसत नाहीं. कॉलेजांत जागा नसल्यामुळें बाहेर राहाणाऱ्या विद्यार्थ्यांस वाटेल तेथें राहातां येत नाहीं, पण युनिवर्सिटीनें पर-

वाना दिलेल्या घरांतूनच राहातां येतें. अर्थात् हा नियम पोस्ट ग्रॅज्युएट विद्यार्थ्यांस लागूं नाहीं.

मला मात्र हीं सर्व कालज व शिक्षणव्यवस्था आणि वातावरण पाहून राष्ट्रीय शिक्षण म्हणजे कशांत आहे याची जरी जाणीव झाली तरी येथील हिंदी विद्यार्थ्यांस आपापल्या कॉलेजचा अभिमान कां वाटावा हें मात्र समजत नाहीं. उलट या कॉलेजांतून निघणारा हिंदी विद्यार्थी—जर त्याला हृदय व डोळे असतील तर—स्वदेशासाठीं तळमळणारा निघेल यांत मला शंका वाटत नाहीं. दुर्दैवानें हिंदी विद्यार्थ्यांनीं इंग्रजांचें अनुकरण पोषाख, बोलण्याची तऱ्हा, तंबाखू, नाच व अमर्याद आहारविहार यांतच केलेलें असावें असें वाटतें !

येथें बॉडलियन लायब्ररी आहे. त्यांत ५०० वर्षांपासूनचें व त्यापूर्वींचेहि हस्तलिखित ग्रंथ आहेत. वाचनासाटीं एक वर्तुळाकार दिवाणखाना 'कॅमेरा' नांवानें ओळखला जाणारा आहे. सर्व कांहीं वाचनास, अभ्यासास, संशोधनास, मननास व चिंतनास उत्तेजक असें आहे. ग्रंथालयातून ग्रंथसंपत्ति अपार आहे.

येथें ऑक्सफर्ड विद्यार्थ्यांचें यूनियन आहे. तेथेंहि लायब्ररी, वाचनालय, खेळाचीं साधनें वगैरे आहेत. शेजारींच वादविवादासाठीं स्वतंत्र दिवाणखाना बांधलेला आहे. येथील सर्व वादविवाद पार्लमेंटचे धर्तीवर होतात. विद्यार्थ्यांपैकींच एक अध्यक्ष असतो व सर्व तऱ्हेचे विषय चर्चेस येतात. एकादे वेळीं एकाद्या प्रचलित विषयावर चर्चा असली तर मुद्दाम पार्लमेंटचे सभासद व कॅबिनेटचे सभासदहि वादविवादांत हजर राहून आपली बाजू यूनियनपुढें मांडण्यास येतात. पुढें होणाऱ्या पार्लमेंटच्या सभासदांचें किंवा कॅबिनेट मंडळाचें हें शिक्षणस्थानच होय. सर्व वादविवाद जरी भातुकलीच्या खेळाप्रमाणें असले तरी फारच गांभीर्यानें होतात व देशाच्या हिताहिताचे प्रत्येक बाबतींत माहिती मिळवून विचार करण्याची विद्यार्थ्यांना तालीम मिळते.

सायंकाळीं ५॥ चे गाडीनें निघून लंडनला परत आलों. सर्व दिवस फिरण्यांत व मौजेनें माहिती घेण्यांत घालविला.

ता. ८–६–२८

आज सकाळीं केम्ब्रीजला जावयास निघालों. बायामंडळीहि आज बरोबर होती. डॉ. र. पु. परांजपे यांची कन्या श्री. शकुंतलाबाई केम्ब्रीज मुक्कामीं न्यूनहॅम कॉलेजांत शिकत आहेत. त्यांच्या ओळखीनेंच गांव व कॉलेजें पहावयाचीं होतीं.

सुमारें २–२॥ तासांत केम्ब्रीजला पोचलों. चंबूगबाळें एका हॉटेलांत ठेवून व बायामुलांस बसवून आम्ही श्री. परांजपे यांचेकडे गेलों. त्या आमचेबरोबरच आल्या.

ऑक्सफर्डपेक्षां गांव लहान दिसला, पण जास्त सुंदर वाटला. कॉलेजें सर्व जवळ जवळ ऑक्सफर्डप्रमाणेंच. पण येथील सृष्टिसौंदर्य वगैरे ऑक्सफर्डपेक्षां कितीतरी पटींनीं जास्त सुंदर व रमणीय. मधूनच नदी जात असल्यामुळें तर शोभा अवर्णनीय होती. एकंदर वातावरण कवित्वास स्फूर्तिदायक असें वाटलें.

येथें पुरुषांच्या कॉलेजांपैकीं इमॅन्यूएल कॉलेज, जॉन्स कॉलेज इ. पाहिलीं. डॉ. र. पु. परांजपे जॉन्स कॉलेजचे. तेव्हां त्यांच्या खोलीची खिडकीहि पाहिली.

येथून स्त्रियांच्या न्यूनहॅम कॉलेजकडे गेलों. स्त्रियांच्या कॉलेजची सर्व मांडणी पुरुषांच्या कॉलेजाप्रमाणेंच. फरक इतकाच कीं दरवाजावरील रखवालदारापासून तों ट्यूटर पावेतों सर्व अंमलदार वर्ग केवळ स्त्रियांचाच. कॉलेज पाहून आम्ही कॅम नदीचे कांठांवर गांवांत आलों व शोभा पाहून सायंकाळीं परतलों.

ता. ११–६–२८

आज सकाळीं मुनी जिनविजयजी (गुजरात पुरातत्त्व मंदिराचे) येथें संशोधन कार्यासाठीं आले आहेत. त्यांस भेटावयास केन्सिंग्टन गार्डन हॉटेलमध्यें गेलों होतों. मुनीजींस भेटलों. त्यांस पाहून निराशा झाली.

त्यांचा सर्व पेहेराव इंग्लिश धर्तीचा–शॉर्टकोट, कॉलर, टाय व डोक्यास हॅट. संन्यस्त वृत्तीनें राहाणाऱ्या साधूस शीतनिवारणार्थ गरम कपडे व पाटलोण बूट यांची जरूर आहे व त्याबद्दल मला कांहीं वाटलें नाहीं. पण सर्व तऱ्हा एकाद्या तरुण विद्यार्थ्याप्रमाणें कां? कॉलर व हॅट कशाला? सामान्य माणसास स्वतःच्या पेहेरावाची लाज किंवा येथील पेहेरावाची हौस वाटणें स्वाभाविक आहे, पण राष्ट्रीय वातावरणांत–त्यागाच्या वातावरणांत राहिलेल्या मुनींस हा वेष धारण करणें कां आवश्यक वाटलें? मला तर फारच निराशा वाटली–वाईटहि वाटलें. मुनीजींविषयींची पूज्य व आदरबुद्धीहि कमी झाली. पण हा सर्व एकतर्फी ग्रह आहे. कदाचित् त्यांचीं कारणें असतील व तीं ऐकल्यावर मला सबळहि वाटतील. पण सध्यां तरी प्रतिकूल ग्रह आहे.

नंतर रा. गुलाबचंद यांस हॉटेल सेसिलमध्यें भेटून तेथून आम्ही दोघे श्री. गॉड्फ्रे डेविस, आय्. सी. एस्. यांचेकडे गेलों. त्यांनीं आमचेबरोबर दोन तास फिरून सर्व कोर्टें दाखविलीं. प्रत्येक कोर्टांत कांहीं वेळ बसून, ऐकून मग पुढें जात होतों. बॅरिस्टरांचे डोक्यावरचे टोप व झगे पाहून थोडें हंसूं येण्याची वृत्ति होते. तोंच त्यांचें गांभीर्य पाहून सादर पहाण्याची वृत्ति होऊन कौतुक वाटतें. जुनी गोष्ट–जुनी वहिवाट जिवंत ठेवण्यासाठीं येथें फारच धडपड दिसते. जुना इतिहास तर असा जिवंत ठेवीत आहेत कीं आपल्याला कांहीं कल्पनाच नाहीं. इन्स ऑफ् कोर्ट अस्सल स्थितींतच आहेत. विजेच्या नव्या शेगड्यासुद्धां घेतल्या नाहींत. त्याचप्रमाणें डोक्यावरचे टोप व झगे. हिंदुस्थानांतहि हे टोप व झगे घालावयाचे–आमच्या पूर्वीच्या वहिवाटीशीं त्याचा कांहींहि संबंध नसला तरी. पण आमच्या जुन्या तऱ्हेचा अंगरखा व उपरणें घ्यावयाचें म्हणजे मात्र आमच्यावर सनातनीपणाचा शिक्का व आमचें हंसूं. आम्हीच आम्हांला हंसतों, अशी आमची अगदीं अनुकंपनीय मनोदशा झालेली आहे.

तेथून 'सेल्फरिज स्टोअर्स' पहावयास गेलों. येथील स्टोअर्स पाहिल्याशिवाय दुकानाची विशाल कल्पना येणेंच शक्य नाहीं. अफाट भांडवल, भव्य व टोलेजंग इमारती. सेल्फरिज स्टोर्स ऑक्सफर्ड स्ट्रीटमध्यें आहे.

चार मजले जमिनीवर व दोन भुयारांत. एकदां दुकानांत शिरल्यावर तें बंद होईपावेतों पुनः कोणत्याहि कारणासाठीं बाहेर येण्याची जरूर नाहीं. याचा संस्थापक सेल्फरिज हा अगदीं लहान दर्जावरून चढलेला. तेव्हां या स्टोअर्समध्यें मुख्य तत्त्व—कमी टक्के नफा व जास्त विक्री करून भांडवल फिरवीत जास्त नफा करावयाचा. शिवाय साधारण मध्यम व गरीब वर्गांसहि खरेदी करतां यावी हा एक मुख्य उद्देश. या धर्तीवर इतरहि स्टोअर्स आहेत. आपणांस जी वस्तु पाहिजे असेल त्या शाखेंत जावें व खरेदी करावी. कोणती शाखा कुठें तें दुकानांतील कोणीहि नोकर सांगतो. वाटेल तेवढा माल पहावा व दाखवून घ्यावा, कोणत्याहि तऱ्हेची कुरकूर नाहीं. इतका माल अशा रीतीनें दाखवितात कीं उलटा आपणालाच संकोच वाटतो कीं आपण पैचा माल घेणार त्यासाठीं रुपयाची मेहेनत देत आहोंत. आपण जरी स्पष्ट सांगितलें कीं "मला माल घ्यावयाचा नाहीं, पण फक्त पहावयाचा आहे व मग काय तें ठरवीन," तरी विकणारे नौकर अगदीं हंसतमुखानें सांगतात कीं "आपण घ्या किंवा न घ्या, दाखविणें हा आमचा धर्मच आहे. आपण मनसोक्त पहाण्यास अगदीं संकोच करूं नका." विकणाऱ्या बहुतेक मुली (बाया) व कांहीं पुरुषहि. एकंदर किती संख्या असेल तें माहीत नाहीं, पण निदान हजार तरी स्त्रीपुरुष मिळून विक्री करणारे असतील. आपणांस पसंत पडलेली वस्तु घेऊन पैसे दिले म्हणजे पावती देऊन, जर आपल्या घरीं वस्तु पाठवावयाची असेल तर जादा पैसे न घेतां ती पाठवितात. यामुळें खरेदी करणें सोपें जातें. वस्तु घ्यावी व एक पावती आपल्याजवळ ठेवावी. जेवढा माल घेतला असेल तेवढा बरोबर पॅक होऊन दुसरे दिवशीं नेमका व बिनचूक आपल्या पत्त्यावर येतो. दुकानांत वर खालीं जाण्या-येण्यास मोठे लिफ्ट, त्यांतून वर जा, खालीं या. कितीहि वेळां जा, कोठेहि फिरा, कोणीहि विचारणार नाहीं कीं उगीच कां फिरतां. उलट 'या आणि पहा' हेंच ब्रीद. कोठेंहि माल पहात जरा उभें राहिलें कीं विकणारा अथवा विकणारी लगेच येऊन विचारतात "मी आपणांस मदत करूं काय?" वाटल्यास विचारावें. नाहीं तर "थॅंक यू, मी नुसता पहातों आहे" म्हटलें

म्हणजे झालें. दुकानांत रोजच्या मिरची-कोथिंबिरीपासून तों मोटार कारपर्यंत सर्व जिनसा मिळतात. खरीदतांना खरीदलेला माल बरोबर फिरवावा लागत नाहीं ही जशी मोठी सोय आहे, तशीच ठिकठिकाणीं तोंड धुण्याची, लघवीची, शौचाची सोय आहे. फराळ, लंच, चहा वगैरेहि मिळतें. गच्चीवर तर बगीचा आहे व तेथेंच चहा, आइस्क्रीम वगैरे खाद्यें मिळतात व येथें पुष्कळ लोक घेतात. विश्रांतीसाठीं एक दिवाण-खानावजा मध्यस्थळीं जागा आहे. तेथें टेबलावर वर्तमानपत्रें, मासिकें ताजीं पडलेलीं असतात. खुर्च्या, कोचें वगैरे आरामशीर अशीं आहेत. पत्रें वगैरे लिहिणें झाल्यास लिहावयाचीं टेबलें व साधनें ठेवलेलीं. लिहिण्याची सामग्री-नोटपेपर, पाकिटें वगैरे-पाहिजे तेवढी तेथें लिहिण्यासाठीं फुकट मिळते. तेथें एक पोस्ट ऑफिस ठेवलें आहे. त्यांतून रजिस्टर्ड पत्रें, इन्शुअर्ड पार्सलें, तार पाठवितां येतात. स्टांप वगैरेहि मिळतात. अशी सर्व सोय असल्यामुळें वेळ फुकट न जातां पुष्कळ कामें थोड्या वेळांत आटोपतां येतात. खरेदीसाठीं निरनिराळ्या ठिकाणच्या मित्रांना एकत्र जमणें असेल तर वेटिंगरूममध्यें ठरलेल्या वेळीं भेटूं शकतात. अशा रीतीनें आंत आलेल्या गिऱ्हाइकास मनसोक्त फिरतां येतें, सर्व गरजा भागविण्याचीं साधनें असल्यामुळें वेळ वांचतो व गिऱ्हाइकाच्या या सोयीबरोबर गिऱ्हाईक स्वाभाविकपणेंच इतर दुकानांत जात नाहीं, त्यामुळें विक्रीहि वाढते. आपल्या येथें इतक्या तऱ्हेचा माल विकणारें दुकान ही कल्पनाच नाहीं व दुकानांत अशा सर्व सोयी असण्याची कल्पना तर नाहींच नाहीं.

ता. १२-६-२८

आज सकाळीं विक्टोरिया म्यूझियमची शाखा इंडियन म्यूझियम आहे तें पहावयास गेलों होतों. हें म्यूझियम लहान आहे तरी संग्रह चांगला आहे. टिपू सुलतानानें हारमोनियम करविलेला मजेदार आहे. एका इंग्रज शिपायास म्हैसूरचा वाघ फाडून खात आहे अशा आकृतीची पेटी आहे व त्यांत स्वर बसविलेले आहेत.

तेथून मी वेस्टमिन्स्टर ॲबे पहावयास गेलों. ॲबे भव्य आहे. येथेंदि थोर थोर पुरुषांचीं थडगीं किंवा पुरलेल्या जागांवर तक्त्या व स्मारकें आहेत. एकंदर इमारतीच्या कोपऱ्याकोपऱ्यांतूनसुद्धां इंग्लंडच्या मोठे-पणाची साक्ष आहे.

ता. १३–६–१९२८

आज दुपारीं आल्बर्ट म्यूझियमचा राहिलेला भाग पहावयास गेलों. म्यूझियमची लायब्ररी उत्तमपैकीं आहे. फक्त रेफरन्स लायब्ररी आहे. या म्यूझियमवर सरकार दरवर्षी १,३५००० पौंड खर्च करतें. सामान्य शिक्षणासाटीं पैसा कसा पाण्यासारखा ओतला जात आहे हें यावरून स्पष्ट दिसेल. याशिवाय इतर म्यूझियमवर व प्रत्यक्ष शिक्षणापायीं लाखो–कोटयवधी पौंड खर्च होतात ते वेगळे.

ता. १४–६–१९२८

आज पार्लमेंट–हाउस ऑफ् लॉर्ड्स्–च्या बैठकीस पहावयास जावयाचें होतें. यासाटीं आगाऊ परवानगी मागावी लागते. प्रेक्षकांचे (Strangers चे) गॅलरींत परवानगी मिळण्यासाठीं लॉर्डांच्या सभेच्या कोणातरी सभासदाची ओळख–हमी–द्यावी लागते. मी इंडिया ऑफिसच्या पार्लमेंटरी अंडर सेक्रेटरीस पत्र लिहून ‘ मी कोण, येथें थोडया दिवसांसाठीं आलों आहे, कॉमन्सचे बैठकीस हजर राहाण्याची इच्छा आहे, परवानगी मिळाल्यास आभारी होईन, लॉर्डांचे बैठकीसहि हजर राहाण्याची इच्छा आहे ’ अशा मतलबाचा मजकूर कळविला होता. त्याबद्दल कॉमन्स सभेच्या बैठकीची उद्यांचे तारखेची परवानगी आली व लॉर्डांच्या सभेच्या बाबत माझी इच्छा लॉर्ड बर्कनहेड् (हल्लींचे भारतमंत्री) यांचे प्रायव्हेट सेक्रेटरीस कळविल्याचें लिहिलें. त्याच दिवशीं तीहि परवानगी आली. ही परवानगी पार्लमेंटच्या इमारतींत सभागृहाच्या बाहेर सार्जेट ॲट आर्म्सचें ऑफिस असतें, तेथें द्यावयाची व मग सभागृहाची परवानगी त्या दिवसापुरती

तो अम्मलदार देतो. परवानगी मिळते ती बिनशर्त नसते. सार्जंट ॲट आर्म्सला असाच हुकूम असतो कीं जागा असली तर पास द्यावा. आज कॉमन्स सभेंत पुष्कळ गर्दी होती, पण लॉर्डांच्यांत कांहीं विशेष काम नसल्यामुळें जागेची अडचण होण्याचा संभवच नव्हता.

लॉर्डांची बैठक दुपारीं ३॥। च्या पुढें असल्याचें कळले. तेव्हां वेळाचा उपयोग इतर ठिकाणें पहाण्यासाठीं केला. प्रथम लॉर्डांचे सभागृहांत उच्चतम अपील कोर्ट बसलें होतें व एक अपील चालू होतें. तेथें सुमारें अर्धा तास ऐकावयास बसलों. सभागृह यामुळें अनायासेंच अगोदर पहावयास मिळालें.

नंतर व्हाइट हॉलमध्यें, डाउनिंग स्ट्रीटवर प्रिव्ही कौन्सिलची बैठक असते तेथें जाऊन सुमारें अर्धा तास एका अपिलाचे काम होतें तें ऐकत बसलों.

दोन्ही ठिकाणीं काम चालविण्याची पद्धत फारच उत्तम वाटली. जज्ज म्हणजे कोणीतरी विंशिष्ट व जाडजूड प्राणी असे नसून जज्ज व वकील हे जसे कांहीं चर्चाच करीत आहेत अशा रीतीनें व अशा आवाजांत काम चाललें होतें. जज्ज संथपणें ऐकत होते व सर्व प्रकारांत अत्यंत साधेपणाबरोबरच गांभीर्य होतें.

हाउस ऑफ् लॉर्ड्सचे बैठकीची वेळ झाल्यावर तेथें गेलों. अध्यक्षांचे हुकुमास प्रत्येकजण फारच मान देत असे. चर्चेस विशेष महत्त्वाचे विषय नसल्यामुळें सर्व काम कंठाळी ठरावाप्रमाणें पास होत होतें.

आज हॉटेल सेसिलमध्यें इंडियन सोशल क्लबाची वार्षिक मेजवानी होती. रा. नानासाहेब माळवंकर या क्लबाचे सेक्रेटरी आहेत, व आम्ही सर्व त्यांचे सांगण्यावरून सभासद झालों होतों. सर मंचरजी अध्यक्ष आहेत. या मेजवानीस देशी पोषाखांतच जावयाचें असा निश्चय होता. इतरांनींहि याचप्रमाणें यावें अशी आमची फारशी अपेक्षा नसली तरी इच्छा होती. मी खादीची सुरवार, अचकन व फेटा घालून गेलों होतों. रा. दिवान खादी पेहेरावांतच होते. दोन मुसलमान टर्किश फेझ घालून आले होते. बायका मंडळी सर्व देशी पोषाखांतच होती. एकंदर १८०।१८५

मंडळींत १५।२० खेरीज बाकी सर्व मंडळी इंग्रजी तऱ्हेच्या व बहुत करून इंग्रजी कापडाच्या इव्हिनिंग सूटमध्यें सजलेली होती!! आम्हांला तर या देखाव्यानें धक्का बसल्यासारखें झालें. हिंदित्वाला आपण इतके पारखे झालों आहोंत काय? युरोपियन समाजांत जावयाचें असतें तर कांहीं सबब तरी होती; पण जेथें सर्व हिंदी समाज येणार तेथेंहि इंग्रजी जेवणाचा पोषाख कशाला? मला तर फारच खेद व निराशा वाटली. इतकीं वर्षें हिंदी लोक येथें येत आहेत व इतके लोक येत आहेत, तरी पण आमचा पेहेरवश लंडनसारख्या शहरांतहि लोकांस परिचित नसावा किंवा परिचित करण्याचें धैर्य किंवा जाणीवहि आमच्यांत नसावी यापेक्षां जास्त दुर्दैव राष्ट्रीयत्वाचे दृष्टीनें कोणतें? असो. जेवणांत हिंदी पद्धतीचे पदार्थ होते. इतर सर्व टापटीप चांगलीच होती. सर्व व्यवस्था रा. मावळंकरांनींच केली होती.

जेवणानंतर सर मंचरजी, शफी, जस्टिस् माडगांवकर, श्रीनिवास अय्यंगार वगैरे मंडळींचीं कंठाळी भाषणें झालीं.

जेवणानंतर टोस्ट घेण्याचें काम सुरूं झालें. प्रथम राजेसाहेबांच्या नांवचा व मग इतर. दारूच्या ग्लासांत दारू किंवा पाणी (दारू न पिणारे पाणी घेतात) घेऊन उभे राहून प्यावयाचें. मला हिंदी जेवणांत तर हें खूळच वाटतें. इंग्रज लोक सर्व दारू पिणारे व जेवणांत तो अतिशय महत्त्वाचा व खर्चाचा भाग. तेव्हां दारू पितांना ते लोक प्रथम आपल्या राजाच्या व मग इतरांच्या अभीष्टचिंतनासाठीं उभे राहून त्यांच्या जेवणांतील उत्तम पेय पितात. अभीष्टचिंतनाचा तो मार्ग त्यांच्या चालीरीतीस उत्तम असेल. पण त्याचेंहि अनुकरण हिंदी जेवणांत कशाला? आम्ही चमच्याकांट्यानें जेवलों तेवढें हवामानाप्रमाणें पुरें होतें. पण अंध अनुकरण करणारांस काय सुचणार? चार पांच टोस्ट झाले. सर्वजण पाणी ओतओतून उभे राहून पीत होते. मी तसें कांहीं एक केलें नाहीं. या खुळाचें मला जितकें हंसूं येत होतें तितकेंच वाईटहि वाटत होतें. कदाचित् इतर जसे मला खुळे वाटले तसा मी त्यांस जहाल किंवा 'चक्रम्'हि वाटलों असेन.

ता. १५-६-२८

आज हाउस् ऑफ् कॉमन्सचे बैठकीस जावयाचें होते. पास मिळविण्याचा विधि झालेवर मेम्बर्स गॅलरींत जाऊन बसलों. स्पीकरचे समोर जागा होती. हा दिवाणखानाहि हाउस ऑफ् लॉर्ड्सूसारखाच, पण त्याहून मोठा. सुमारें तासभर बसून निघालों.

तेथून सेंट् पॉल्स् कॅथेड्रल् पहावयास गेलों. हें देऊळ फार जुनें व प्रख्यात आहे. मोटमोठ्या सार्वजनिक प्रार्थना येथें होतात. याचा घुमट फार मोठा व उंच आहे. या घुमटांत वाटोळी गॅलरी आहे तेथें वाटेल त्या ठिकाणचा ध्वनि स्पष्ट ऐकू येतो.

ता. १६-६-२८

कॅक्स्टन हॉलमध्यें ५ वाजतां काँग्रेस कमिटी स्थापनेसाठीं श्री. श्रीनिवास अय्यंगार यांचे अध्यक्षतेखालीं सभा होती म्हणून जावयास निघालों. आम्ही ५। वाजतां पोचलों. काम सुरू झालें होतें. मामुली भाषणें, ठराव झाले. कॉंग्रेस कमिटी लंडनमध्यें कशाला हें अजून मला गूढच आहे. येथील लोकमतावर स्वराज्याचा जर आधार ठेवावयाचा तर तें अशक्य आहे. येथील लोकांनीं आमचें म्हणणें ऐकण्यास कां वेळ खर्चावा? हिंदुस्थानांत परिणामकारक चळवळ असली तर आपोआप येथें लक्ष्य देतातच. रा. अय्यंगार यांनीं बोलण्याचा मला आग्रह केला. मी कांकूं करतां करतां शेवटीं उठलों. येथील हिंदी लोकांत हिंदीत्व-हिंदी पेहेरवेश, हिंदी चालीरीती, भाषा वगैरे कायम ठेवण्यासाठीं संस्थेची जरूर आहे. येथें येऊन फक्त स्त्रिया हिंदी राहातात. पुरुष साहेब बनतात. ही स्थिति पालटण्यासाठीं हिंदी संस्थेची जरूर आहे, अशा मतलबाचें मी बोललों. येथील हिंदी लोकांत हिंदीत्व दिसत नाहीं, हें माझें म्हणणें कांहीं मंडळीस पटलें व रुचलें नाहीं असें दिसलें. पण माझा त्याला इलाज नव्हता.

ता. १०-६-१९२८

आज रविवार असल्यामुळें आम्ही सर्वजण ब्रायटन नांवाच्या हवा खाण्याच्या शहरीं गेलों होतों. लंडनपासून सुमारें १०० मैल असावें. हजारों लोक आलेले होते. होड्या, लॉंच, आगबोटींतून फेऱ्या करून येण्याची सोय उत्तम. दोन बाजूला समुद्रांत आंत पूलवजा धक्के केले आहेत. त्यावर जाण्यास फी पडते. आंत मनोरंजनाचीं खूप साधनें आहेत. पुष्कळ खेळांचीं यंत्रें आहेत. प्रत्येकांत एक पेनी टाकावा म्हणजे गंमत दिसते किंवा खेळ खेळतां येतो.

धक्क्यावर फिरल्यावर मग समुद्रकांठीं फराळासाठीं सर्व बसलों. फराळा-साठीं बशा, रुमाल वगैरे सर्व कागदाचे होते. नेण्यास हलके व विसळण्या वगैरेची कटकट नाहीं. वापरले कीं फेकून द्यावयाचे; पण येथें इतकी गर्दी असतांहि कागद इतस्ततः फेकीत नव्हते; पण एकत्र करून ठिकठिकाणीं ठेवलेल्या तारेच्या टोपल्यांतून किंवा दगडाखालीं दाबून ठेवीत होते. त्यामुळें किनारा स्वच्छ होता.

चहा घेण्यासाठीं एका उपाहारगृहांत गेलों. तेथें पुष्कळ उपाहारगृहें अशीं आहेत कीं तेथें नाचण्याची सोय केलेली असते. मधून मधून तंतुवाद्याचे बॅंड. वाद्यें वाजविणारी मंडळी सर्व बायकाच. सर्वांचें पोषाख उत्तेजक नटवेपणाचे.

सर चिनुभाईकडील मुलांसाठीं ठेवलेली मास्तरीण मिस् विलीस व तिच्या ओळखीचा फ्रेचर नांवाचा तरुण मुलगा हे दोघे नाचावयास गेले. हा नाचाचा व त्याचे आनुषंगिक इतरहि एकंदर ऐषआरामाचा प्रचार इतका सार्वत्रिक दिसतो कीं पूर्वींच्या गतवैभव साम्राज्यांची हकि-कत जी आपण वाचतों किंवा ऐकतों तीच आपण पाहातों आहों कीं काय असा क्षणभर भास होतो. 'साधी राहाणी व उच्च विचार' हें ध्येय नाहींसें होत आहे व आढळूनच येत नाहीं असें म्हटल्यास अति-शयोक्ति नाहीं. या दृष्टीनें पाहातां इंग्लिश राष्ट्राच्या ऱ्हासाचीं यांत पूर्व चिन्हें दिसत आहेत. एकीकडे अत्यंत ऐषआराम तर दुसरीकडे अत्यंत

गरिबी. सोशियालिझम्, बोल्शेविझम् वगैरे प्रकार कसे येतात याचें आश्चर्य हें पाहातां वाटत नाहीं, पण न आल्यास आश्चर्य. एकंदर राहाणीकरणी अशा प्रकारची, इतकी खर्चिक व गरजा इतक्या वाढविलेल्या आहेत कीं या समाजास या रीतीनें जर राहाणें कायम ठेवावयाचें असेल तर जगाचे पाठीवर इतरांवर राज्य करून बाहेरून संपत्ति आणल्याशिवाय गत्यंतरच नाहीं. राहाणीकरणी बदलल्याशिवाय साम्राज्यतृष्णा आवरण्याची अथवा शांततेची भाषा मला तर शक्य वाटत नाहीं.

परत येतांना वाटेंत शेतकऱ्यांचीं घरें व गोठे पाहिले. गायी, कोंबडीं व डुकरें यांची जोपासना, स्वच्छता आपल्याकडीलपेक्षां जास्त असावी असें वाटलें नाहीं.

ता. १९-६-१९२८

आज शेट अंबालाल साराभाईना भेटण्यासाठीं गेलों होतों. श्रीमती अनसूयाबाईहि तेथेंच भेटल्या. लंडनमध्यें ईस्टएंडमध्यें मिस् मेरी ह्यू (Hughes) व मिस् लेस्टर या बाईंना भेटण्याची व गरीब वर्गात त्या काम करीत असतात तें पहाण्याची त्यांनीं शिफारस केली. तसेंच Women's Clinic (स्त्रियांचें उपचारगृहा) विषयींहि पत्ता दिला.

नंतर दोन वाजतां कुकचे हॅम्प्टन् कोर्टचे दूरनें जाणें असल्यानें कुकचे ऑफिसांत गेलों. तेथून बस शहराच्या निरनिराळ्या भागांतून किंग्स्टन् मार्गें हॅम्प्टन् कोर्ट राजवाड्याकडे जाते.

वाटेंत किंग्स्टन मुक्कामीं बस थांबवून ज्या ठिकाणीं ज्या शिलातलावर पूर्वीच्या सॅक्सन राजांस राज्याभिषेक होत असे ती जागा व ती शिला दाखविण्यांत आली. गांवांत मधोमध चौकांत तो दगड आहे व त्यावरून गांवास King's stone हें नांव प्राप्त झालें आहे. या दगडांत प्रेक्षणीय असें कांहींच नाहीं. पण त्याचा इतिहास व गतकालीन राजघराण्याशीं साहचर्य म्हणून ऐतिहासिक आठवणी ठेवण्याच्या ठिकाणांपैकीं तें एक आहे. "पूर्वस्मरण" ही वस्तु पदोपदीं इंग्रज लोकांनीं बाळगली आहे.

आपणहि तो कित्ता गिरवून पूर्वइतिहास संशोधन केला पाहिजे व हल्लींचा नाश होऊं नये अशी तजवीज केली पाहिजे. विद्यमान काल आणखी १०० वर्षांनीं ऐतिहासिकांतच जाणार हें विसरतां कामा नये. असो.

त्यानंतर हॅम्टन कोर्ट पॅलेसला पोंचलों. प्रथम हा कार्डिनल वूल्सेचा महाल होता. त्यानें तो पुढें राजाला नजर केला. राजवाड्यांतील निरनिराळे महाल वाटाड्यानें दाखविले. त्यांचें वर्णन करणें अशक्य आहे. वूल्सेची राजकीय बाबतींत विरोध करणाऱ्यांना भेटून नाहींसे करण्याची एक खोली होती ती त्यानें दाखविली. कित्येक मोठमोठे लोक येथें येऊन गडप झाले होते. राजवाड्यांत एक प्रार्थनामंदिर आहे. त्याशिवाय एक भुताटलेली खोली असल्याचीहि दंतकथा आहे.

ही बसची ट्रिप सुमारें ७ वाजतां संपली.

ता. २२-६-१९२८

तिसरे प्रहरीं आम्ही श्री. गुलाबचंद व मी टर्किश बाथ घ्यावयास गेलों. हें स्नान म्हणजे काय प्रकार असतो हें जाणण्याची मुख्य इच्छा. पुरुष व स्त्रिया यांचे स्नानाची वेगवेगळी व्यवस्था आहे.

या स्नानगृहांची सामान्य व्यवस्था येणेप्रमाणें असते: प्रथम पैसे भरले कीं लगेच आपल्या जवळच्या मौल्यवान् वस्तू—पैसे, घड्याळ, अंगठी वगैरे—एका कपाटांतील एका खणांत ठेवून त्याची किल्ली आपणाकडे देतात. नंतर जवळच्या खोलींत बूट काढावयाचे. हें काम तेथील मुलेंच करतात. चिरीमिरीची अपेक्षा असतेच. नंतर कपडे काढावयाच्या खोलींत जावयाचें. या अगदीं स्वतंत्र खोल्या नसतात, पण पडदे ठेवून पार्टिशन केलेल्या व एकेकांत चार कोच राहातील अशा असतात. प्रत्येकास एक कोच देण्यांत आला. बाजूच्या टेबलावर आम्ही आमचे सर्व कपडे काढून ठेवले. आम्हांस दोन दोन मोठे अंग पुसण्याचे रुमाल देण्यांत आले होते. त्यांपैकीं एक आम्ही कमरेभोंवतीं गुंडाळला व एक पाठीवरून घेतला. मग खालचे मजल्यावर उतरलों. वाटेंत लघवीची

व शौचाची सोय होतीच. येथें इतर लोकहि आंघोळीस येत होते. युरोपीयन लोकांमध्यें पुरुषांत आपापसांत नागवेपणाचा विशेष किंवा कांहींच विधिनिषेध वाटत नाहीं असें दिसलें. कांहींजणांनीं तर दिलेले रुमालहि कमरेभोंवतीं गुंडाळले नव्हते. आम्हांला त्यांचेमुळें नव्हे, पण आम्ही दोघे असल्यामुळें व अशा प्रकारास अपरिचित असल्यामुळें एक-मेकांची थोडी लाज वाटणें साहजिक होतें.

प्रथम एका उष्ण खोलींत आम्ही बसलों. बसावयास आरामखुर्च्या होत्या. पण आंत गेल्याबरोबर लगेच मला तर प्रथम गुदमरल्यासारखें झालें. परंतु कांहीं वेळानें ती अवस्था नाहींशी झाली. येथें पूर्ण घाम येईपर्यंत बसावयाचें. वाचावयास वर्तमानपत्रें, प्यावयास थंड पाणी वगैरे असतेंच. घाम चांगला आला असें वाटलें कीं स्नानास जावयाचें. स्नान घालणारे पुरुषच असतात. लहान मुलास ज्याप्रमाणें आडवें, उताणें, पालथें घालून आंघोळ घालतात त्याप्रमाणें आम्हांस आंघोळी घातल्या. पाणी गरम, कोमट, याप्रमाणें उष्णता उतरवीत चाललें होतें. साबू लावून, साधें याप्रमाणें आंघोळ करविली. दरम्यान शरीर मालीशहि केलें. यास सुमारें १५ ते २० मिनिटें झालीं. नंतर वाहात्या पाण्याचें स्नान शॉवर-बाथने करविलें. यांत खुबी अशी केली कीं ऊन्ह पाण्यानें स्नान सुरू होतें तें हळूहळू करतां करतां पाणी नकळत अगदीं बर्फासारखें गार झालें व त्यानें शेवटीं स्नान झालें. याची फारच मजा वाटली. हें आटोपल्या-बरोबर पलिकडच्याच बाजूला अंग पुसावयास जो स्नान घालतो तो येतो. तोच सर्व अंग पुसतो, व तो पंचा गुंडाळून वर यावयाचें, आणि जेथें कपडे काढले असतील त्या कोचावर एक स्वच्छ चादर, उशी वगैरेची पथारी करून देऊन त्यावर निजवून एक पलंगपोस गुरगटून पांघरवितो. आपणांस जें हवें तें चहा इत्यादि पेय येथें आणून देण्यांत येतें. वाटेल तेवढा वेळ येथें विश्रांतिस्तव पडून राहून मग कपडे करून जावयाचें.

ता. २३-६-२८

रात्रौ आल्बर्ट हॉलमध्यें 'हीया वाथा' नांवाचें नाटक पहावयास गेलों होतों. हीया वाथा हा अमेरिकन इंडियनांचा राजा असून ख्रिस्ती

मिशनरी लोकांच्या सहवासानें सुधारला व लोककल्याण त्यांच्या धर्माच्या अंगीकारानें झालें ही या नाटकांतील मुख्य गोष्ट. जगांतील इतर लोकांपेक्षां गोऱ्या लोकांचें श्रेष्ठत्व दाखविण्याचा हेतु मला यांत दिसला व त्यामुळें मला नाटकाच्या वस्तुविषयीं एक प्रकारची अरुचि वाटली. पण ती गोष्ट बाजूला ठेवली तर नाटक एकंदर बरें झाले असें म्हणावयास हरकत नाहीं. या नाटकाविषयीं मुख्य गोष्ट ध्यानांत घ्यावयाची ती ही कीं हें नाटक धंदेदारी लोकांनीं केलेलें नव्हतें. नाटक व गायनवादन-कलेचा अभ्यास वाढविण्यासाठीं व उत्तेजनासाठीं लंडनमध्यें रॉयल कोरल सोसायटी नांवाची संस्था आहे तिच्या सभासदांनीं तें केलें होते. सुमारें २५० वर स्त्रीपुरुषांनीं निरनिराळे वेष घेऊन यांत काम केलें होतें. सोसायटीचें काम करणारे सभासद कोणी कारकून, कोणी नोकर, कोणी लहान व्यापारी असे होते. इंग्रज प्रजेची ललितकलांविषयींची ही प्रीति अनुकरणीय नाहीं असें कोण म्हणेल ?

## ता. २४-६-२८

प्रथम पटण्याचे श्री. राजेंद्रबाबू येथें आले आहेत ( प्रिव्ही कौन्सिल डुमरॉब केससाठीं ) त्यांचेकडे भेटावयास गेलों. इंग्लंडांत-युरोपांत-येणाऱ्या देशी लोकांनीं आपला पेहेरवेश न ठेवल्यामुळें इतकीं वर्षे आपली मंडळी पश्चिमेंत येत असूनहि येथील मंडळी आपल्या पोषाखास परिचित नाहींत, येथील हिंदी मंडळींत हिंदीत्व नाहीं वगैरे त्यांचे व माझे विचार तंतोतंत जुळले. त्यांचा पेहेरवेश सर्व जवळ जवळ माझ्याप्रमाणेंच व देशी कापडाचा होता.

## ता. २५-६-२८

लंडन शहरांतील ईस्ट एन्ड नांवाचा भाग आहे त्यांत गरीब लोकांची वस्ती असून लंडनचा श्रीमंत व फॅशनेबल वर्ग वेस्ट एण्ड मध्यें राहात असतो. ईस्ट एंड मध्यें खराब, हलकट, चोर, बदमाश, वाईट चालीचे

असेहि लोक राहातात. ईस्ट एन्ड बघण्याची आमची फारच इच्छा होती. पण तेथें जाणें सुरक्षित नाहीं असें आम्हांस सांगण्यांत येत होतें. आजचे अनुभवानें तर ही भीति खोटी असल्याचें शाबीतच झालें. पण येथें पहाण्यासारख्या संस्था—विशेषतः गरीब लोकांत करण्यांत येत असलेल्या सामाजिक कामाच्या व शिक्षणाच्या संस्था—पहाण्याची श्री. अनसूयाबाईंची सल्ला होती. त्या स्वतः त्या संस्था पाहून आल्या होत्या व कोणास लिहावें तेंहि त्यांनीं कळविलें होतें. त्याप्रमाणें मी आधींच मिस् मेरी ह्यू व मिस् लेस्टर यांना आगाऊ पत्रें लिहून वेळ व दिवस नक्की केले होते. त्याप्रमाणें आज मेरी मिस् ह्यू यांस भेटावयाचें होतें, आणि त्या व मिस् लेस्टर आम्हांस निरनिराळ्या ठिकाणीं घेऊन जाणार होत्या. या दोन्ही बाया सुखी व संस्कारी कुटुंबांतील आहेत. मिस् ह्यू यांचें वय ६०—६५ व मिस् लेस्टरबाई सुमारें ४० वर्षे वयाच्या असाव्या. 'टॉम ब्राउन्स स्कूल डेज्' या प्रसिद्ध पुस्तकाचे लेखक ते ह्यूबाईंचे वडील. मिस् लेस्टरबाई दोन वर्षांपूर्वी हिंदुस्थानांत येऊन महिनाभर सत्याग्रहाश्रमांत राहून गेलेल्या होत्या. दोघींनींहि आपला पैसा व वेळ गरिबांच्या दुःखनिवारणार्थ चालणाऱ्या कामांत अर्पण केलेला असून स्वतःसाठीं गरिबीचें व्रत घेतलेलें आहे. परमेश्वरानें आपणांस जें कांहीं दिलें आहे तें आपलें एकट्याचें नसून आपल्या सर्व बंधुभगिनींच्या भल्यासाठीं त्याचा उपयोग आपण केला पाहिजे असें त्यांचें मत असून दोघीहि "बोले तैसा चाले" अशा कोटींतील आहेत. दोघीहि म० गांधींच्या भक्त. विश्वबंधुत्वामुळें संकुचित राष्ट्रीयत्व त्यांच्यांत नव्हतें. त्यामुळें इंग्रज, हिंदी हा भेद त्यांस माहीतच नाहीं म्हटलें तरी चालेल. अशा दोन बायांचे सोबतीनें आम्ही आज ईस्ट एन्ड—लोक व संस्था—पाहिलें.

ब्रॉम्ले स्टेशनवर बरोबर ११ वाजतां भेटावयाचें असें मिस् ह्यू यांचेशीं ठरलें होतें, पण कांहीं गैरसमजुतीमुळें ह्यूबाई स्टेशनवर येऊन परत गेल्या होत्या. आम्ही मग तसेंच स्टेपने इन्स्टिटयूटमध्यें गेलों व तपास करविला. परंतु पत्ता लागेना. दरम्यान संस्था पहाण्यास सुरुवात

केली. इंग्लंडांतील पुअर हाउसेस्पैकीं हें एक होतें. निराश्रित व निराधार अशा गरीब, म्हातारे, अशक्त, अधू, पंगू अशा लोकांसाठीं हें गृह आहे. अदमासें ६०० लोक यात होते. असें गृह प्रत्येक संस्थेतर्फे स्थानिक करांचे उत्पन्नांतून चालविण्यांत येतें. येथें खाणेंपिणें, कपडेलत्ते वगैरे अमुक ठरलेल्या किमान प्रमाणांत मिळत असतें. स्वतंत्रतेवर येथें गदा येत असल्यामुळें, स्वाभाविक मानभंगाच्या भावनेमुळें लोक अगदीं नाईलाज होईपावेतों येथें येत नाहींत. स्त्रिया व पुरुष यांचेकरितां निरनिराळी स्वतंत्र जागा आहे. स्नानाच्या वगैरे सोयी आहेत. जेवण-खाण, बिछाने वगैरे सर्व कांहीं चांगलें आहे. इंग्लंडांतील अगदीं गरीब वर्गातल्या लोकांचे राहाणीपेक्षांहि येथील राहाणी जास्त सुखासमाधानाची आहे, सोयीची आहे असें तेथील अधिकारी सांगत होते. आपल्याकडील मध्यम वर्गापेक्षांहि जास्त चांगल्या स्थितींत लोक येथें राहातात. येथील आंतलें सर्व काम—स्वयंपाक व वाढणें खेरीज—येथील रहिवाशांकडूनच करवून घेण्यांत येतें.

एकंदर व्यवस्था पहात पहात लहान मुलांच्या विभागांत गेलों. तीन वर्षांचे आंतील मुलें येथें असतात. त्यापुढें दुसऱ्या अनाथ बालकाश्रमांत पाठवितात. गरीब लोकांपैकीं ज्यांस घरीं मुलांची जोपासना करणें शक्य नसेल त्यांना येथें मुलें ठेवण्यास मोकळीक असते. आम्ही येथें आलों तोंपर्यंत मिस् ह्यूबाई तेथें येऊन गरीब वर्गाचे मुलांना झाडाखालीं अंग-णांत खेळवीत बसल्या होत्या. जणूं स्वतःच्याच नातवंडांस खेळवीत आहे अशा प्रेमानें बाई मुलांस खेळवीत होत्या. मुलांस न्हाऊं, जेऊं घालण्याची वगैरे सर्व व्यवस्था उत्तम होती. प्रत्येकाचा वेगळा रुमाल वगैरे होता. जेवावयास लहानसें टेबल व सभोंवार चिमुकल्या खुर्च्या. त्यांवर खावयास बसलेलीं मुलें हात उंच करून आम्हांस 'गुड बाय्' करीत होतीं. तो देखावा फारच गोड व मजेदार होता.

मुलांचा विभाग पाहून होईपावेतों मोठ्या मंडळींची भोजनाची वेळ झाली. तेव्हां 'मंडळी भोजनास बसलेली पहाण्यास चला' असें ह्यू बाईनीं सांगितल्यावरून आम्ही भोजनगृहांत गेलों. तेथें स्त्री व पुरुष

मिळून सुमारें ५००–६०० मंडळी बसलेली होती. सर्वांस सलाम करीत करीत व 'गुड डे' म्हणत म्हणत आम्ही आंतून फिरलों. नंतर ह्यू-बाईनीं गौरवपूर्वक आमची ओळख करून देऊन सांगितलें कीं, "हिंदुस्थानाविषयीं येथील स्वार्थी वर्तमानपत्रें वाटेल तें छापतात, त्यावर भरंवसा ठेवूं नका. महात्मा गांधी हेच खरे महात्मा पुरुष आहेत. हिंदुस्थानची प्रजा आपणांस भावंडांप्रमाणें आहे. त्यांच्या मनीषा पूर्ण होवो अशी आपण सर्वांनीं परमेश्वराची प्रार्थना केली पाहिजे." याप्रमाणें सांगून म. गांधींविषयीं चार शब्द सांगण्यास आम्हांस आग्रह केला. मला सार्वजनिक बोलणें फारच कठीण वाटतें. मी रा. षण्मुखम् चेट्टी यांस आग्रह केला. ते कांहीं केल्या बोलेचनात. तेव्हां मीच मग चार वेडेवांकडे शब्द सांगितले. "गांधींस आम्ही महात्मा म्हणतों. त्यांचा संदेश सत्य, अहिंसा व प्रीति आहे. सर्व जगांत विश्वबंधुत्वाचा प्रसार या तीन गोष्टींशिवाय होणें नाहीं. आम्हांस तुमच्याविषयीं बंधुभावना आहे. जो कांहीं विरोध आहे तो साम्राज्यवादी लोकांशीं. सर्वांनीं समतेनें व सुखानें रहावें असेंच आमचेंहि मागणें आहे." वगैरे वगैरे. या सुमारास मिस् लेस्टरबाई येऊन आमच्यांत सामील झाल्या.

कॅझुअल वॉर्ड ही इंग्लंडांतील दुसरी एक नमुनेदार पद्धति आहे. येथें शिस्त जेलसारखी. कोणाहि माणसास येथें आश्रय व खाणें मिळण्याची सोय आहे, पण तीन दिवसांपेक्षां जास्त एके ठिकाणीं एका महिन्यांत राहातां येत नाहीं. काम मिळतच नसेल तर सर्टिफिकेट घेऊन पुअर हाऊसमध्यें जावें. येथें खाणें फारच बेताचें व काम कडक. परंतु इतकें असूनहि तीन दिवसांनीं पुनः स्वातंत्र्य मिळतें म्हणून कित्येक लोक तीन तीन दिवसांनीं एका वॉर्डांतून दुसऱ्या वॉर्डांत याप्रमाणें फिरत फिरत वर्षांनुवर्षें कॅझुअल वॉर्डांत काढतात.

कॅझुअल वॉर्ड पाहिल्यावर आम्ही एका उपाहारगृहांत लंचसाठीं गेलों. मूळ हें गृह दारूविक्रीचें होतें, पण हल्लीं तेथें कोणत्याहि तऱ्हेचें मादक पेय विकण्यांत येत नसून केवळ गरीब वर्गासाठीं स्वच्छ व चांगल्या वस्तू

स्वस्त किंमतींत विकण्यासाठीं चालविण्यांत येत आहे. ह्यूबाईनींच आम्हांस तेथें नेलें. या भागांत फिरतांना आमच्याबरोबर हिंदी तऱ्हेचा पोषाख केलेल्या बाया, माझाहि पोषाख हिंदी, व मिस् ह्यू व मिस् लेस्टर या लोकप्रिय व्यक्ती, त्यामुळें मुलें, बाया व लोक यांच्यामध्यें स्वाभाविकच उत्सुकता व कुतूहल आमच्याविषयीं होतें. कांहीं ममत्वहि वाटे. सर्व आम्हांस सलाम करीत. आम्ही त्यांस गुडबाय, सलाम करीत होतों. मुलांची टोळी तर आमच्या आजूबाजूला होतीच.

उपाहारगृहांत ह्यूबाईनीं लंचची व्यवस्था केली. चहा, ब्रेड, बटर व फळे. सुरुवातीचे पूर्वी बाईनीं फारच भाविकपणें व गद्‌गदलेल्या अंतःकरणानें परमेश्वराची प्रार्थना डोळे मिटून शांत चित्तानें केली व महात्मा गांधींचें अभीष्ट चिंतन करून उपाहारास आरंभ केला. आम्हांस हा उपाहार फारच आदर्श व अत्यंत गोड वाटला. उपाहार आटोपून ह्यूबाईनीं आम्हांस लेस्टरबाईचे ताब्यांत सोपवून आमचा निरोप घेतला व आम्ही मिस् लेस्टर यांचे "मुलांचे शाळे"कडे गेलों. येथें आम्हांस उद्यां जावयाचेंच आहे. पण जातां जातां डोकावून जाण्यासाठीं वळलों.

लेस्टरबाईंची मुलांची शाळा गरीब वर्गाच्या लहान मुलांसाठीं आहे. या शाळेंत काम करणारी मंडळी प्रेमानें, स्वार्थत्यागानें काम करतात. आम्ही गेलों त्यावेळीं मुलांस दुपारची सुटी असून त्या सुटींत मुलांना गच्चीवर सावलींत निजविण्यांत आलें होतें. ओळबंद लहान लहान पलंगड्यांवर निजलेलीं ३ ते ७ वर्षांचीं बाळें पाहून मोटी मौज वाटली. एक मूल जागें होतें पण स्वस्थ पडून होतें. या शिस्तीबद्दलहि आदर वाटला.

पुढें आम्हांस आर्यभवनाच्या समारंभास जावयाचें असल्यामुळें आम्ही एकमेकांचा प्रेमळ निरोप घेतला.

लंडनमध्यें येणाऱ्या हिंदु लोकांस आपल्या रीतिरिवाजांप्रमाणें खाण्यापिण्याची सोय करून द्यावी, एक देऊळहि असावें या उद्देशानें बिर्ला, खैतान वगैरे मंडळींच्या परिश्रमानें व औदार्यानें हें गृह उघडलें गेलें. याची पूर्वतयारी करण्यास रा. नानासाहेब मावळंकर व त्यांचें कुटुंब यांची खूप मदत व मेहेनत होती हें साभिमान येथें नमूद करणें

स्वाभाविक आहे. गृह खुलें जाहीर करण्याचा विधि सर अतुल चटर्जी यांचे हस्तें झाला. समारंभास डॉ. परांजपे, राजेन्द्रबाबू, पोलक वगैरे मंडळी आली होती. या समारंभास रा. गुलाबचंद धोतर नेसून आले होते.

रात्रौ शेठ कस्तुरभाई व मी हाइड पार्कमध्यें फेरफटका करून आलों. प्रणयी युग्मांची जाहीर रीतीनें बसण्याची व वागण्याची तऱ्हा आम्हांस तरी आक्षेपार्ह वाटली व पोलीसनें ती बंद करण्यांत कांहीं एक चूक नाहीं असें आमचें मत झालें.

ता. २६–६–२८

काल ठरल्याप्रमाणें आज सकाळीं ईस्ट एन्ड ब्रॉम्ले स्टेशनवर गेलों. मिस् लेस्टर आल्या होत्याच. आम्ही प्रथम किंग्स्ले हॉल पहावयास गेलों. गरीब लोकांस वाईट संवयीपासून परावृत्त करण्यासाठीं त्यांना थोडक्या खर्चांत शुद्ध आनंद मिळेल अशी क्रीडा–करमणूक व उपाहारगृहें करण्याची जरूर भासल्याने तसा उपक्रम लेस्टरबाईनीं केला आहे. या कार्यांस त्यांच्या वडिलांनीं आपल्या किंग्स्ले नांवाच्या बंधूच्या स्मरणार्थ तीन हजार पौंड दिले व म्हणून 'किंग्स्ले हॉल' नांवानें या गृहाचा उपक्रम झाला आहे.

लेस्टरबाईनीं सर्व इमारत स्वतः आमच्याबरोबर फिरून आम्हांस दाखविली. प्रार्थनामंदिर, क्रीडाभुवन वगैरे व्यवस्था व शेवटीं गच्चीच्या मजल्यावर कार्यकर्त्यांसाठीं रहाण्याच्या खोल्या. या अगदीं लहानांत लहान व साध्या होत्या. प्रत्येक कार्यकर्त्यानें गरिबीचें व्रत अंगीकारलें असल्यामुळें राहाणीकरणी वगैरे अगदीं साधी व कमालीची स्वस्तपणाची असली पाहिजे असा कटाक्ष. एका आठवड्याचे ३० शिलिंगांत सर्व कांहीं करणें म्हणजे हिंदुस्थानांत दरमहा माणशीं सुमारें ८–१० रुपयांत चालविण्यासारखेंच आहे. मिस् लेस्टर व तिचे सहकारी स्वतःला पैसे मिळविणें शक्य असूनहि इतक्या थोड्या खर्चांत राहात आहेत. ज्या वर्गांत काम करावयाचें त्यांचेइतकी गरीबीची राहाणी असलीच पाहिजे.

त्याशिवाय त्यांच्यांत मिसळून त्यांचीं सुखदुःखें कळावयास व स्थिति सुधारावयास उत्तम मार्ग नाहीं असें त्यांचें मत आहे. मलाहि तें खरें वाटतें. $

नंतर आम्ही मुलांची शाळा पहावयास गेलों. येथें सर्व मुलें ७–८ वर्षांच्या आंतील वयाचीं होतीं. आज निम्म्या मुलांना लंडन शहराबाहेर एका खेड्यांत आठदहा दिवस राहाण्यासाठीं पाठविण्यांत येणार होतें, त्याची गडबड उडून राहिली होती. मिस् लेस्टरबाईची एका गांवीं इस्टेट आहे. तेथें लहानसें घर आहे. तेथेंच हीं सर्व मुलें राहावयाचीं होतीं. बरोबर शाळेंतील दोघी शिक्षकिणी जात होत्या. जाणाऱ्या मुलांस भेटावयास त्यांच्या आया आल्या होत्या व प्रत्येक मुलास त्याच्या सामानाचें पुडकें बांधून दिलें होतें. प्रत्येकानें स्वतःचें पुडकें स्वतः सांभाळावयाचें. मुलें एका बसमध्यें बसून जावयाचीं होतीं. आम्हीहि तेथपावेतों गेलों व मुलांच्या आयांनीं व आम्ही सर्वांनीं मुलांना 'गुड् बाय' केला. मुलांनींहि आनंदानें आपले बुटके बुटके हात हालवीत गुडबाय् केला. शिक्षणाची ही तऱ्हा मला फारच अनुकरणीय वाटली. लहानपणींच मुलांस शहराबाहेरील देशाचें, शेतीभातीचें अनायासें ज्ञान होऊन शिवाय मुलें दूधखुळीं होण्याचा संभव राहात नाहीं. स्वावलंबन शिकतात व हिंमतहि येते. आईबापांसहि मुलें दूरवर पाठविण्यास दिक्कत वाटत नाहीं. त्यामुळें घरकोंबडेपणा व गबाळेपणा येत नाहीं, मुलें फाजील लाडावत नाहींत व जगांत स्वतःच्या पायावर उभे राहाण्यासाटीं हरहमेश पुढें जो झगडा मोठेपणीं करावा लागतो त्याचें बाळकडू लहानपणींच मिळतें.

नंतर आम्ही ईस्ट एण्डमध्यें राहाणाऱ्या गरीब लोकांचीं घरें पाहाण्यास गेलों. सर्वजणांनीं बरोबर जाणें योग्य होणार नाहीं म्हणून आम्ही

---

$ महात्माजी १९३१ सालीं राऊंड टेबल परिषदेकरितां इंग्लंडला गेले असतां लंडन येथें त्यांचा मुक्काम मिस् लेस्टर यांच्या याच 'किंग्स्ले हॉल'मध्यें होता.

दोन गट केले. आम्ही सुमारें ७–८ निरनिराळीं घरें आंत जाऊन पाहिलीं. रहिवाशांशीं पोटभर बोललों, व शक्य ती माहिती मिळविली. इंग्लंडमध्यें– त्यांतूनहि लंडनमध्यें–गरिबीची इतकी निकृष्टावस्था असेल अशी आम्हांस स्वप्नींहि कल्पना नव्हती. राहाणीकरणीच्या गरजा येथें आपल्यापेक्षां जास्त. संवयीमुळें व सामाजिक कल्पनांमुळें कित्येक निरुपयोगी वस्तू अत्यंत आवश्यक समजल्या जातात. उदा० पियानो, ग्रामोफोन, बाबा-गाडी, फर्नीचरचे कांहीं प्रकार वगैरे वगैरे. जीवनमान याप्रमाणें जास्त गरजांचें झाल्यामुळें गरिबांना त्रास अधिक. राहावयास जागा थोडी, व त्यांतच सामानाची गर्दी. सुमारें १२×१५ च्या खोलींत नवराबायको व ४–५ मुलें इतक्यांचा समावेश. हवामानामुळें व राहाणीच्या रीति-रिवाजामुळें आपल्याप्रमाणें बाहेरची जागा बसण्याउठण्यास किंवा निजण्यास वापरतां येत नाहीं. एकाच खोलींत स्वयंपाक, निजणें, बसणेंउठणें वगैरे सर्व कांहीं. आंघोळीची सोय नाहीं. कांहीं ठिकाणीं तर जागेच्या अभावा-मुळें घरांतील मंडळीस निजण्यासाठीं पाळ्या कराव्या लागतात असें आम्हांस सांगण्यांत आलें. किती ही निकृष्टावस्था ! हिंदुस्थानात गरिबीचा असा प्रकार नाहीं. निदान हवामानामुळें गरजा कमी व जागाहि त्या मानानें ऐसपैस. झोपेसाठींहि पाळ्या अशी स्थिति आपल्याकडे नाहीं. येथें कुटुंबास साधारण २५–३० शिलिंग आठवड्याची प्राप्ति असते व तेवढ्यावर एकंदर गुजारा करावा लागतो. त्यामुळें घाणेरडेपणाहि फार. लंडनच्या ' वेस्ट एण्ड ' भागावरून इंग्लंड स्वर्गीय वाटलें तर या भागा-वरून जिवंत यमपुरी वाटल्यास आश्चर्य नाहीं. येथील लोकांस इंग्लंडच्या स्वराज्याचा अथवा साम्राज्याचा कांहींच अर्थ नाहीं. अशा लहान बिऱ्हाडांचेंहि भाडें फार, उंदीर व घुशी यांचा अतोनात त्रास. एक बाई तर घुशींच्या भीतीमुळें आपल्या लहान मुलांना रात्रौ उशीरांपावेतों खेळ-वीत ठेवते. कारण त्यांच्या आवाजानें घुशी येणार नाहींत. तिचा बिचा-रीचा तरी काय दोष ?

घरें पहात फिरत असतांना आम्हांला पाहून लोक–स्त्रीपुरुष गोळा होत होते. एके जागीं आम्ही मुद्दाम उभे राहून सर्वांशीं बोललों. त्यांना

मोठा आनंद झाला. "आम्ही कष्ट करतों आणि वेस्ट एण्डचे लोक आमच्या रक्तावर चैन मारतात." "आमच्या करानें स्वतःच्या स्वार्थासाठीं श्रीमंत लोक लढाया करतात"; हा त्यांच्या तक्रारींचा मुख्य मुद्दा. या सर्व वर्गास हिंदुस्थानाविषयीं बंधुभाव व आदर वाटतो. स्वाभाविकच आहे. स्वतः दलित वर्गापैकींच असल्यामुळें ते साम्राज्यविरोधी आहेत. आमचा पेहेराव व विशेषेंकरून लीलाबेनची साडी पाहून त्यांना विशेष कौतुक वाटत होतें.

नंतर आम्ही मिस् लेस्टर यांच्या शाळेंत गेलों. आम्ही परत जावयाचे वेळीं मुलांची दुपारच्या जेवणाची वेळ झाली होती. जेवणाची मोठी मौज होती. एका बाईच्या देखरेखीखालीं वाढण्याचें वगैरे सर्व काम दोन दोन मुलें पाळीपाळीनें करीत होतीं. हीं मुलें आपलें काम चोख व ऐटबाज रीतीनें करीत होतीं. हेंहि एक प्रकारचें शिक्षणच.

तेथून पॉप्लर बरोच्या कपडे धुण्याच्या कारखान्याकडे गेलो. गरिबांना स्वच्छ कपडे मिळावे या हेतूनें ही संस्था आहे. याचे दर फार स्वस्त. एका कुटुंबाचे कपडे फक्त १ शिलिंगास धुऊन मिळतात. मग कितीहि कपडे असोत; आणि सर्व कपडे धुऊन, वाळवून, इस्त्री करून दोन तासांत मिळतात. बदलावयास पुरेसे कपडे नसल्यानें गरीब वर्गास कित्येक वेळां घाणेरडे राहाण्याचा प्रसंग येतो, म्हणून ही मुद्दाम व्यवस्था आहे. सर्व काम यंत्रानें होतें व कपडे चांगले साफ होतात. पॉप्लर बरोमध्यें ४० सभासदांपैकीं ३६ समाजवादी असल्यामुळें त्या बरोंत सार्वजनिक अशा प्रकारच्या सोयी गरीब वर्गाकरितां जास्त आहेत.

सर्व पाहून घरीं परत आलों.

## ता. २७–६–२८

मुलांसाठीं कांहीं खेळ घ्यावयाचा, त्याची निवड करण्यासाठीं रा. गुलाबचंद व मी सकाळीं रीजंट स्ट्रीटमध्यें दुकानें पहात चाललों होतों. एका दुकानाशीं कृत्रिम मोत्यांचे दागिने पहात उभे होतों. तेथें एक इंग्रज बाईहि उभी होती. तिनें आमच्याशीं बोलणें सुरूं करून "एकादे

वेळीं एकाद्या स्त्रीस बरोबर घेऊन जातां का?" असा सवाल केला. आम्ही तिला "यांत अनीति नाहीं का?" असें उलट विचारलें. "जों-पावेतों दोघेहि शरीरानें शुद्ध आहेत तोंपावेतों काय हरकत?" अशी तिची विचारसरणी होती. ही विचारसरणी येथें सामान्य आहे. या समाजांत ही चाल दोन तीन कारणांनीं आलेली दिसते. एक तर सामान्यतः लग्नें याच रीतीनें जुळून येतात. शिवाय अमुक वर्षांची मुलगी झाली कीं तिनें कांहीं तरी उद्योग करून कुटुंबासाठीं कांहीं तरी रक्कम काढलीच पाहिजे अशी चाल आहे. त्यामुळें पुष्कळ मुली याप्रमाणें पैसे मिळविण्यासाठीं तरुणांबरोबर फिरतात. आम्हांस भेटलेली बाई धंदा मिळावा म्हणून बाहेरून येऊन लंडनमध्यें तिच्या एका नातलगाकडे होती. पण कोठेंच चाकरी मिळत नव्हती. तिला टाइपिंग वगैरे कारकुनी काम येत होतें, पण त्याची जरूर नव्हती. मेड( मोलकरणी )चें काम करणाऱ्यांची नेहेमींच जरूर असते, पण बाईस तें करणें नव्हतें. मनःस्थिति अगदीं आपल्याकडल्यासारखीच. कारकून पाहिजे तेवढे, आचारी नाहीं. असो. पण अशा रीतीनें तरुणांबरोबर जाणाऱ्या तरुणी त्यांच्याबरोबर फक्त जाण्याशिवाय पुढील क्रम आक्रमितात असें अनुमान करणें मात्र चुकीचें होईल. त्यांच्या नीतीचें माप नीतीच्या आपल्या कल्पनांवरून काढणें योग्य होणार नाहीं.

दुपारीं आजारी मुलांचें इस्पितळ पहावयास गेलों. इंग्लंडमध्यें सर्व इस्पितळें लोकांच्या देणग्यांवरच चालतात. सरकारकडून खर्चाची मदत होत नाहीं. आणि कोट्यवधी रुपये दरसाल ऐच्छिक देणग्यांनीं मिळतातहि. केवळ मुलांकरितांच इस्पितळ हें एक विशेष कौतुक वाटलें. अगदीं तीन महिन्यांचे वयापासूनचीं मुलें होतीं. सर्व ठिकाणीं मुलांची उत्तम जोपासना पाहिली. मुलांचें मनोरंजन व्हावें म्हणून त्यांना खेळणीं, घरीं पत्रें लिहिण्याची सोय वगैरे सर्व होतें. केवळ रोग्यांच्या शारीरिक व्याधीकडेच लक्ष्य असतें असें नाहीं, तर त्यांना मानसिक उल्लासहि मिळावा अशी व्यवस्था होती. ही एकंदर व्यवस्था खर्चिक फार, पण रोग्याच्या शुश्रूषेंत किती गोष्टींचा विचार केला पाहिजे हें यावरून दिसतें. आम्ही तेथें इतकीं मुलें पाहिलीं त्यांपैकीं आजारी असूनहि एकहि मूल रडत नव्हतें.

रात्रौ रा. राजाबाबू वगैरे आम्ही नाटक पहावयास गेलों. "तुम्ही इविनिंग ड्रेस घालून न आलां तर गैरशिस्त दिसेल" असें रा. राजाबाबूचें मत दिसलें. अर्थात् मी त्याची पर्वा केली नाहीं. पण आपल्या लोकांच्या गुलामी मनोदशेचें हें द्योतक नाहीं काय? प्रत्येक गोष्ट इंग्रजांची घ्यावयाची. आम्ही त्यांची अशी मिंधेपणानें खुशामत करतों तर मग इंग्रजांनीं आम्हांला आमच्यांत स्वत्व न दिसल्यामुळें आमची किंमत ओळखून जोडे कां मारूं नये? आमच्या कोणत्या गुणाबद्दल त्यांनीं आम्हांला बरोबरीच्या नात्यानें वागवावें?

ता. २९-६-२८

आज दुपारीं रा. गुलाबचंद वगैरे सोबत्यांबरोबर 'वुइमेन्स् क्लिनिक' ही संस्था पहावयास गेलों होतों. प्रजाविस्तारानें गरीब कुटुंबाचे फार हाल होतात व स्त्रियांच्या शरीरप्रकृतीवरहि जाचक परिणाम होतात; म्हणून प्रजाजनन-नियंत्रणाची (बर्थ कंट्रोलची) माहिती देणारी व गरीब वर्गास मोफत साधनें पुरविणारी ही संस्था आहे. ऐच्छिक देणग्यांनीं संस्था चालते व तिच्या बऱ्याचशा शाखाहि आहेत. आगाऊ पत्रव्यवहार करून मी आजचा दिवस नक्की ठरवून गेलों होतों. गरीब वर्गाच्या स्त्रिया येथें प्रतिबंधक उपचारासाठीं येतात. ते उपचार करण्यास स्त्री डॉक्टर ठेवलेल्या आहेत. तेथील व्यवस्थापक बाईनें मला त्यांचे साधनांची माहिती सांगितली आणि त्यांचा उपयोग करण्याचें प्रत्यक्ष ज्ञान घेण्याची इच्छा आहे काय असें विचारलें. 'शक्य असेल तर जरूर इच्छा आहे' असें सांगितलें. तेव्हां त्या बाईनें तेथें उपचारासाठीं आलेल्या एका बाईस विचारून पाहिलें. येथें असत्याचा उपयोग करावा लागला. त्या बाईस सांगितलें कीं "हिंदुस्थानांतून एक डॉक्टर आले आहेत. त्यांना आपला उपचार दाखवावयाचा आहे; त्यांस जर तो शिकविला तर हिंदुस्थानांतील गरीब लोकांस फार उपयोग होईल." मला डॉक्टर बनविलें. त्या गरीब बाईनें केवळ जनहितार्थ म्हणून कसलीहि अपेक्षा न ठेवतां लगेच संमति दर्शविली व मुख्य डॉक्टर-

बाईनें मला पडद्यांत नेऊन माझे देखत उपचाराची तऱ्हा दाखविली; एवढेंच नव्हे तर पुनः माझ्या हातानें त्या बाईस तो उपचार करविला. हें सर्व झाल्यावर मी स्वतः होऊन त्या बाईस देण्यासाठीं डॉक्टरबाईकडे २॥ शिलिंग दिले, त्याचा तिने जरी साभार स्वीकार केला, तरी प्रथम ज्या वेळीं तिनें रुकार दिला तो मात्र अगदीं निष्काम जनहितार्थच होता. याबद्दल त्या बाईविषयीं मला फारच सादर कौतुक वाटलें. आपल्याकडे याप्रमाणें कोणी पुरुषानेंहि कबूल केलें नसतें, मग स्त्रिया तर लांबच.

सायंकाळीं सेसिल हॉटेलांत इंडियन मजलिसचें जेवण होतें. रा. लालचंद यांचे आग्रहानें दहा शिलिंग खर्चून मीहि येईन म्हटलें होतें. डॉ. परांजपे, श्री. बालकराम, रा. बखले, मि. ॲंड्र्यूज वगैरे मंडळींच्या भेटीचा लाभ झाला. मी काळा पोषाख घालून गेलों नव्हतों. येणाऱ्या पाहुण्यांचें आदरातिथ्य करण्यास मजलिसचे अध्यक्ष डॉ. परांजपे दाराशीं उभे होते. माझ्याशीं हस्तांदोलन केल्यावर हळूंच "काळा सूट अशा वेळीं घालावा" असें प्रेमानें व मित्रत्वाचे नात्यानें पुटपुटले. मला ही माहिती नवीन नव्हती. पण माझी मनोदशा डॉक्टरसाहेबांस माहीत नव्हती. त्यांच्या मनोदशेबद्दल मला वाईट वाटलें. इंडियन मजलिसचें जेवण, त्यांत युरोपियन तऱ्हेचा इतका बेमालूम बडेजाव कशाला? आमच्यांपैकीं मोठमोठ्या मंडळींनाहि आपलेपणा अगदींच नाहीं का? सर्वच आम्ही पाश्चात्यांचें घ्यायचें कीं काय? आमच्या बायका ऐकत नाहींत हें सुदैवच! नाहीं तर स्वतः केवळ अनुकरणबुद्धीनें युरोपियन वेष धारण करणारे हे लोक बायकांनाहि त्यांचा वेष लगेच चढवावयाचे!

मी जेवणास थांबलों नाहीं. पैसे भरून जर जेवण करावयाचें तर एका बाजूस बसून सवड नसल्यास मध्येंच उठावयास कां हरकत असावी हें मात्र मला अजून गूढच आहे, आणि न जेवणाराचे पैसे तरी कां परत करूं नयेत हाहि प्रश्नच आहे, पण अर्थात् तो माझा माझ्याजवळच.

**ता. ३-७-१९२८**

मुलांसाठीं कांहीं तरी वस्तू घ्याव्या म्हणून दुकानें पहातां पहातां येथील प्रख्यात वुलवर्थचे दुकानांत गेलों. या दुकानाच्या पुष्कळ शाखा

आहेत. खास गरीब व मध्यम वर्गासाठीं हें दुकान आहे. येथें ६ पेन्सापेक्षां जास्त किंमतीच्या वस्तू विकण्यांत येत नाहींत. पण त्याचा अर्थ असा नाहीं कीं वाटेल त्या कचरा वस्तू विकतात. रोजच्या संसारास लागणाऱ्या अशा आवश्यक व थोडक्यांत भपक्याच्या अशा सुंदर व टिकाऊ वस्तूहि सर्व विकण्यांत येतात. किंमती ½ पेन्सापासून ६ पेन्सांपर्यंत. पांच शिलिंगांचा माल घेतला तर फुकट घरीं पोचविण्यांत येतो. दुकानांत फराळाची, चहाकॉफीची वगैरेसुद्धां सोय आहे. तेथेंहि कोणत्याहि प्लेटचा दर जास्तींत जास्त ६ पेन्सांपेक्षां जास्त नाहीं. व्यापाराची ही तऱ्हाहि 'सेल्फरिज' स्टोअर्सचे धर्तीवरच आहे. गिऱ्हाईक आंत शिरलें कीं सर्व सोयी व माडणी अगदीं घटोत्कची मायावी बाजाराप्रमाणें दृष्टीस पडते. वस्तूची किंमत अगदीं कमी, त्यामुळें उलट मनुष्य खरेदी जास्त करतो.

**ता. ९–७–२८**

आज सकाळीं मॅन्चेस्टरला जावयास निघालों. मॅन्चेस्टर मुक्कामीं आम्हांस घ्यावयास स्टेशनवर मि. येट्स् आले होते.

लंच आटोपल्यावर मॅन्चेस्टरचा रॉयल एक्स्चेंज (व्यापारी देवघेवीचा बाजार) हॉल पहावयास गेलों. येथें कोणासहि पहावयास जावयाचें असेल तर वर्षांतून फक्त दोन दिवस व तेंहि कोणातरी सभासदानें शिफारस केली म्हणजे जातां येतें. कोणी अलबते गलबते येऊं नयेत, येणारे विश्वसनीय गृहस्थ आहेत याची खात्री असावी हा हेतु. मि. येट्स् सभासद असल्यामुळें त्यांच्या ओळखीनें आम्ही आंत जाऊं शकलों. या हॉलमध्यें सुमारें १२००० माणसें दर मंगळवारीं व शुक्रवारीं सौद्यासाठीं गोळा होतात. साऱ्या दुनियेचे कापसाचे सौदे मुख्यतः येथें होतात.

**ता. १०–७–२८**

आज सकाळीं ९ वाजतां मॅन्चेस्टर गांव पहाण्यास पुनः गेलों. ट्रामनें व पायीं फिरलों. प्रथम शिप कनाल व गोद्यांचे बाजूनें फिरलों. शिप

कनालचे बाजूनें व गोद्यांचे रस्त्यांत पुष्कळच कारखाने आहेत. फोर्ड मोटारीच्या कारखान्याचीहि येथें एक शाखा आहे. गरीब वर्गाची वस्ती येथें फार. येथेंहि बेकारी पहाण्यांत आलीच. कारखान्यांपुढें लोक काम मिळावें म्हणून उभे होते.

रिलॅंड लायब्ररी पहावयास गेलों. रिलॅंड नांवाचा कोट्याधीश वारला, त्याला मूलबाळ नसल्यानें त्याच्या विधवेनें लायब्ररी बांधून शहरास नजर केली आहे. युरोपांत अशा सार्वजनिक मोठया व मूल्यवान देणग्या शहरोशहरीं आहेत. आपल्याकडे दत्तक पुत्रास सर्व देऊन संपत्तीची वांटणी वकिलांत करण्याची व स्वतःच्या स्त्रीस आणि आप्तांस दुःखांत लोटण्याची पद्धति आहे. तिच्याऐवजीं सर्व राष्ट्राची भावी प्रजा दत्तक संतति मानून मिळकत लोकोपयोगी कार्यास देण्याचा प्रचार सुरूं होईल तर किती उत्तम !

लायब्ररी पाहून तेथून स्टेशनवर जाऊन सायंकाळीं ७–५ चे गाडीनें लिवरपूलला गेलों. बोटींत रात्रौ ८ वाजतां दाखल झालों व बोट १० वाजतां डब्लिनला सुटली.

ता. ११–७–१९२८

सकाळीं ९ वाजतां डब्लिन बंदरांत पोंचलों. लिवरपूरल ते डब्लिनचा समुद्रप्रवास वाईट. सामान्यपणें बोटी लागतात.

सुमारें पावणेतिहींस रा. गुलाबचंद, लालचंद व मी असे आम्ही तिघेजण आयरिश पार्लमेंट (डाएल आयरन) ची बैठक पहावयास गेलों. स्वतंत्र आयर्लंडचें हें पार्लमेंट असल्यामुळें पहाण्याची फारच इच्छा होती. सुदैवानें येथें पार्लमेंटचे बैठकीस प्रेक्षक म्हणून जाणें झाल्यास कांहीं विधि लागत नाहीं. फक्त पार्लमेंटगृहांत असलेल्या ऑफिसांत जाऊन परवानगीची मागणी करावयाची व नांव, गांव वगैरे लिहून द्यावयाचें. या मानानें ब्रिटिश पार्लमेंट पहाणें जाण्यास किती तरी यातायात ! आम्ही गेलों तेव्हां स्त्रीपुरुष मिळून सुमारें १५–२० मंडळी तिकिटासाठीं

बसलेली होती. सर्व गोरे—आयरिश आणि अमेरिकन होते. पण हिंद-वासीयांविषयीं कांहीं निराळीच भावना—प्रेमाची भावना—दिसली. सर्वांचे आधीं आम्हांस विचारून तीन पास देण्यांत येऊन बैठकीचे जागीं आम्हांस पोंचविण्यांत आलें.

आम्ही प्रेक्षकांचे गॅलेरींत मधोमध अध्यक्षाचे समोरचे अंगास बसलों. येथें सर्व काम इंग्रजींतच चालतें. आयरिश भाषा अशी वेगळी आहे, पण इंग्रजांचे अमदानींत त्या भाषेस इतकी गचांडी मिळाली कीं आयर्लंडांतील आयरिश लोक आपल्या भाषेसहि पारखे झालेले आहेत. तिचें पुनरुज्जीवन आयरिश राष्ट्रीय सरकार हल्लीं करीत आहे, परंतु दरम्यान सर्व व्यवहार—सरकारी व खाजगी—इंग्लिश भाषेंत चालत असतात.

कामास बरोबर ३ वाजतां सुरुवात झाली. त्या दिवशींचे बैठकींत प्रश्नोत्तरांचे वेळानंतर कांहीं महत्त्वाचे बाबतींत मतें नोंदविण्याचा प्रसंग आल्यामुळें सरकारी व विरोधी पक्षाचे सर्व सभासद आले होते. हा आमच्या दृष्टीनें सुयोगच! त्यामुळें कॉस्ग्रेव्ह, जनरल मल्काही, डी वेलेरा वगैरे देशभक्तांचें आम्हांस दर्शन झालें. त्यांना पाहून आम्हांस इतकी धन्यता वाटली कीं आमची युरोपची फेरी या दर्शनानेंच सफळ झाली असें वाटलें! आयर्लंड व हिंदुस्थान यांच्या समान अवस्थेमुळें कित्येक वर्षांची परस्पर—सहानुभूति व त्यांत गेल्या ५।१० वर्षांत तळ-हातावर शिर घेऊन ज्या देशभक्तांनीं स्वराज्यस्थापना केली त्यांच्या प्रत्यक्ष दर्शनानें कोणास धन्य वाटणार नाहीं? आम्ही एक तास तेथें बसलों. आमच्या शेजारीं बसलेले आयरिश गृहस्थ आम्हांस निखालसपणें व आपलेपणानें माहिती सांगत होते. डाएलमध्यें एक स्त्री सभासदहि आहे.

डब्लिन शहर इतर युरोपिअन शहरांप्रमाणेंच आहे. शहर व आयरिश लोक एकंदरींत गरीब असल्याचेंहि दिसतें. हिंदी लोकांविषयीं येथील लोकांस स्वाभाविक आपलेपणा वाटतो हेंहि ठिकठिकाणीं उघडउघड दिसून येतें.

**ता. १२–७–१९२८**

आज सकाळीं थॉमस् कुकच्या मोटार ट्रिपनें बहुतेक सर्व डब्लिन फिरून आलों. आमच्याबरोबर पुष्कळ अमेरिकन प्रवासी होते. फिरतांना

त्यांचेशीं हिंदुस्थानाविषयीं बोलण्याचा प्रसंग आला. "इंग्रजांच्या राज्यानें तुम्ही हिंदुस्थानांत संतुष्ट आहांत काय?" असा आमच्या आयरिश वाटाड्यानें खोचदारपणें प्रश्न केला. "आम्ही संतुष्ट असणें तुम्हांला शक्य वाटतें का?" असा मी उलट प्रश्न केला. त्यानें सर्व अमेरिकन लोक फारच खूष झाले असें दिसलें. हिंदी स्वराज्याविषयीं अमेरिकन लोकांची सहानुभूति असल्याचें या प्रवासांत आम्हांस आढळून आलें. "इंग्लंडच्या अडचणीच्या वेळीं तुमची उत्तम संधि आहे" असें एका अमेरिकनानें मला सांगितलें; तर दुसरा म्हणाला, "चीनकडे पहा; तुमच्यासारख्या हजारो हिंदी लोकांनीं यूरोप–अमेरिकेंत शिक्षण घेऊन देशांत जागृति केली पाहिजे." एका बाईनें तर ती व तिचा नवरा यांचेबरोबर लंच घेण्यास आम्हांस निमंत्रण केलें. हें जोडपें हिंदुस्थानासहि येणार आहे. 'हिंदुस्थानांत येऊन महात्मा गांधींस भेटल्याशिवाय जाणें म्हणजे नवीन हिंदुस्थानाची ओळख करून घेतल्याशिवाय जाणें आहे, तेव्हां जरूर अमदाबादेस येऊन जा' असें मी त्यांना आग्रहपूर्वक सांगितलें आहे.

लंचच्या वेळीं पुष्कळ गोष्टी निघाल्या. मिस् मेयोच्या पुस्तकाविषयीं मी सांगितलें कीं, "गांव तेथें म्हारवडा असावयाचाच. मला वाटलें तर अमेरिकेविषयींहि मी असें पुस्तक लिहूं शकेन. पृथ्वीवर असा कोणता देश आहे कीं जेथें लुच्चे, लफंगे, क्रूर, अधम लोक नाहींत?" हें म्हणणें त्यांस पटलेंसें दिसलें.

आम्ही काल डाएलमध्यें पुष्कळ वेळ बसलों याचें सकौतुक वर्णन 'आयरिश टाइम्स' मध्यें आज सकाळीं आल्याचें मि. स्टीवन्सन यांनीं सांगितलें. म्हणून त्या अंकाची एक प्रत घेऊन ठेवली आहे.

सायंकाळीं सामानासह ७ चे सुमारास लिवरपूलला जाणाऱ्या बोटींत येऊन दाखल झालों. ८ वाजतां बोट सुटली. येथें सूर्यास्त फार उशीरां होतो. सुमारें १० वाजतां सूर्यास्त झाला. समुद्रांतील तो सूर्यास्त अवर्णनीय होता.

ता. २०–७–२८

आज सकाळीं विम्बल्डनहून अंडरग्राउंडनें निघून विक्टोरिया स्टेशनवर आलों, व तेथून बोटमेलनें ऑस्टेंडला येण्यास निघालों. बरोबर रा. गुलाबचंद हिराचंद व रा. ठाकोरलाल मेहेता आहेत.

बोटींतून उतरल्यानंतर सर्व प्रकारची तपासणी झाल्यावर हॉटेलांत चहा वगैरे आटोपून सायंकाळीं घोड्याचे गाडींतून गांवांत फिरून आलों. गाव फार मोठा असावा असें वाटलें नाहीं. हे हवा खाण्याचें ठिकाण म्हणून प्रख्यात आहे. बेल्जियममध्यें असून भाषा व सत्ता बेल्जीयन. लोक रंगानें लालबुंद जास्त व इंग्लंडांतील लोकांपेक्षां सौंदर्यानें सामान्यतः जास्त असे दिसले. विशेष पहाण्यासारखी संस्था म्हणजे कुर्साल ( Kursaal ). ही सरकारी संस्था आहे. समुद्रकांठीं एक इंद्रभुवनच यांत शंका नाहीं. येथें राजवाडाहि आहे, पण राजघराण्यांतील मंडळी येथें असल्यामुळें तो पहाणें शक्य नव्हतें.

युरोपांत शाकाहारी भोजन कसें काय मिळतें याची चिंता होती. पण आजचा तरी अनुभव येथें चांगला आला. भात, व वाटाणे वगैरेच्या भाज्या चांगल्या केल्या होत्या.

आजपासून यूरोपखंड सोडण्याचा व हिंदुस्थानास परत जाण्याचा वेध लागला. जें जें शहर सोडूं तेथें पुनः जावयाचें नाहीं व आतां मुंबईस पोंचल्यावरच प्रवास थांबावयाचा.

या प्रवासाची सर्व व्यवस्था आम्ही थॉमस् कुकमार्फत केली आहे. प्रवाशांची सर्व सोय करण्याचें काम करणारी संस्था किती जरूरीची व उपयोगी आहे याचा अनुभव स्वदेशाबाहेर विशेष येतो. आम्ही प्रथम त्यांना कुठें कुठें जाण्याची आमची इच्छा आहे तें सांगितलें. त्यांत कांहीं कांहीं फेरफार करणें इष्ट असल्यास तें सांगण्यास त्यांना कळविलें. त्यांच्या मनुष्यानें आमचे विचार समजून घेऊन प्रथम एक कार्यक्रम तारीखवार आमच्या पसंतीसाठीं पाठविला. बेल्जियम, जर्मनी, स्वित्झर्लंड, इटाली व फ्रान्स या देशांतील महत्त्वाच्या स्थळीं जाऊन पहाण्यालायक

देखावे, इमारती, संस्था वगैरे सर्व पहावयाच्या व हा सर्व क्रम ता. १८ ऑगस्ट पावेतों चार आठवड्यांत संपवावयाचा. या धोरणावर कार्यक्रम तीन चार दिवसांत तयार करून दिला, आणि त्यांत त्यानें स्वतःच्या माहितीवरून त्यास ज्या गोष्टी पहाण्यालायक इष्ट वाटल्या त्या वाढविल्या. आम्ही तो कार्यक्रम पसंत केल्यावर दरेक दिवसाचा तपशीलवार कार्यक्रम—उदाहरणार्थ, अमुक स्टेशन-वरून अमुक वाजतां निघावयाचें, अमुक ठिकाणीं अमुक वाजतां पोंचा-वयाचें, अमुक हॉटेलांत जावयाचें इ.—तयार करून त्याचें एक लहानसें पुस्तक बनवून आमच्याकडे दिलें. त्यांत निरनिराळ्या देशांतून घड्या-ळांचे टाईम बदलतात त्याची सूचना, पासपोर्ट बरोबर ठेवा ही खास सूचना, त्याचप्रमाणें इटालींत प्रत्येक बाहेरच्या मनुष्यानें त्या देशांत प्रवेश केल्यापासून ३ दिवसाच्या आंत पोलीस चौकीवर स्वतःची सर्व माहिती दिली पाहिजे ही सूचना—ज्या दिवशीं इटालींत पोंचतों त्या दिवशींच्या पानावर दिलेली—अशी सर्व माहिती पूर्ण आहे. आम्हांस फक्त त्यांत पाहून यंत्राप्रमाणें चालावयाचें.

आमच्या या प्रवासांत इंग्लंडांत आगगाडीचा प्रवास तिसऱ्या वर्गानें व युरोपांत दुसऱ्या वर्गानें आहे. इंग्लंडांत तिसऱ्या वर्गाच्या गाड्यांचे डब्बे आपल्याकडील फर्स्ट क्लाससारखेच आहेत. युरोपांत दुसऱ्या वर्गाचेहि तसेच आहेत.

ता. २१–७–२८

आज १०–३२ चे गाडीनें ब्रूसेल्स शहरीं जावयाचें. तेव्हां लौकर उठून सर्व आटोपून ऑस्टेंड सेंट्रल स्टेशनवर आलों. पण तेथें समजलें कीं आज बेल्जियमचा सर्वांत मोठा राष्ट्रीय सण असल्यामुळें गाड्या रविवारप्रमाणें सुटतील. सन १८३० मध्यें २१ जुलै रोजीं बेल्जियम् देश हॉलंडच्या पारतंत्र्यांतून मुक्त होऊन स्वतंत्र झाला व म्हणून हा दिवस अतिशय मोठा सण म्हणून लोक पाळतात. आम्ही पाहिलें,

आपल्याकडील दिवाळीप्रमाणें आनंद समजून गुढीपाडव्याप्रमाणें घरोघर राष्ट्रीय निशाणांच्या गुढ्या उभारलेल्या होत्या.

ब्रूसेल्स शहरीं पोंचलों, व लगेच टॅक्सी करून कुकचे ऑफिसांत गेलों. तेथें वॉटर्लूस जाणारी मंडळी तयार होती. आम्ही निघालों ते न्याय-मंदिरावरून गेलों. मधोमध मोठा रस्ता, त्याच्या बाजूला सारखीं उंच झाडें व दोन्ही बाजूंना खूप मोठे फूटपाथ व पुनः रस्ता. हा रस्ता संपल्यावर एक छान उपवन लागतें. यांत एक वांकडातिकडा सर्पाकृति तलाव आहे. सर्व ठिकाणीं घनदाट अशा फारच उंच व सरळसोट वृक्षांचीं बनें.

तेथून पुढें रस्ता थेट वॉटर्लू गांवांत व तेथून रणक्षेत्रांत जातो. सुमारें १५ मैलांवर हा गांव आहे. ड्यूक ऑफ् वेलिंग्टननें ता. १८ जून १८१५ रोजीं नेपोलियन यास या गांवाजवळचे लढाईंत हरवून लढाईची हकिकत येथून लिहिली व या गांवांत वेलिंग्टनचें मुख्य स्थान होतें म्हणून त्यास ‘ वॉटर्लूची लढाई ’ असें नांव पडलें.

ज्या घरांत वेलिंग्टन राहात होता व जेथून त्यानें लढाईचें धोरण नक्की केलें, हुकूम सोडले तें घर व ती खोली, त्याच स्थितींत कायम असून वेलिंग्टनचा लढाईच्या आदले रात्रींचा पलंग, त्यानें आराखडा तयार केला तें टेबल व ज्यावर बसून तयार केला ती खुर्ची तशीच ठेवलेली आहे.

वॉटर्लू रणक्षेत्राकडे गेलों. या ठिकाणीं सुमारें ६–७ हजार लोक त्या दिवशीं दुपारपासून संध्याकाळपावेतों ठार होऊन पुरले गेले असल्यामुळें लढाईनंतर त्या जागेच्या मालकानें ती पवित्र समजून तशीच कायम ठेवली. पुढें बेल्जियम सरकारनें ती जागा ऐतिहासिक म्हणून विकत घेऊन ठेवली आहे.

सर्व पाहून आम्ही सायंकाळीं परत आलों.

**ता. २२–७–२८**

आज मोटर बसनें ब्रूसेल्स शहर हिंडून पाहिलें.

येथें गांवांत ठिकठिकाणीं लहान लहान बगीचे व चौक आहेत व त्यांत लॉन व फुलझाडें फारच कौशल्यानें व नयनमनोहर रीतीनें लावलीं आहेत. चौक असे मजेदार रचले आहेत कीं एका चौकांत उभें राहिलें तर एका बाजूला इतर चौक दिसतात—चौकांची ओळ दिसते, आणि त्यांचे दोहों बाजूंस दूरवर ऍव्हेन्यू ( ओळबंद झाडें ) आहेत.

नंतर येथील कॉंग्रेस—कॉलम म्हणजे स्वातंत्र्य—स्मारकाचा स्तंभ पाहिला. खालीं चौथऱ्याच्या दोन बाजूंस दोन सिंह व मधोमध एका मोठ्या दगडी समईत ज्वाळा सतत पेटत ठेवलेल्या आहेत.

दुपारीं लंच घेऊन अँटवर्प शहराकडे गेलों. येथें म्युनिसिपालिटीनें मोठमोठ्या रस्त्यांच्या कोपऱ्यांवर घड्याळें लावण्याची टूम ठेवली आहे. अँटवर्प हें मोठें बंदर असून हिऱ्यांच्या व्यापाराचें जगाचें केंद्र आहे, त्यामुळें येथें हिंदी झवेरी मंडळी पुष्कळ आहेत.

सायंकाळीं ॲटवर्पहून ब्रूसेल्सला परत आलों. ब्रूसल्सेची एक गोष्ट विशेष कौतुकाची वाटली. या शहरांत एक मोठी नदी मधोमध वाहात जाते, पण तिच्यावरून सर्व बांधून टाकल्यामुळें ती दिसत नाहीं. शहराखालून नदी जात आहे हें सांगितल्यावर आश्चर्य वाटल्याशिवाय राहात नाहीं. नदीचें नांव Senne ( सेन ) आहे.

ब्रूसेल्स व ॲटवर्प हीं दोन्हीं शहरें गेल्या लढाईत ( १९१४—१८ ) चार वर्षे जर्मन लोकांच्या ताब्यांत होतीं. परंतु त्यांतील सर्व इमारती, ऐतिहासिक वस्तू, कलाकौशल्याच्या वस्तू, चित्रें वगैरे एकाचाहि जर्मन लोकांनीं नाश केला नाहीं, इतकेंच नव्हे तर त्या जशाच्या तशाच ठेवल्या याबद्दल खरोखरच त्यांस धन्य म्हटलें पाहिजे. हा मुलुख आतां कायमपणें आपल्या घशांत उतरेल अशा समजुतीनें त्यांनीं नासधूस केली नाहीं असें सांगणारा एक वर्ग आहे, पण लढाईच्या शेवटच्या काळांत हा मुलूख आपल्याकडे राहात नाहीं हें जर्मनांना दिसत होतें. शिवाय युरोपांतील मुलुखासाठीं लढाई नव्हतीच, इतर जगाच्या स्वामित्वासाठीं होती. तेव्हां स्वार्थाचा हेतु जर्मनीवर लादणें म्हणजे सत्याचा विपर्यास दिसतो.

ता. २३–७–२८

आज ६–५० चे गाडीनें जावयाचें, त्यामुळें ४॥। वाजतांच जागा झालों. सर्वांना जागें करावयास हॉल पोर्टरला सांगितलें होतें त्याप्रमाणें त्यानें घंटा वाजविली. आम्ही सर्वजण ६ वाजतांच न्याहारीस बसलों. तरीपण निघतां निघतां इतकी गर्दी झाली कीं कसेबसे एकदां गाडींत येऊन बसलों. स्टेशनवर कुकचा दुभाष्या आला होता.

सुमारें दोन अडीच तासांनीं 'लीज' स्टेशन लागलें. याच्या आसपासचा प्रदेश–सदर्न मराठा रेल्वेच्या प्रवासांत पुण्याचे पुढें जसे लहान लहान डोंगर दिसतात, तसा प्रदेश–आहे. डोंगरांत सुंदर रस्ते आहेत. लीजपासून एला शॅपेल स्टेशन येईपावेतों बेलजियम्‌ची हद्द आहे. एला शॅपेल हें जर्मन हद्दीचें पहिलें स्टेशन. पासपोर्ट इ. सर्व प्रकारची तपासणी झाली. कस्टम तपासणींत त्रास मुळींच देत नाहींत.

तेथून गाडी कलोनला पोंचली. कलोन गांव ऱ्हाइन नदीच्या कांठावर आहे. नदीकांठीं एके ठिकाणीं प्रिन्स बिस्मार्कचा भव्य पुतळा आहे. एकंदर इमारती भव्य व सुंदर दिसल्या. शहर फार जुनें, रोमन लोकांनीं बांधलेला तट, दरवाजा वगैरे असून कांहीं अवशेष आहेत.

नदीपलिकडे प्रेस एक्झिबिशन ( छापखान्यांचें प्रदर्शन ) होतें. हें प्रदर्शन म्हणजे त्या धंद्यांतील तज्ज्ञांस एक युनिवर्सिटीच. पूर्वीपासून आजपावेतों छापण्याच्या कलेंत झालेले फेरफार, सुधारणा, तसेंच पुस्तकें बांधणें, टाइप करणें वगैरेहि नमुने होते. हें प्रदर्शन नदीपलिकडील पुलाच्या दोन्ही बाजूंना मुद्दाम बांधलेल्या मोठ्या व मजबूत इमारतींत होतें. प्रदर्शनाच्या एका बाजूकडून दुसऱ्या बाजूस जाण्यास नदीकांठानें एक लहानशी आगगाडी असून गाड्या दर तीन पांच मिनिटांनीं जात येत असत.

रात्रौ १०–३५ च्या गाडीनें बर्लिनला रवाना झालों. झोप घेतां यावी म्हणून, उशाहि त्या रात्रीं भाड्यानें घेतल्या. ही सोय चांगली आहे. कोणीहि त्या वापरलेल्या नाहींत अशी खात्री व्हावी म्हणून त्या कागदाच्या पाकिटांत सीलबंद ठेवलेल्या असतात.

ता. २४–७–२८

आज सकाळीं बर्लिन सेंट्रल स्टेशनवर आलों. आम्ही येथे ज्या हॉटे-लांत उतरलों आहों तेथून विल्हेल्म स्ट्रासी–बर्लिनचें सेक्रेटारिअट (राज्य-कारभाराच्या खात्यांच्या) इमारती वगैरे असलेला रस्ता–जवळच आहे. तेथें फॉन हिंडेनबर्गच्या बंगल्यावरील लष्करी पहारा बदलण्याचा विधि अनायासें दिसला.

बर्लिन शहरचे रस्ते लंडनपेक्षां मोठे आहेत. रस्ते मोठे व शहराचा विस्तार जास्त त्यामुळें गर्दी लंडनपेक्षां कमी वाटते. स्वच्छता लंडनपेक्षां जास्त दिसते.

ता. २५–७–२८

आज पॉट्स् डॅमला जाण्याचें नक्की केलें होतें. शेवटचे कायसर व जर्मनीचे सर्व राजे यांचे राजवाडे तेथें आहेत. ते राजवाडे, तेथील बागा वगैरे पहाण्यासारख्या आहेतच, पण शिवाय तेथें जातांना लागणारा देखावाहि मनोहर आहे.

आम्ही पॉट्सडॅमला पोचल्यावर जुन्या पॉट्स्डॅममधून नव्या पॉट्स्-डॅमला गेलों, व प्रथम फ्रेडरिक धी ग्रेट यानें इ. सन १७४५–४७ त बांधलेला "सान्स सूसी" (Sans, Souci) राजवाडा पाहिला. "सान्स सूसी" हा फ्रेंच शब्द आहे. त्याचा अर्थ "निष्काळजी" (Without care) असा होतो. राज्यशकटाचे भारापासून मुक्तता असावी अशा वेळीं येथें राहावें या उद्देशानें नांव दिलेलें होतें, पण त्याप्रमाणें मुक्तता मिळाली नाहीं, म्हणून राजवाड्यावर नांव लिहितांना "Sans" (= शिवाय) या शब्दापुढें स्वल्पविराम ठेवून फ्रेडरिक धी ग्रेट राहात असे त्या बाजूकडे "Souci" (काळजी) शब्द येईल अशा खुबीनें नांव लिहिलें. या राजवाड्याचा सर्व नकाशा फ्रेडरिकनें स्वतः कल्पिला. बाहेरून अगदीं साधा दिसतो, पण आंत एक एक महाल फारच उत्तम कलेचा नमुना आहे. त्याच्यापुढें बाग आहे. तो आजहि फारच उत्तम

स्थितींत ठेवण्यांत आलेला आहे. फ्रेडरिकच्या वेळचीं (सन १७४५) पुष्कळ झाडें व विशेषेंकरून द्राक्षवेली आहेत. या द्राक्षवेलीचीं म्हणून द्राक्षें विकण्यांत येत होतीं तीं थोडीं खाऊन फ्रेडरिकच्या वेळच्या जीव-मय वस्तूंपैकीं एकीची तरी आम्ही प्रत्यक्ष मुलाखत घेतली !

त्या बागेंतून फिरून नव्या राजवाड्याकडे आलों. या राजवाड्यांत २०० वर खोल्या आहेत व बाजूला जवळ जवळ २०० वर दगडी सुंदर पुतळे आहेत. नव्या राजवाड्यांतल्या महालांचें वर्णन करणें तर अशक्यच आहे. मार्बल हॉल वगैरे तर ठीकच, पण एक Sheli हॉल आहे त्याची कल्पनाच अद्वितीय आहे. हा शेवटच्या कायसरनें पूर्ण केला. यांत निरनिराळ्या तऱ्हेचे रत्नवजा दगड आणून भिंतीस व खांबास बसविले आहेत. एका महालास लाखो रुपये खर्च झाले असतील.

जुन्या व नव्या राजवाड्यांतून एक गोष्ट विशेष वाटते ती ही कीं ऐतिहासिक स्मृति अगदीं काळजीपूर्वक जागृत ठेवलेली आहे. फ्रेडरिकची लायब्ररी, कोच, खुर्ची, त्यानें काढलेली तसबीर वगैरे वगैरे वस्तू अगदीं अस्सल स्थितींत ठेवलेल्या आहेत. कांहीं कांहीं भागांचें तर सीलिंग— भिंतीसुद्धां त्याच दोनदोनशें वर्षे कायम आहेत. ऐतिहासिक स्मृतीची काय ही आवड ! व याच्या तुलनेला आपली किती अनास्था !

राजवाड्याच्या जवळच एक पवनचक्की आहे. तीहि कायम ठेवली आहे. त्याची मजेदार गोष्ट आहे. त्यांत प्रजेची स्वातंत्र्यप्रियता, राजाचा न्यायीपणा व राज्याधिकारी लोकांचा निर्भयपणा व निःस्पृहता दिसून येते. पवनचक्की पूर्वीपासून होती व मागाहून राजवाडा झाला. पवनचक्कीच्या आवाजाचा त्रास होई म्हणून ती काढण्यासाठीं फ्रेडरिकनें मालकाशीं बोलणें लावलें. वाटेल त्या किंमतीस विकत घेण्यासहि फ्रेडरिक कबूल होता, पण वाडवडिलांची पवनचक्की विकण्यास मालक कबूल होईना. शेवटीं राजा व चक्कीचा मालक यांचें भांडण कोर्टापर्यंत गेलें व फ्रेडरिक राजाचे कोर्टानें त्याच्याविरुद्ध निकाल दिल्यावरून ती चक्की कायम राहिली व आज ती ऐतिहासिक चक्की म्हणून दाखविली जाते. हल्लींच्या

लॅंड अक्वीझीशन ॲक्टची युक्ति त्या वेळीं फ्रेडरिक यास सुचली नाहीं असें दिसतें!

सायंकाळीं ६॥ चे सुमारास परत आलों. लगेच हॉटेलांत येऊन भोजन आटोपून एका नाटकास गेलों. नाटक 'व्हरायटी' होतें. येथें त्याला 'रेव्ह्यू' म्हणतात. नाटकांतील भाषणांचें सारहि कळणें शक्य नव्हतें. पण पहिल्या भागांत इंग्रज लोकांची थट्टा असावी असें वाटतें. नाच वगैरे सर्व कनिष्ठ प्रतीचे दिसले. निर्लज्जपणा पारिसपेक्षां किंचित् कमी, पण कलेच्या दृष्टीनें पहातां पारिस हें फारच उच्च दर्जास लागेल.

ता. २६-७-२८

आज सर्व मिळून रेडियो टॉवरवर गेलों होतों. त्याला 'फुंक टूर्म' म्हणतात. तो सुमारें ४५० फूट उंच आहे व त्याचा सर्व सांगाडा लोखंडी आहे. जर्मनीचें सर्वांत मोठें रेडियो स्टेशन. येथून भाषणें, गाणीं वगैरे कार्यक्रम बर्लिनमध्यें पसरवितात. एका बर्लिन शहरांत घरोघर लहान लहान रेडियो यंत्रें लोकांनीं घेतलीं आहेत, त्यांची संख्या पांच लाखांवर आहे! सुमारें २५-३० रु. त घरीं लहान रेडियो घेतां येतो.

पुढें आमच्यापैकीं श्री. ठाकोरलाल यांस दुर्बीण घेणेची असल्यामुळें आम्ही येथील प्रख्यात वेल्थाम स्टोअर्समध्यें गेलों. लंडनच्या सेल्फरिज् किंवा हॅरॉडसारखाच हा स्टोअर्स आहे. येथें अदमासें ४००० नोकर काम करीत आहेत. भाषेची अडचण पडूं नये म्हणून दुभाष्ये ठेवलेले आहेत. आम्हांस करावयाच्या खरेदीची चौकशी करण्यासाठीं व मदत करण्यासाठीं जी दुभाषी बाई आली तिला युरोपच्या निरनिराळ्या सात भाषा येत होत्या. पुष्कळ भाषा बोलतां येणें हें सुशिक्षणाचें मोठें अंग समजलें जातें.

बर्लिन शहराविषयीं एकंदर फिरण्यानें जें सामान्यपणें वाटतें तें देतों: शहर लंडनपेक्षां फारच स्वच्छ व सुंदर आहे. ठिकठिकाणीं बागा व तळीं यांनीं विशेष शोभा येते. मोठ्या रस्त्यांस मधोमध चालावयाचा रस्ता व त्या रस्त्याच्या दुतर्फा हारबंद झाडें आणि बसावयास खुर्च्या इत्यादि.

लोकांस कलेची अभिरुचि असूनहि इंग्लंडपेक्षां एक प्रकारें जास्त साधे-पणा व काटकपणा दिसला. रूढिबंधन इंग्लंडइतकें दिसलें नाहीं. तसेंच लहानसान नियमबद्धपणांतहि इंग्लंडइतका कांटेतोलपणा दिसला नाहीं. उदाहरणार्थ, थिएटरांत आमच्या खुर्च्यांवर इतर मंडळी बसली होती, आम्हांस शेजारच्याच जागा दिल्या; त्या जास्त बऱ्या होत्या, तेव्हां आम्ही तक्रार केली नाहीं ही गोष्ट वेगळी, पण बसविणारांस त्याविषयीं विशेष अडचण वाटली नाहीं. मोटार बस साडेतीन वाजतां सुटावयाची, पण त्याआधीं १५ मिनिटें बस भरली म्हणून सोडली, वगैरे वगैरे. असे प्रकार इंग्लंडांत नजरेस येत नाहींत. लोक इंग्लंडांतील लोकांपेक्षां कमी reserve आहेत. आणि इंग्लंडविषयीं एक प्रकारची तुच्छतेची भावना दिसते.

ता. २७–७–२८

बर्लिनमध्यें व नंतर आजचे प्रवासांत इतरत्रहि एक गोष्ट अशी पाहिली कीं, साधारण ऐपतदार–मध्यम वर्गाचा मनुष्य–एक लहानशी जागा स्वतःचे बागेसाठीं शहराच्या बाहेर ठेवतो. अदमासें ५० चौरस यार्डां-पेक्षां जास्त नसते. एकाद्या मोठ्या शेतवजा जागेचे विभाग केलेले असतात व एकेक विभाग एकेकाचा असतो. यांत एक लहान टुमदार खोपटें, आरामखुर्ची, चहाचें टेबल–खुर्च्या वगैरे असतें. रजेच्या दिवशीं येथें येऊन राहावयाचें व स्वतः माळ्याचें काम करून उघड्यांत बसून चहापान वगैरे मौज करून सायंकाळीं परत शहरांत जावयाचें. सुटीचे दिवस उत्तम रीतीनें घालविण्याची ही चांगली युक्ति आहे.

आज सकाळीं ८–७ चे गाडीनें झूरिचला जाण्यास आम्ही निघालों व रात्रौ ११–१५ ला मुक्कामीं पोचलों. गाडी बाझल मुक्कामीं आली तेव्हां सर्व प्रकारची तपासणी झाली. येथें स्वित्झर्लंड, फ्रान्स व जर्मनी या तीन देशांची हद्द लागते. ऱ्हाइन नदी ही हद्द होय. बाझलला गाडी बदलून रात्रीं झूरिचला दाखल झालों. रात्र असल्यामुळें प्रदेश स्पष्ट दिसला नाहीं, पण डोंगराळ आल्प्स पर्वतांतून जात होतों एवढें समजलें.

ता. २८-७-२८

स्वित्झर्लेंडमध्यें आगगाड्या सर्व विजेच्या शक्तीनें चालतात. आज सकाळीं वेळेवर उठून झूरिचहून ल्यूसर्नला गेलों. झूरिच ते ल्यूसर्न या मार्गावर तीन मोठे तलाव लागतात—एक झूरिच तलाव, दुसरा झग व तिसरा ल्यूसर्नचा. हे तलाव फार मोठे आहेत व त्यांचें प्रत्येकाचें क्षेत्रफळ कित्येक मैल आहे. हा प्रवास ल्यूसर्नचे आजूबाजूचे डोंगरांतून सुमारें ७५ मैलांचा होता. या प्रवासास थॉमस् कुकनें "टेलचे देशांतून प्रवास" असें म्हटलें आहे. टेल् हा महान् स्विस् देशभक्त १२ व्या व १३ व्या शतकांत झाला. त्याच्याच कारस्थानानें सन १२९१ मध्यें ऑस्ट्रियन लोकांना येथून हुसकून लावून स्विस् लोक स्वतंत्र झाले, व १३०७ मध्यें प्रजासत्ताक राज्य स्थापले. स्विस् रिपब्लिक ( लोकसत्ताक ) हें पृथ्वीच्या पाटीवरील सर्वात जुनें रिपब्लिक आहे. सन १२९१ सालीं टेल यानें ज्या ठिकाणीं ऑस्ट्रियन गवर्नरास मारलें ती जागा शाबूत ठेवून त्यावर त्या वेळचें चॅपेल ठेवलेलें आहे. तसेंच टेल हा ज्या गांवीं जन्मला तेथें त्याचें स्मारक करून ठेवलें असून त्याखालीं लेख आहे कीं, "जोंपावेतों स्वित्झर्लेंड आहे तोंपावेतों टेलची विस्मृति होणें शक्य नाहीं." इतिहासाची काय किंमत आहे हें यूरोपांत ठिकठिकाणीं प्रत्ययाला येतें. नाहींतर आपल्याकडील दुर्दशा. उत्पन्न असतांहि कुब्रडीतीर्थाची किंवा रामघळीची अव्यवस्था!! ज्यांनीं स्वराज्य स्थापलें व ज्यांचे गोडवे तोंडानें महाराष्ट्र नेहमीं गातो त्यांचेंहि स्मारक नाहीं, जन्म मृत्युस्थानें तीर्थस्थानें समजलीं जात नाहींत. अजून नुसतीं ३०० वर्षें झालीं नाहींत तोंच ही स्थिति. मग टेलसारखीं ७०० वर्षें झाल्यावर तर काय होईल कोणास ठाऊक!

ता. २९-७-२८

ल्यूसर्न हें सृष्टिसौंदर्याचें व हवा खाण्याचें ठिकाण असल्यामुळें सर्व यूरोपांतून लोक येथें येतात. अमेरिकनांची संख्या तर पुसूंच नये.

येथील स्त्रियांमध्येंहि जर्मनीप्रमाणेंच केस कापविण्याचा प्रचार प्रमाणांत पुष्कळ कमी. स्त्रिया उंच, सशक्त, नाकाडोळ्यांनीं सरस. आतांपावेतों ज्या युरोपियन स्त्रिया पाहिल्या त्यांमध्यें स्वित्झर्लंडच्या स्त्रियांमध्यें सौंदर्य —सहज—सौंदर्य विशेष.

स्वित्झर्लंडमध्यें स्विस् अशी स्वतंत्र भाषा नाहीं. जर्मन भाषेचाच एक पोटभाग आहे. जर्मन, फ्रेंच व इटालियन अशा तीन भाषा प्रचारांत आहेत व सामान्यपणें सर्व स्विस् लोकांना या तिन्ही भाषा येतात. स्विस् पार्लमेंटांतहि या तिन्ही भाषा चालतात.

ता. ३०–७–२८

आज सकाळीं ल्यूसर्नहून इंटर लाकनला निघालों. वाटेंत एक घाट चढावा लागतो. त्यामुळें वरचेवर देखावे फारच मनोहर दिसतात. देखावा पहात मी तर जवळ जवळ दोन तास उभाच होतों, बसावेंसें वाटेनाच.

ता. ३१–७–२८

आल्प्स पर्वताच्या युंगफ्रौ नांवाच्या हिमशिखरावर आज सकाळीं जावयाचें असल्यामुळें सर्वजण लौकर तयार झालों. सर्व स्वित्झर्लंडच आल्प्स पर्वतमय आहे. युंगफ्रौ ( Jungfrau ) शिखरावर जाण्यास आतां थेटपावेतों रेल्वे झालेली आहे. या रस्त्यावर ट्रुमेलबाक धबधबाहि पाहाण्यालायक आहे.

धबधब्याच्या ठिकाणीं पोचण्यास स्टेशनपासून सुमारें ८–१० मिनिटें लागतात. तेथें पोंचल्यावर पहाण्याची फी दर माणशीं १ फ्रांक ६० सेंटिम द्यावी लागते. हा धबधबा अपूर्व आहे यांत शंका नाहीं. धबधबा अपूर्व म्हणण्यापेक्षां तो दाखविण्याची व पहाण्याची सरकारनें केलेली सोय अपूर्व आहे असें म्हटलें पाहिजे. पर्वताच्या शिखरावरील हिमगिरी उन्हानें वितळून त्याचे पाण्यानें हा धबधबा होतो. सुमारें १३००० पेक्षां जास्त

फुटांच्या उंचीवरून पाणी येत असल्यामुळें त्यास जोर आहे. हें पाणी बाहेरून उघडें पडत नसून मोठमोठ्या कड्यांच्या ज्या मोठाल्या भेगा आहेत त्या भेगांचे आंत मोठीं भगदाडें करून त्यांतून जोरानें पडत असतें. तें पहाण्यासाठीं दगडांच्या भगदाडांच्या आंत गॅलेऱ्या बांधून पाणी दिसावें म्हणून आंतून विजेचे दिवे लावलेले आहेत. अगदीं खालच्या बाजूस तर पाणी इतकें जोरानें पडतें व इतके तुषार उडतात कीं छत्री घेऊन उंच गॅलेरींत उभें असतांनाहि भिजावयास होतें. तेथून पुढील अंगास भगदाडांत पहावयास जाण्यासाठीं सुमारें २०० फूट वर भगदाडांतून जावयाचें, त्यासाठीं डोंगरांत भोगदा कोरून एक पाण्याच्या अथवा विजेच्या शक्तीनें चालणारा लिफ्ट केला आहे. त्यांतून वर गेल्यावर आणखी वर भगदाडांत वांकड्या तिकड्या वळणानें चढावयाचा मार्ग व पायऱ्या करून आंत पाण्याच्या वरच्या अंगानें गॅलेऱ्या व खालीं विजेचे दिवे अशी व्यवस्था आहे. आंत गेल्यावर निसर्गाचें व मनुष्य-प्रयत्नाचेंहि मोठें कौतुक वाटतें. फार आंत गेल्यावर तर भीतीसुद्धां वाटते. एकच धोंडा जरा सरकण्याचा अवकाश—पहावयास आलेल्या शेंकडो लोकांच्या हाडांचाहि पत्ता लागावयाचा नाहीं. निसर्गाचें अजस्र स्वरूप व शक्ति संथपणें पहातां येत होती व मनुष्यानें स्वतःच्या ज्ञानाची व पौरुषाची कितीहि फुशारकी मारली तरी निसर्गापुढें मनुष्य कःपदार्थ आहे ही जाणीवहि पटत होती.

हा प्रेक्षणीय धबधबा व स्विस् सरकारनें लोकरंजनाकरितां केलेले प्रयत्न व परदेशीयांस आपल्या देशांत पैसा खर्चण्यासाठीं आणण्याच्या लालुची यांचें कौतुक करीत आम्ही परत फिरलों. नंतर घाईघाईनें दुसरी गाडी साधून लॅाटर ब्रून स्टेशनवरून निघालों ते गाडीनें घाटा-वरून चढत चढत शायडेगपावेतों आलों. शायडेगपावेतों प्रवासांत उंच उंच डोंगर, खोरीं, ओहोळ व मधून मधून हिमगिरीचें दूर दर्शन असा सामान्य देखावा होता. शायडेगपासून हिमगिरी अगदीं जवळ व समोर दिसूं लागले. शायडेगची उंची समुद्रसपाटीपासून ६७७० फूट आहे. तेथून पुढें २८५ फुटांचा एक भोगदा लागतो व लगेच गाडी

भोगद्याच्या बाहेर येऊन मॉंक, आयगर व युंगफ्रौ हीं हिमगिरीचीं टोकें व हिमगिरी अगदीं गाडींतून हात लावतां येईल इतक्या जवळ दिसूं लागतात. बर्फाच्छादित खोऱ्यांपेक्षांहि उंचीवर गाडी असल्यानें खालीं, वरतीं, समोर सर्व बर्फच दिसतें. नंतर गाडी आयगर ग्लेशीयर स्टेशनवर थांबते. येथेंहि हॉटेल वगैरे सर्व सोय आहे.

येथून पुढला सर्व प्रवास ५ मैल लांब भोगद्यांतून आहे. ज्या खडकांतून हा भोगदा आहे त्याच्याबाहेर सर्व बर्फ असतें व युंगफ्रौ टोकाच्या जवळ या भोगद्याचें टोंक आहे. यापुढील युंगफ्रौ ( उंची ११३४० ) पर्यंतचीं तिन्ही स्टेशनें या भोगद्यांतच खडकांत कोरलेलीं आहेत. वाटेंतील दोन्ही स्टेशनांवर भोगद्याच्या खडकाच्या बाजूस मोठालीं भगदाडें पाडून सर्व हिममय पर्वतप्रदेश पहातां यावा म्हणून गॅलेऱ्या केलेल्या आहेत. गाडी स्टेशनवर थांबली कीं गार्ड इंग्रजी व जर्मन भाषेंत ओरडतो कीं गाडी अमुक मिनिटें थांबते, कीं लगेच सर्व पॅसेंजर एखाद्या आधाशाप्रमाणें या कैलासाचें दर्शन घेण्यासाठीं धांवत जातात. ५ ते १० मिनिटांवर गाडी थांबत नाहीं. पण तेवढ्यांत ह्या दर्शनानें धन्य वाटतें. स्टेशनांवर चहा, कॉफी, खाणें वगैरेसाठीं रेस्टोरां आहेत. ही सर्व व्यवस्था खडकांतच कोरून केलेली आहे. आंत गेल्यावर आपण खडकांत आहोंत हें मुद्दाम सांगितल्याशिवाय समजणें शक्य नाहीं.

सर्व पाहून व डोळ्यांची कृतार्थता अनुभवून सायंकाळीं ७॥ वाजतां इंटर लाकनला परत आलों. आज जो देखावा पाहिला तो अपूर्व यांत शंका नाहीं. प्रत्यक्ष कैलासदर्शनच–स्फटिकमय, शुभ्र व भव्य धवलगिरी. हिमालयांतील हिमगिरी पहाण्याचा योग केव्हां येईल तो सुदिन. हा हिमगिरी पहाण्यास दररोज हजारो लोक येत असतात. सर्व देशींचे लोक येतात, त्यांतल्या त्यांत अमेरिकनांची संख्या अतोनात.

**ता. १–८–१९२८**

आज सकाळीं ९–३ चे गाडीनें निघून दुपारीं ३–४ वाजतां जिनीव्हा मुक्कामीं पोचलों. आज सर्व स्वित्झर्लंडमध्यें राष्ट्रीय दिवस असल्यामुळें

जिकडे तिकडे आनंदी आनंद आहे. राष्ट्रीय ध्वजाचीं कोटावर अडकविण्याचीं चिह्नें विकावयास स्विस् मुली व बाया पुरातन काळचा पोषाख घालून फिरतात.

स्विस् लोकांत कलाकौशल्य फारच चांगलें आहे. घड्याळांचे सुमारें ४०० कारखाने आहेत, असें सांगतात.

ता. २–८–१९२८

आज सकाळीं ७ वाजल्यापासून सायंकाळीं ८ पर्यंत ग्रेट सेंट बर्नार्डचा मठ व स्वित्झर्लंडच्या पर्वतराजींचीं नैसर्गिक शोभा पहाण्यांत काळ घालविला. वाटेंत जातांना पुष्कळच खेडीं लागलीं. खेड्यांतून गरीबी उघड दिसली. शेतकऱ्यांचीं घरें सर्व लांकडी—आपल्याकडे डोंगरी घरें असतात त्यापेक्षां उच्च दर्जाचीं नव्हतीं. शेण वगैरे खत घराच्या आंगणांतच सांठवण्याचा प्रचार पाहिला.

सेंट बर्नार्डचे मठांत साधू राहातात. ईशचिंतन, विद्याभ्यास वगैरे करून पर्वतांतून चुकल्यामुकलेल्यांस व इतरांस आश्रय, औषधपाणी वगैरे पूर्वी ते देत असत. पण आतां रोज शेंकडो लोक पहाण्यासाठीं येऊं लागल्याकारणानें त्या सर्वांना पाहुणचार देणें मठाच्या शक्तीबाहेरचें झाल्यामुळें तेथें एक हॉटेल स्थापलें आहे. या मठांत शिकविलेले कुत्रे ठेवलेले आहेत. अडीअडचणींत माणसांना मदत करण्यास त्यांना शिकविलेलें असतें. थंडीच्या दिवसांत येथें सर्व बर्फमय होतें तेव्हां तर या कुत्र्यांची फारच मदत होते असें सांगतात.

ता. ३–८–२८

आज सकाळचे गाडीनें वेनिसला निघालों. आम्ही जात होतों ती गाडी इंटरनॅशनल होती, तरी पण थांबत असे. ब्लुईग नांवाचें स्विस् हद्दीचें शेवटचें स्टेशन आल्यावर डोंगर ओलांडला कीं इटालीची हद्द. पण एवढा मोठा पर्वत चढण्या–उतरण्याऐवजीं त्याच्याखालून भोगदाच

केला आहे. तो ७–८ मैल तरी असावा. तो ओलांडतांच इटालियन हद्द आली व गाडीचे सर्व अंमलदार इटालियन झाले. आमची भाषेची पंचाईत थोडी वाढली.

इटालियन हद्दींत शेतीवाडी बरी दिसली. लोकांचीं राहाण्याचीं घरें हिंदुस्थानी वळणावरचीं वाटलीं. गरीबीहि घरांच्या बाह्य स्वरूपावरून स्पष्टच दिसत होती. उकाडा जवळ जवळ आपल्या इथल्यासारखाच. त्यामुळें गाडींत कपडे वगैरे सर्व अवकड घालून जसे इंग्लंडांत लोक असतात तसा प्रकार नव्हता. कोट खुशाल काढून स्टेशनवर फिरणारे लोक आढळले. हवामानाप्रमाणें चालीरीतींत फरक होत जातो त्याचें उत्तम उदाहरण.

गाडी रात्रीं १२॥ वाजतां वेनिसला आली. स्टेशनहून हॉटेलमध्यें होडींतून आलों. या होड्यांस 'गोंडाला' म्हणतात. येथें सर्व शहर पाण्यांत असल्यामुळें एका घराहून दुसरीकडे जाण्यास रस्ते म्हणजे पाण्याचेच. गाड्याघोड्यांच्या ऐवजीं होड्यांचा ऊर्फ गोंडालांचा व्यवहार.

ता. ४–८–२८

वेनिस हें फार पुरातन प्रख्यात शहर आहे. तेथें पूर्वीपासून प्रजा-सत्ताक राज्य असे. कलाकौशल्य, व्यापार, धाडस व दर्यावर्दीपणामध्यें वेनिस फार पुढें आलेलें आहे.

वेनिसच्या प्रजासत्ताक अध्यक्षास 'डोगे' (Doge) म्हणत असत. कॅथीड्रलच्या शेजारीं डोगेचा राजवाडा आहे. डोगेची निवडणूक वेनिसची सर्व प्रजा करीत असे. या राजवाड्यांतील राजकीय कैद्यांचा तुरुंग, त्यांच्या तपासाच्या कोर्टाची जागा व शिक्षेची जागा वगैरे पाहिली. तुरुंग पाहातांच अंगावर शहारेच येतात. अशा ठिकाणीं कैदी कसे राहिले असतील, परमेश्वरास माहीत! कोर्टाचे जागेहून वधस्थानाकडे किंवा तुरुंगांत नेण्यास ज्या पुलावरून जावें लागे त्यावरून जातांना जो उजेड दिसेल त्यानंतर त्या कैद्यास पुनः सूर्यप्रकाश नसावयाचा. त्यामुळें

त्या पुलावरून जाणारा कैदी आयुष्य संपलें म्हणून निःश्वास टाकीतच जाई व त्यावरून त्या पुलाचें नांव 'निःश्वास पूल' ( Bridge of sighs ) पडलेलें आहे.

नंतर येथील कारागिरी पहावयास आम्ही एका दुकानांत गेलों. कांचेचें सूत काढून त्याच्या परड्या वगैरेचें काम पाहून कौतुक वाटलें. सर्व कला हाताचीच असल्यामुळें या वस्तू अथार्तच फार महाग असतात; चहाच्या एका सेटची किंमत १०–१५ पौंड होती. पण कलेच्या मानानें किंमत जब्बर असें म्हणतां येणार नाहीं. हे लोक सर्वांस मुद्दाम या कला दाखवून आपला माल कसा खपवितात व कला कायम कशा ठेवतात, त्याचें अनुकरण आपण करण्याची अत्यंत आवश्यकता आहे. आपल्या-कडील श्रीमंतांनीं येथील श्रीमंतांचें अनुकरण करून पैशाकडे न पहातां स्वदेशीय कारागिरी जर जिवंत ठेवली नाहीं तर येथील प्रगति पहातां आपण थोड्याच काळांत नामशेष होऊन जाऊं अशी मोठी भीति वाटते.

येथें चीजवस्त खरीदनांना "एकच किंमत" हा रिवाज नाहीं. किंमतीसाठीं घासाघीस करणें जरूर पडते.

स्त्रियांनीं बिन बाह्यांचे झगे घालून चर्चमध्यें येऊं नये अशीहि एक सूचना येथें दिसली. ती वाईट नाहीं, इष्टच आहे.

ता. ५–८–२८

आज सकाळीं ११। चे गाडीनें वेनिसहून फ्लॉरेन्सला निघालों. फ्लॉरेन्सला येथें Firenze ( फिरन्झ ) म्हणतात. गांव फार जुना आहे. येथें पुष्कळ कवी, चित्रकार वगैरे होऊन गेले. चित्रकला व शास्त्रें यांचा विकास येथें पूर्वी विशेष. येथें पुष्कळ देवालयें आहेत तीं पहाण्या-लायख आहेत. शहरांत शिरतांच जुनेपणा दिसून येतो. लहान गल्ल्यांचाहि सुकाळ दिसतो. गांवाचे मधोमध नदी असून तिच्यावर पुष्कळ पूल दळणवळणासाठीं आहेत. शहरास चारी बाजूनें डोंगर असून मध्यें खोलवट्यांत वसलेलें आहे. इतर युरोपियन शहरांच्या मानानें

हें शहर घाणेरडें. एकंदरींत इटालींत स्वच्छता त्या मानानें कमीच. लोक वाटेल तेथें रस्त्यावर थुंकणारे जास्त. गरीबी विशेष. प्रामाणिकपणा किंवा एकवचनीपणाहि कमीच—वस्तूची वाटेल ती किंमत सांगावयाची व मग घासाघीस करावयाची. असे प्रकार युरोपांत इतरत्र दिसले नाहींत.

फ्लॉरेन्स पूर्वी प्रजासत्ताक राज्य होतें व त्यानंतर 'मेडिची' नांवाचें कुटुंब मुख्याधिकारी (ग्रांड ड्यूक) म्हणून राजेवजा अंमल चालवीत होते. चित्रकला, गायन इ. कलांच्या बाबतींत फ्लॉरेन्सची ख्याति फार. प्रख्यात गॅलिलिओ * याच शहरांत झाला. सुविख्यात माकियाव्हेली § इथलाच. मायकेल ॲंगेलो, † डान्टी $ वगैरे येथीलच. नररत्नांची—विशेषेंकरून इटालियन नररत्नांची—हें शहर म्हणजे खाणच होतें.

डान्टीचें घर पाहिलें. हें व याच्या समोरचा रस्ता अस्सल स्थितीमध्यें कायम ठेवला आहे. इतिहास प्रियतेचें आणखी एक उदाहरण!

ता. ७–८–२८

आजरोजीं सकाळीं येथील कॅसिनोमध्यें कै. श्रीमच्छत्रपती राजाराम महाराजांची छत्री आहे तिच्या दर्शनास गेलों होतों. महाराज सन १८७० सालीं आपल्या वयाच्या २१ व्या वर्षी इंग्लंडहून स्वदेशीं परत जात असतां वाटेंत येथें ता. ३० नोव्हेंबर १८७० रोजीं स्वर्गवासी झाले. त्यांस दहन केल्याजागीं ही छत्री आहे. जागा एका विस्तीर्ण व वृक्षराजीमय अशा बागेच्या शेवटीं आर्नो नदीच्या कांठावर व एकंदरींनें आपल्या दृष्टीनेंहि छत्रीस सर्वथैव योग्य अशाच ठिकाणीं आहे. या जागेस 'इंडिया नो' नांवानें ओळखतात.

छत्रीवर स्मारकलेख आहे. तो चार भाषेंत चारी बाजूंना आहे. छत्रीमध्यें अर्धपुतळा बसविला आहे व त्याचे चौकोनी आसनावर लेख

---

* ज्योतिःशास्त्रज्ञ. § कुटिलराजनीतिधुरीण. † चित्रकार. $ तत्त्वज्ञ-कवि.

आहेत. पुतळ्याच्या समोरचे बाजूस इटालियन भाषेंत, डाव्या अंगास मराठी भाषेंत, मागच्या बाजूस संस्कृत भाषेंत व उजव्या अंगास इंग्रजींत आहे. देशी भाषांमध्यें येथें लेख ठेवून संस्कृत व मराठीचा झेंडा लॅटिन भाषेच्या मायघरांत रोवल्याबद्दल साभिमान आनंद वाटला. अक्षरें सोनेरी आहेत. तीं स्पष्ट दिसावीं म्हणून काळीं असतीं तर जास्त बरें झालें असतें. आम्ही दुर्बिणीच्या साह्यानें वाचलें. या बाबतींत श्रीमत् करवीर छत्रपतींस रोमहून पत्र लिहिण्याचा विचार आहे.

दुपारीं निघून सायंकाळीं ७–१५ ला रोम मुक्कामीं पोंचलों. हा प्रवास टस्कनी प्रांतांतून होता. शेती बरी दिसली. गरिबी जास्त वाटली. शेतांत बाया उघड्या पायांनीं काम करतांना दिसल्या. बैलगाड्या व नांगरासाठीं बैलांचा उपयोग आपल्या इकडल्याप्रमाणेंच दिसला. शेतीचीं आउतें मात्र सर्वत्र युरोपांत नवीन तऱ्हेचीं सुधारलेलीं दिसत, त्याचप्रमाणें येथेंहि होतीं.

आमच्याबरोबर कित्येक तरी अमेरिकन प्रवासास होते. प्रवास हें शिक्षणाचें आवश्यक अंग असें अमेरिकेंत सर्वत्र समजलें जातें.

सायंकाळीं हॉटेलांत पोंचल्याबरोबर पोर्टरनें अमदाबादची तार माझे हातीं आणून दिली. सौभाग्यवती ता. ३ रोजीं प्रसूत होऊन पुत्ररत्न झाल्याची बातमी होती. या तारेमुळें जीव थोडा खालीं पडला. काळजीचें कारण नाहींसें झालें.

ता. ८–८–२८

आज रोम शहर पहावयास जावयाचें होतें. सकाळच्या सफरींत मुख्य पहावयाची गोष्ट म्हणजे वॅटिकन. गांवांतून राजवाड्यावरून जाणाऱ्या रस्त्यानें वॅटिकनला गेलों. ख्रिस्ती धर्माचे शंकराचार्य पोप यांच्या राजधानीचें शहरहि रोम आहे. त्यांचा वॅटिकन नांवाचा मोठा राजवाडा येथें आहे. हा राजवाडा असामान्य आहे. एकंदर इमारतींनीं १३ एकरांवर जागा व्यापली असून त्याला २० मोठाले चौक आहेत. हल्लीं

या वॅटिकनच्या भागांत पोप स्वतः राहात असून बाकीच्या भागांत पुतळे, चित्रें, पुस्तकें यांचा संग्रह ठेवला आहे.

नंतर खास पहाण्यासारखी गोष्ट म्हणजे रोममधील कॅटॅकूंब. रोममध्यें ज्यावेळीं ख्रिस्तीधर्म हा राजधर्म नव्हता त्यावेळीं ख्रिस्ती लोकांवर अनन्वित जुलूम होत असत व त्यांस आपल्या धर्मपालनासाठीं गुप्त जागा कराव्या लागत. मृतास पुरणें व त्यास शेवटची ख्रिस्ती धर्माप्रमाणें प्रार्थना करणें या गोष्टी राजरोस करतां येत नसत. तेव्हां रोमच्या आजूबाजूस जमिनीमध्यें तीन तीन, चार चार व पांच पांच मजले खोल खोदून वाटा करून त्यांत बाजूंच्या भिंतींत प्रेतांसाठीं कोनाडे करून, त्यांत प्रेतें पुरत असत व त्यांतच मधून मधून जास्त जागा कोरून प्रार्थनेसाठीं जमावाची जागा करीत असत. यास 'कॅटॅकूम्ब' म्हणतात. त्याचा अर्थ पृथ्वीच्या पोटांतील मजलेवाली स्मशानभूमि. मतांच्या असहिष्णुतेमुळें मनुष्यानें दुसऱ्या मनुष्यांवर किती जुलूम केला व निष्कारण जुलुमांतून बचावण्यासाठीं किती यातायात व श्रम करावे लागले याचें हें उत्तम उदाहरण आहे.

कॅटॅकूम्बमध्यें जो पाद्री मठ आहे त्यांतील साधू कधींहि विगतवस्त्र होत नाहींत. निजतांनासुद्धां कपडे घालून निजतात. ध्यानस्थ असतां एकमेकांशीं बोलत नाहींत व कोणत्याहि तऱ्हेचें मांसाशन करीत नाहींत. लांब काळे झगे घालतात व डोक्यावर केस फार ठेवीत नाहींत, पण वाटोळा घेरा केशगुच्छांचा असतो.

ता. ९-८-२८

इमॅन्युअल राजाचें स्मारक, मार्कस ऑरेलियसचा स्तंभ, पॅंथीअन देऊळ व इटालीचें फॉरीन ऑफीस पाहून आम्ही जुन्या रोम शहराचे ठिकाणावर गेलों. रोमन बादशाह, सीझर वगैरेंचे राजवाडे, मंदिरें पूर्वी सर्व तेथें होतीं. हल्लीं तेथें कांहीं नाहीं, पण पडक्या भव्य इमारतींचे अवशेष आहेत. त्यावरून त्या काळच्या रोमन लोकांच्या राहाणीकरणीची,

पराक्रमाची, ऐश्वर्याची कल्पना येऊं शकते. ज्यूलिअस सीझरचें मृत शरीर ज्या जागीं आणून मार्क अँटनीनें आपलें प्रसिद्ध भाषण रोमन शहरवासीयांस उद्देशून केलें ती जागाहि दाखविण्यांत आली.

बुर्गीस म्यूझियममध्यें पुतळ्यांचा व चित्रांचा उत्तम संग्रह आहे. असें सांगतात कीं यांतील एका चित्राची ३५ लक्ष फ्रँक किंमत परदेशीय देत होते; पण मालकानें तें चित्र परदेशीयांस न विकतां त्या किंमतींत सर्व मिळकत संग्रहासुद्धां इटालियन राष्ट्रास—सरकारास—विकली. देशाभिमानाचें व आपलेपणाच्या राष्ट्रीयत्वाचें उत्तम उदाहरण.

नंतर स्काला स्कांटाच्या मंदिरांत आलों. स्काला स्कांटा म्हणजे पवित्र पायऱ्यांचा जिना. पायलेट येथील न्यायमंदिरांतून कॅलबेरीस जातांना येशू ख्रिस्त याच पायऱ्यांवरून उतरले होते, त्यामुळें हा जिना फार पवित्र आहे. तो संगमरवरी असून जेरूसलेमहून आणलेला होता. यावर ख्रिस्ती लोक पाय ठेवीत नाहींत. गुडघ्यांनीं वर चढून जावयाचें. यास २८ पायऱ्या आहेत व पायरीगणिक ९ वर्षें नरकवासांतून मुक्तता मिळते; पण भाविकपणें येशूनें मनुष्यजातीसाठीं जो त्रास सोसला त्याचें स्मरण करीत चढणारांसाठीं हें आहे.

रोममध्यें ख्रिस्ती लोकांचा पुष्कळ छळ झाला व कित्येक महात्मे मारले गेले, पण अखेर ज्या जागीं महात्म्यांनीं स्वात्मार्पण केलें तेथेंच ख्रिस्ती देवळें झालीं. ही त्यागाची व काळाची केवढी महती !

ता. १०—८—२८

रोममध्यें ठिकठिकाणीं फिरतांना दोन गोष्टी आढळून येतात. एक ही कीं जेवढीं जेवढीं जुनीं ऐतिहासिक स्थानें आहेत त्या सर्वांचा जीर्णोद्धार कोणत्या ना कोणत्या तरी प्रकारें करण्याचे हुकूम मुसोलिनीच्या सरकारनें काढलेले आहेत. हे हुकूम म्हणजे केवळ कागदी घोडे नाहींत, कोट्यवधी रुपयांचा खर्च आहे.

दुसरी गोष्ट रोममध्येंच नव्हे तर फ्लॉरेन्स, वेनिस वगैरे ठिकाणींहि दिसली ती ही कीं कलाकोशल्याचीं किती तरी कामें नेपोलियन बादशाहानें

पारिसला नेलीं. नेपोलियन केवळ आडदांड लष्करी मनुष्यच नव्हता तर कलेचा भोक्ताहि होता हें यावरून दिसतें.

येथें शिल्पशिक्षणासाठीं जगांतील प्रत्येक देशानें आपली एक एक शाळा (academy) ठेविली आहे. हिंदी अ‍ॅकॅडेमी कोठें आढळली नाहीं. त्या त्या देशच्या विद्यार्थ्यांस शिक्षण व चित्रकलेचें ज्ञान त्या त्या देशचे भाषेंत त्या अ‍ॅकॅडेमींत मिळण्याची सोय आहे.

## ता. ११–८–१९२८

आज नेपल्सला निघालों. नेपल्स हें एक मोठें बंदर आहे. येथून वेसुवियस पर्वत जवळच आहे व दिवसा धुराचा लोट दिसत होता. मधून मधून लालभडक असा आगीचा भडका दिसत होता. हल्लीं वेसुवियसमध्यें कांहीं दिवस जास्त खळबळ असून जास्त लाव्हा येतो असें आजच लंडन टाइम्समध्यें वाचलें.

## ता. १२–८–२८

सकाळीं ७। चे सुमारास आम्ही निघालों. नेपल्स शहर फार मोठें आहे. थेट पॉम्पी शहरापावेतों नेपल्सला लागून आलेलीं निरनिराळीं गांवें आहेत.

पॉम्पी शहर नेपल्सहून सुमारें २२–२५ मैल येईल. अस्सल पॉम्पी शहर नष्ट झालें. त्याचे अवशेष पहावयाचे. नवें पॉम्पी शहर या जुन्या शहराच्या बाजूला वसलेलें आहे.

पॉम्पी हें मूळ इ. स. पूर्वी ६ व्या शतकांत वसलें. समुद्रकिनारीं व डोंगरावर चोहोंबाजूंनीं भिंती बांधून किल्ल्यासारखें केल्यामुळें हें महत्त्वाचें ठिकाण होतें. शेवटीं रोमन लोकांच्या ताब्यांत होतें. वेसुवियस पर्वताचा एक भाग–त्यास 'माउंट सोना' म्हणतात–त्याचे खालीं ३–४ मैलावर हें शहर होतें. प्रथम या शहराचें इ. स. ६३ मध्यें धरणीकंपानें नुकसान झालें व नंतर इ. स. ७९ मध्यें सोना ज्वालामुखीच्या स्फोटामुळें राख, दगड, विषारी धूर वगैरेमुळें समूळ नाश झाला. त्यावेळीं शहरांत

२०००० वस्ती होती. त्यांतून १८००० लोक सर्व तसेंच टाकून पळाले. २००० लोक जाऊं शकले नाहींत. ते होते त्याच स्थितींत मृत्यु पावले. अदमासें २० फूट जाड राखेचा थर सर्व शहरावर बसला होता. इ. स. १८७२ चे सुमारास सर्व शहर संपूर्ण उकरून काढलें. त्यावेळीं मृत माणसें निरनिराळ्या स्थितींत सांपडलीं. सर्व शहर—अर्थात् गतप्राण—तसेंच्या तसेंच सांपडलें. त्यामुळें त्या काळचा इतिहास व प्रगति यांच्या अभ्यासास फारच उपयोगी.

पॉम्पी पाहून जवळच पायथ्याशीं असलेल्या हॉटेलांत लंच घेऊन पुढें वेसुवियस पहावयास निघालों. पोंचण्यास सुमारें पाऊण तास लागला. तेथून पुढें वेसुवियसचे माथ्यावरचा प्रवास रेल्वेनें. या रेल्वेनें वर चढतांना आसपासचा फारच रम्य देखावा दिसतो. सर्व डोंगर व त्यावर वसलेलीं लहान लहान शहरें. सर्व वस्ती सिंहाच्या जबड्यांतच आहे म्हणावयाची! वेसुवियसचा स्फोट केव्हां, कोठें व कसा होईल हें कोणी सांगावें ? निसर्गाचा वेसुवियसरूपी क्रूर जबडा आणि होमकुंड व नुकत्याच पाहून आलेल्या पॉम्पी शहराच्या दुर्दशेची आठवण झाली कीं सुरक्षितपणा कमी वाटावा यांत आश्चर्य नाहीं. वेसुवियस रेल्वेंतून चढतांना जवळ जवळ पायथ्यापासूनच १९०६ सालच्या स्फोटाचा लाव्हा रस दिसूं लागतो, तेव्हां तर विशेषच वाटतें. तेथील लोक मुठींत जीव धरूनच राहातात. संवयीनें जाणीव बोथट झाली इतकेंच. सुरक्षिततेसाठीं इटालियन सरकारनें ठिकठिकाणीं मोठमोठें दगडी बांध घातले आहेत; पण हत्तीपुढें मशक काय होय ? या रेल्वेच्या मध्यावरच ‘एरोपो’ नांवाचें एक लहानसें हॉटेल कुक कंपनीनें ठेवलें आहे. निसर्गाचें पहावयाचें स्वरूप रम्य असो, सौम्य असो, रुद्र असो, युरोपियन लोकांनीं प्रवासाच्या व सुखाच्या सोयी सर्वत्र जागोजाग केलेल्या आहेत—युंगफ्रौ हिमगिरींत हॉटेल व वेसुवियस ज्वालामुखीवरहि हॉटेल !

अगदीं वर पोंचलों त्या डोंगराच्या आंतल्या अंगास ज्वालामुखीचें तोंड. हा डोंगर चारी बाजूंनीं कडा तुटलेला असून त्याचें जणूं मोठें वाटोळें होमकुंड व आंत कांहीं वाटोळी मोकळी जागा सोडून मधोमध

एक मोठा कोण उभा असा दुसरा छोटा पर्वत, त्याचें वरचें तोंड खुलें व त्यांतून एकसारखे प्रचंड धुराचे लोट निघत होते. मधून मधून एकसारखा त्याच्या पोटांतून आवाजाचा गडगडाट येत होता व कांहीं कांहीं वेळानें खूप जोरानें उंच लाल लाल भडक असे गोळे—काळ्या पापुद्या वगैरे उडत होते. ते बहुधां पुनः आंतच पडत व क्वचित् उसळून बाहेर पडत. धुराचे लोट मधून मधून गंधकामुळें पिवळे दिसत व मधून मधून लालभडक दिसत. या कोणपर्वताच्या आजूबाजूची व आम्ही ज्या कड्यावर उभे होतों, त्याच्या खालची जी सपाट जागा ती सर्व लाव्हानें माखलेली होती व त्यांतच एक तोंड आणखी नवीन फुटलेलें होतें. त्यांतून धूर निघतच होता. मंडळी अगदीं खालपावेतों जात असत. आम्हांस तेथपर्यंत जाण्यास वेळहि नव्हता व रस्तासुद्धां फार कठीण होता. शिवाय पाहिजे तेथें ज्वालामुखीचें तोंड फुटण्याचा संभव. अशा ठिकाणीं जाणून बुजून होमकुंडांत पडण्याचें काय कारण ? ज्या जागीं नवीन तोंड फुटलें तेथें जवळच लोक पहावयास गेलेले होते त्यांना तेथून पळावें लागलें असें तेथें समजलें. या स्थितींत आम्ही घेतली तेवढी जोखीम पुरे असेंहि वाटलें.

याप्रमाणें ईश्वरी कृतीचें रुद्र निसर्गरूप मुग्धतेनें पहात व सृष्टिशोभेबरोबरच पॉम्पीचे अवशेषांकडे पहात मनुष्याच्या अल्पतेचेहि विचार करीत करीत आम्ही कांहीं वेळ उभे होतों. 'ईश्वर करणी अघटित लीला', 'बहुरत्ना वसुंधरा' असे विचार मनांत येत होते.

सुमारें ५॥ चे सुमारास नेपल्सला परत आलों. इटालींत प्रत्येक ठिकाणीं ऐतिहासिक गोष्टींचा व स्थानांचा जीर्णोद्धार दिसत आहे. शहरांस नवीन तऱ्हेनें सजवून स्वच्छ करण्याचाहि सपाटा दिसला. सर्व बाजूंनीं ही सुधारणा मुसोलिनी आल्यावेळेपासून झाली असून हल्लीं इटालींत प्रत्येकजण स्वकर्तव्यरत झालेला आहे, नियमाभावाची अव्यवस्था नाहीं असें तेथील लोक सांगत होते. सर्वांस मुसोलिनी सामान्यपणें फारच प्रिय आहे असें दिसलें.

ता. १४–८–२८

सकाळीं ७ वा. गाडी जिनोवास आली. १२ वाजतां आम्ही वेंटिमिली स्टेशनवर आलों. इटाली व फ्रान्स यांची ही सरहद्द. येथून आम्ही इटाली सोडून फ्रान्सांत शिरलों. इटालींत आम्हांस खाण्यापिण्याची सोय प्रमाणांत फार चांगली झाली. त्या लोकांत भात खाण्याची पद्धति असल्यामुळें आम्हांस भात चांगला मिळे.

जिनोवा ते नीस हा सर्व प्रवास भूमध्यसमुद्राचे कांठानें व मध्य-युरोपाचे दक्षिण भागानें आहे. सुमारें तीन वाजतां नीस मुक्कामीं पोचलों. खाणें वगैरे आटोपून सायंकाळीं समुद्रकिनारीं फेरफटका करावयास निघालों. हजारो लोक–स्त्रिया, पुरुष व मुलें–समुद्रांत आंघोळ करीत होते.

भोजनोत्तर येथील कॅसीनोंत गेलों होतों. इंग्लंडांतील व्हरायटीप्रमाणें खेळ, नाच होते. मध्यंतरीं प्रयोग बंद ठेवून नुसता नाचांचाच बँड वाजवितात व त्यावेळीं ज्यांस नाचावयाची इच्छा असेल अशी येथील मंडळी नाचतात, हा विशेष दिसला. इमारतीचा, त्यांतील दिव्यांचा, आंत येणाऱ्या मंडळीच्या पोषाखाचा, नखरेबाजपणाचा सर्वत्र झगझगाट होता. यांत कलेचा अंश असला तरी पण युरोपांत आयुष्याचें ध्येय केवळ ऐहिक व शारीरिक सुखलालसा–तृप्ति यापलिकडे असावें असें दिसत नाहीं.

ता. १५–८–२८

आजची ऑटोकारची फेरी जवळ जवळ ७५ मैलांची होती. सर्व डोंगरांतून हा प्रवास होता. हा प्रदेश पाहून मला सह्याद्रीची व विशेषें-करून १९२६ सालीं मावळंग्याहून चिपळूण, परशुराम व सातारा या प्रवासाची आठवण झाली. १९२५ च्या डिसेंबरांत विशाळगडाहून कशेळीस परत जातांना माचाळावरून केलेला प्रवास व सृष्टिशोभा यांची आठवण झाली. फरक इतकाच–व तो लहान नाहीं–कीं येथें साधन-संपन्नता असल्यामुळें मनुष्यप्रयत्न व निसर्गाबरोबरच मनुष्यकला हीं दोन्ही एकदम दिसतात.

मॉंटेकार्लोला एक तास थांबावयाचें. तेवढ्या वेळांत येथील जगद्‌-विख्यात कॅसीनोमध्यें गेलों. हा जगांतील मोठा विख्यात जुगारखाना आहे. मॉंटेकार्लो हें लहानसें स्वतंत्र राज्य फ्रेंच संरक्षितांपैकीं आहे. या राज्यांतील लोकांना कर मुळींच द्यावे लागत नाहींत. कारण स्वतःचे लाखो आणि कोट्यवधी रुपये येथें जुगारखान्यांत गमविण्यास सर्व जगांतून मूर्ख लोक येत असतात; त्यांच्या आमदानीवर सर्व राज्याचा खर्च ऐसपैस चालूनहि शिलकेची चंगळ असते.

ता. १७–८–२८

आज सकाळीं कुकमार्फत कांहींहि कार्यक्रम नव्हता, म्हणून गांवांत इतस्ततः फिरावयास निघालों. कुकच्या ऑफिसाजवळच एक नीग्रो पुस्तकें व वर्तमानपत्रें विकत होता, त्याच्यापाशीं पहावयास गेलों. तेथें काळ्या-गोऱ्यांची गोष्ट त्यानें काढली. आम्ही त्याच्यापाशीं गेलों याचा त्यास फारच आनंद वाटला व वर्णसाम्य अथवा सादृश्यामुळें बंधुत्वहि त्यास वाटलें. अमेरिकन लोकांविषयीं त्याचें फार वाईट मत दिसलें. जगांत ते लोक वर्णविद्वेष वाढवीत आहेत असें त्यानें सांगितलें. अमेरिकेंत कायद्यानें नाहीं पण रूढीनें वर्णविद्वेष व निराळें वागविण्याची पद्धति आहे. फ्रान्स-मध्यें सर्वत्र समता आहे असा त्यानें स्वानुभव सांगितला.

दुपारीं २–५० चे गाडीनें पॅरिसला निघालों.

ता. २०–८–२८

आज सकाळीं बॉबिझॉन व फौंटन ब्ल्यू पहावयास जावयाचें होतें. बॉबिझॉन गांवीं प्रख्यात फ्रेंच चित्रकार होऊन गेले, व हल्लींहि ती कला तेथें प्रामुख्यानें आहे म्हणून त्या गांवचें महत्त्व.

बॉबिझॉन गांवीं मिले ( Millet ) चित्रकाराचें घर, चित्रें रंगविण्याची खोली व अस्सल कांहीं चित्रें पाहिलीं. चित्रकारास लोक किती मान देतात, कला या दृष्टीनें काय महती चित्रकलेची आहे हें येथें दिसतें.

सर्व पूर्वस्मरण अजून जसेंच्या तसेंच कायम–मिलेची खुर्ची, तो ज्यावर वारला तो पलंग, त्याचा ब्रश वगैरे वगैरे. आमचेकडे गांधी अथवा टिळक यांच्यासारख्या आधुनिक पुरुषांच्याहि जन्मस्थानाचा व त्यांच्या उपयोगांतील वस्तूंचा संग्रह नाहीं. टिळकांचा अडकित्ता, पगडी, आंगरखा वगैरे पहाणें आजहि मनोरंजक व कौतुकपूर्ति करणारें होईल, तर आजपासून शंभर वर्षांनीं तर त्याची किंमत किती होईल ! कुबडीतीर्थ, रामघळ हीं स्थानें माहीत असूनहि जोपासना नाहीं–उत्पन्न खात असूनहि ठेवली जात नाहीं !! किती शोचनीय स्थिति !!!

फौंटन ब्ल्यू पाहून परत आल्यावर रात्रौ भोजनोत्तर मी व रा. ठाकोरभाई कुकच्या टूरनें "रात्रींचें पारिस" पहावयास गेलों होतों. पारिसमध्यें निरनिराळ्या वर्गांचे लोक रात्रीं कसकशा करमणुकी करतात अथवा कसकसे जमतात तें मुख्यत्वें या टूरमध्यें दाखविण्यांत येतें. रात्रौ येथें निरनिराळ्या धंद्यांचे लोक निरनिराळ्या चहा–कॉफी–पान–गृहांत व उपाहारगृहांत जमतात, व तेथेंच वेळ घालवितात. गाणें, नाच वगैरे असतें. आम्हांस एकंदर निरनिराळ्या पांच ठिकाणीं नेण्यांत आलें. 'ला रोटंडा' या कॅफेंत प्रथम गेलों. तेथें चित्रकार लोक बहुधा येतात.

येथून पुढें एका कॅबरेट( नुसतें पेयगृह )मध्यें नेण्यांत आलें. तें जुन्या काळच्या तुरुंगांत आहे. जागा जुनी होती तशीच ठेवली आहे व तेथें रखवालदार आणि कॅफे चालविणारे जुन्या काळचा पोषाख घालूनच असतात. तुरुंगाच्या भयाण व लहान खोल्या व आंत खालीं तुरुंगांत मारण्यांत आलेल्या कैद्यांचीं प्रेतें टाकण्याच्या विहिरी पाहून अंगावर शहारे आले. मध्ययुगीन युरोपांत किती पशुतुल्य क्रौर्य होतें याची या व वेनिसच्या तुरुंगांवरूनहि खात्री होते. या कॅफेंत सामान्य मजूर वर्गांचे लोक येतात.

तेथून एका टेकडीवरील दुसऱ्या कॅफेमध्यें गेलों. त्याला शेतकरी लोकांचा आश्रय असतो असें सांगण्यांत आलें. तेथून मोलिएरूज नृत्य–उपाहार–गृहांत गेलों. येथें नाच व नटांचा खेळ चालू होता. तेथें नीग्रो

पुरुष गोऱ्या बायकांबरोबर नाचतांना पाहून साश्चर्य कौतुक वाटलें. दोहोंतील वर्णाचा व रूपाचा विरोध पहातां नीग्रो लोकांबरोबर नाचावयास गौर स्त्रिया कशा तयार होतात, याचेंच आश्चर्य वाटतें.

सर्व कॅफेमध्यें दिवाबत्तीचा खूप झगझगाट होता. आंत चित्रें रंगविलेलीं होतीं ती कलायुक्त होतीं, पण अश्लील अतएव त्याज्य होतीं.

ता. २१-८-२८

आज एफिल टॉवर पाहिला. हा सर्व लोखंडी सांगाड्याचा असून १००० फूट उंच आहे. वर जाण्यास पायऱ्या सुमारें १७०० असून त्याशिवाय लिफ्टहि आहे. वर उपाहारगृह, छोटींशीं दुकानें, पोस्ट ऑफिस, नापितगृह, स्नानगृह वगैरे सोयी शोकीन लोकांसाठीं आहेत. अगदीं वर दुर्बिणीहि आहेत. वरून सर्व पारिस शहर व दूरवर जवळ जवळ ४० मैलांपावेतोंचा प्रदेश दिसतो.

तेथून नदीमार्गें जवळच सेवर्स या भागांत गेलों. येथें पहाण्याजोगें म्हणजे चिनई मातीचें काम. हा कारखाना मूळ लुई राजानें स्थापला व हल्लीं तो फ्रेंच सरकार चालवितें. येथें फारच उत्तम कलायुक्त कुंभारकाम होतें. आपल्याकडे गुजराथेंत पाटण गांवीं चांगलें काम कुंभार करतात. लखनौचीं चित्रेंहि प्रसिद्ध आहेत. पण या जुन्या कारागिरांच्या आनुवंशिक संस्कारास योग्य वळण देऊन ही कला देशांत पुनरुजीवित करणें धनिकांचें काम आहे. येथील नमुन्यांवरून हिंदुस्थानांत माल मुद्दाम तयार करवून घेऊन आमच्या श्रीमंतांनीं व राजेरजवाड्यांनीं आपले दिवाणखाने कां भरूं नयेत ?

रात्रौ नाटक पहावयास गेलों होतों. निरनिराळे नाच, देखावे, लाईट वगैरे प्रत्येक बाबतींत कलेचा कळस होता म्हटलें तरी चालेल. अर्थात् नाच वगैरेमध्यें स्त्रिया पुष्कळ वेळां केवळ नग्न अशा अवस्थेंत येत असत, पण मला वाटतें, येथील (म्हणजे युरोपांतील) एकंदर वातावरणांत आकृतीविषयीं सौंदर्याची जाणीव इतकी आहे कीं इतर विकारांस त्यामुळें

गौणस्थान मिळतें. आपणांस असे प्रकार पहाण्याची संवय नसल्यामुळें ज्या गोष्टींत बीभत्स प्रकार विशेष वाटण्याचा संभव आहे तेथें संवयीमुळें बीभत्स प्रकाराकडे लोकांचें लक्ष्य जात नसून सौंदर्याकडे जातें असें सामान्यतः म्हटल्यास फारशी चूक नाहीं. पूर्वीपासून मोठमोठे शिल्पकार, व चित्रकार यांनीं नग्न स्त्रीपुरुषांच्या आकृतींचें सुंदर पुतळे व चित्रें काढलीं आहेत. ठिकठिकाणीं तीं चित्रें व पुतळे जाहीर रीतीनें आहेत. अशा वातावरणांत नाटकांतील नाच किंवा देखाव्यांतील जवळ जवळ नग्न अशा देखाव्यांवर टीका करतांना आजूबाजूची परिस्थिति लक्षांत घेण्याची जरूर आहे. असो.

परत आल्यावर युरोपच्या प्रवासाचा संयुक्त हिशोब व डायरी वगैरे-साठीं सुमारें १ वाजेपावेतों काम करीत बसलों होतों.

ता. २३-८-२८

आज येथून जाण्याचा बेत असल्यामुळें आजचा दिवस बांधाबांधी-साठींच होता. सायंकाळी ७-३५ च्या गाडीनें पॅरिस लीऑं स्टेशनवरून निघालों. ही झडपगाडी असून ती ऐषआरामाची समजली जाते. हिला 'ब्ल्यू ट्रेन' रंगावरून म्हणतात. सर्वांबरोबर माझेंहि तिकीट घेतलें गेल्या-मुळें मी या गाडीनें गेलों. एका रात्रीसाठीं इतका जादा खर्च करण्याची माझी इच्छा नव्हती, पण मंडळीबरोबर मंडळीप्रमाणें या न्यायानेंच आमचा हा प्रवास झाला.

ता. २४-८-२८

सकाळीं मार्सेल्स स्टेशनवर आलों. तेथें थॉमस कुकचा मनुष्य होताच. सरळ आगबोटींतच जातां येईल असें समजलें. त्यामुळें आम्ही परभारें तिकडेच गेलों.

दुपारीं बोटींत लंच घेतल्यावर आम्ही चौघेजण मार्सेल्स गांव पहाणेस गेलों. विशेष हा कीं जुन्या बंदराचा हालता पूल पाहिला. झोपाळ्यासारखा

टांगलेला असून त्यावर माणसें, गाड्या वगैरे चढविल्यावर तो लहानसा पूलच्या पूल एका बाजूवरून दुसरीकडे नेला जातो. त्यावर आमची मोटार ठेवून आम्ही पलिकडल्या बाजूस गेलों. पॅरिसमध्यें लायसेन्स्ड् हाउसिस् पहाणें झालें नव्हतें तीं येथें पहावयास आम्ही चौघेजण गेलों होतों. त्याचें वर्णन व चर्चा येथें देणें इष्ट नाहीं म्हणून देत नाहीं.

सायंकाळीं जेवणाच्या वेळीं बोटीवर आलों. पहांटे ५ वाजण्याच्या सुमारास बोट सुरू झाली.

ता. २५-८-२८

आज सकाळीं १० वाजेपावेतों आळसांतच बिछान्यावर पडून होतों. गेल्या कित्येक दिवसांच्या प्रवासाचा थकवा बोटीवर खूप विश्रांति घेऊन घालवावयाचा आहे.

समुद्र अगदीं शांत—एकाद्या तळ्याप्रमाणें शांत—आहे. उकाडा मात्र वाटतो. बोट अगदीं संथपणें चालली आहे.

ता. ३०-८-२८

रात्रौ चांदण्यांत डेकवर बसलों होतों. आमच्या खुर्च्या डेकवर खलाशानें आणून टाकल्या, तेव्हां जवळच बसलेल्या एका इंग्रजानें नाक मुरडून पुटपुटण्यास सुरवात केली असें रा. दिवाणजी सांगत होते. अर्थात् तसें असेलहि. पण जास्त पुरावा दिसल्याशिवाय मी ठाम मत करूं इच्छीत नाहीं. कांहीं इंग्रज हिंदद्वेष्टे आहेत, तसा एकादा दुसरा भेटेलहि. पण प्रश्न हा कीं ही मनोवृत्ति आगबोटीवर सर्वसाधारण आढळून येते कीं काय? मला तर अजून तसें दिसत नाहीं. उलट मला असें वाटतें कीं, आमच्या लोकांनीं दरेक बाह्य बाबतींत चालविलेलें इंग्रजांचें अनुकरण पाहून, जर मी इंग्रज असतों तर, या लोकांकडे कींव व तिरस्कारबुद्धीनें पाहिलें असतें. इंग्रजांनीं आमच्याकडे समत्वाच्या व बरोबरीच्या नात्यानें

पहावें असें राष्ट्रीय पौरुष आम्ही दाखंवितों का? आम्ही आमचा पेहे-राव वापरीत नाहीं, देशी माल वापरीत नाहीं (खादी तर लांबच), घरीं सोंवळें न नेसलों तरी येथें अत्यंत उकाडयांतहि इविनिंग सूटशिवाय फिरत नाहीं, आपलें जेवण आम्हांस आवडत नाहीं, भाषा त्यांचीच बोलतों, वगैरे प्रकारांत आमचेपणा कोठेंच नसल्यामुळें इंग्रजांनीं तरी आम्हांस बरोबरीच्या स्वतंत्र दर्जानें कां लेखावें? आमच्या वाडवडिलांच्या पुरातन संस्कृतीविषयीं इंग्रज व पाश्चात्य प्रजेस पूज्यबुद्धि असल्यामुळें आम्हांस केवळ नीग्रोसारखे वागवीत नाहींत हेंच नशीब. बाकी सध्यांची आमची स्थिति म्हणजे 'सांगे वडिलांची कीर्ति...' अशा कोटींतीलच.

ता. ७–९–२८

पहांटे ५॥ चे सुमारास बोट बंदरांत आली. मी ४॥ वाजल्यापासून उठून शौच वगैरे आटोपून तयार होतोंच.

सहाच्या सुमारास तर घ्यावयास आलेली मंडळीं बोटीवर दाखलहि झाली. सर्व तपासणी वगैरेमधून सुटका होऊन ग्रांट रोड शास्त्री हॉलमध्यें पोंचण्यास मला सुमारें सवाआठ झाले.

खण्ड १ ला पूर्ण.